# माडगांवकरांचे संकलित वाङ्मय

# खंड २ रा

SANGADE







संपादक

**स. गं. मालशे**

कै. सर गोविंद दीनानाथ माडगांवकर स्मारक-ग्रंथावलि

ग्रंथ-तिसरा

# माडगांवकरांचें संकलित वाङ्मय

## खंड २ रा



ले. गोविंद नारायण माडगांवकर



: संपादक :

स. गं. मालशे




मराठी संशोधनमंडळ

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, दादर, मुंबई १४.

मूल्य दहा रुपये

# प्रकाशकाचे दोन शब्द

कै॰ सर गोविंद दीनानाथ माडगांवकर यांच्या विश्वस्तांकडून दहा सहस्र रुपयांचा निधि स्मारकग्रंथमाला प्रकाशित करण्यासाठीं मराठी संशोधनमंडळाच्या स्वाधीन करण्यांत आला. स. १९५४ सालीं महाराष्ट्र भाषेचें व्याकरण ' हा ग्रंथ या ग्रंथमालेचें पहिलें पुष्प म्हणून प्रसिद्ध झाला. १९६८ सालीं ' माडगांवकरांचें संकलित वाङ्मय–खंड १ ला ' हा ग्रंथ दुसरें पुष्प म्हणून प्रसिद्ध झाला व आतां ' माडगांवकरांचें संकलित वाङ्मय–खंड २ रा ' या मालेचें तिसरें पुष्प म्हणून प्रसिद्ध होत आहे. गो. ना. माडगांवकरांच्या शास्त्रीय लेखनाचा अंतर्भाव असणारा तिसरा खंड लवकरच प्रसिद्ध करण्यांत येईल. कै. गोविंद नारायण माडगांवकरांच्या ग्रंथांचें पुनर्मुद्रण त्यांच्याच नातवाच्या स्मारकग्रंथमालेंतून प्रसिद्ध होत आहे, हा औचित्यपूर्ण योगायोगच म्हटला पाहिजे.

ग्रंथलेखन, ग्रंथसंपादन आणि ग्रंथप्रकाशनसाहाय्य या तिन्ही क्षेत्रांतील माडगांवकरघराण्याची सेवा उल्लेखनीय आहे. मराठी संशोधनमंडळाचे माजी संचालक प्रा. अ. का. प्रियोळकर यांनीं तिचा सविस्तर परिचय ' माडगांवकरांचें संकलित वाङ्मय-खंड १ ला ' या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत करून दिलेला असल्यानें त्याची पुनरुक्ति येथें करीत नाहीं.

ग्रंथप्रकाशनाला साह्य देऊन पूर्वजांचें स्मारक करण्याचा हा उपक्रम खरोखर अनुकरणीय आहे. अशा उपक्रमामुळें द्रव्याभावीं अप्रकाशित राहिलेल्या उपयुक्त ग्रंथांचें प्रकाशन करणें शक्य होतें. सुसंस्कृत ग्रंथप्रेमी मंडळींनीं आपल्या औदार्याचा ओघ अशा स्तुत्य कार्याकडे वळविल्यास त्यांना पूर्वजांची स्मृति जागविण्याबरोबरच मराठी भाषेचें ऋण फेडण्याचें श्रेय मिळणार आहे.

श्री. चिंतामण द्वा. देशमूख, न्या. मू. गणपत स. राजाध्यक्ष आणि मधुकर बळवंत माडगांवकर या स्मारकनिधीच्या विश्वस्तांचे आम्ही आभार मानतों. तसेंच महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृति मंडळानें या ग्रंथाच्या प्रकाशनासाठीं अनुदान दिल्यामुळें ग्रंथाचें मूल्य कमी ठेवणें शक्य झालें आहे, हें साभार नमूद केलें पाहिजे.



कै. सर गोविंद दीनानाथ माडगांवकर स्मारक-ग्रंथावलि

ग्रंथ-तिसरा

# माडगांवकरांचें संकलित वाङ्मय

## खंड २ रा



ले. गोविंद नारायण माडगांवकर



: संपादक :

स. गं. मालशे




मराठी संशोधनमंडळ

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, दादर, मुंबई १४.

मूल्य दहा रुपये

कै. सर गोविंद दीनानाथ माडगांवकर स्मारक-ग्रंथावलि

ग्रंथ-तिसरा

# माडगांवकरांचें संकलित वाङ्मय

## खंड २ रा



ले. गोविंद नारायण माडगांवकर



: संपादक :

स. गं. मालशे




मराठी संशोधनमंडळ

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, दादर, मुंबई १४.

मूल्य दहा रुपये

प्रकाशक :
रा. मि. जोशी
संचालक, मराठी
संशोधनमंडळ,
दादर, मुंबई १४.

प्रथमावृत्ती १९६९

या प्रकाशनाला महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाकडून अनुदान मिळालें आहे.

मुद्रक :
पुरुषोत्तम अच्युत गुर्जर
मुंबई वैभव प्रेस, ४१७/४२१
सरदार वल्लभभाई पटेल रोड,
गिरगांव, मुंबई नं. ४

# प्रकाशकाचे दोन शब्द

कै० सर गोविंद दीनानाथ माडगांवकर यांच्या विश्वस्तांकडून दहा सहस्र रुपयांचा निधि स्मारकग्रंथमाला प्रकाशित करण्यासाठीं मराठी संशोधनमंडळाच्या स्वाधीन करण्यांत आला. स. १९५४ सालीं महाराष्ट्र भाषेचें व्याकरण' हा ग्रंथ या ग्रंथमालेचें पहिलें पुष्प म्हणून प्रसिद्ध झाला. १९६८ सालीं 'माडगांवकरांचें संकलित वाङ्मय–खंड १ ला' हा ग्रंथ दुसरें पुष्प म्हणून प्रसिद्ध झाला व आतां 'माडगांवकरांचें संकलित वाङ्मय–खंड २ रा' या मालेचें तिसरें पुष्प म्हणून प्रसिद्ध होत आहे. गो. ना. माडगांवकरांच्या शास्त्रीय लेखनाचा अंतर्भाव असणारा तिसरा खंड लवकरच प्रसिद्ध करण्यांत येईल. कै. गोविंद नारायण माडगांवकरांच्या ग्रंथांचें पुनर्मुद्रण त्यांच्याच नातवाच्या स्मारकग्रंथमालेंतून प्रसिद्ध होत आहे, हा औचित्यपूर्ण योगायोगच म्हटला पाहिजे.

ग्रंथलेखन, ग्रंथसंपादन आणि ग्रंथप्रकाशनसाहाय्य या तिन्ही क्षेत्रांतील माडगांवकरघराण्याची सेवा उल्लेखनीय आहे. मराठी संशोधनमंडळाचे माजी संचालक प्रा. अ. का. प्रियोळकर यांनीं तिचा सविस्तर परिचय 'माडगांवकरांचें संकलित वाङ्मय–खंड १ ला' या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत करून दिलेला असल्यानें त्याची पुनरुक्ति येथें करीत नाहीं.

ग्रंथप्रकाशनाला साह्य देऊन पूर्वजांचें स्मारक करण्याचा हा उपक्रम खरोखर अनुकरणीय आहे. अशा उपक्रमामुळें द्रव्याभावीं अप्रकाशित राहिलेल्या उपयुक्त ग्रंथांचें प्रकाशन करणें शक्य होतें. सुसंस्कृत ग्रंथप्रेमी मंडळींनीं आपल्या औदार्याचा ओघ अशा स्तुत्य कार्याकडे वळविल्यास त्यांना पूर्वजांची स्मृति जागविण्याबरोबरच मराठी भाषेचें ऋण फेडण्याचें श्रेय मिळणार आहे.

श्री. चिंतामण द्वा. देशमूख, न्या. मू. गणपत स. राजाध्यक्ष आणि मधुकर बळवंत माडगांवकर या स्मारकनिधीच्या विश्वस्तांचे आम्ही आभार मानतों. तसेंच महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृति मंडळानें या ग्रंथाच्या प्रकाशनासाठीं अनुदान दिल्यामुळें ग्रंथाचें मूल्य कमी ठेवणें शक्य झालें आहे, हें साभार नमूद केलें पाहिजे.



# अनुक्रमणिका



---

# प्रस्तावना

मराठी संशोधनमंडळाचे माजी संचालक गुरुवर्य प्रा. अ. का. प्रियोळकर यांनीं कै. गो. ना. माडगांवकर यांचें लेखन संकलित करून त्याचें त्रिखंडात्मक पुनर्मुद्रण करण्याची योजना आंखली. तदनुसार ' माडगांवकरांचें संकलित वाङमय–खंड १ ला ' यांत त्यांचे स्फुट निबंध संकलित करण्यांत आले. आतां या दुसऱ्या खंडांत त्यांचे प्रदीर्घ निबंध एकत्रित करण्यांत आले आहेत. त्यांच्या शास्त्रीय लेखनाचा समावेश असलेला तिसरा खंड यथावकाश प्रसिद्ध करण्यांत येईल.

पहिल्या पिढींतले अग्रेसर गद्यलेखक म्हणून माडगांवकरांचें स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. वाचनांत आलेल्या आख्यायिका, व्यावहारिक दाखले आणि संस्कृत सुभाषितें देऊन विषय सजवण्याचा प्रयत्न त्यांच्या गद्यलिखाणांत दिसून येतो. तरीसुद्धां त्यांचे गद्य संस्कृतच्या अभ्यासानें जसें सुश्लिष्ट बनलेलें दिसत नाहीं, तद्वतच त्याला संस्कृतनिष्ठतेनें जडत्वहि आलेलें नाहीं. या गद्यलेखनांतील कांहीं प्रकरणें संवादात्मक आहेत, हें एक खास वैशिष्ट्य म्हटलें पाहिजे. पहिल्या खंडांत ' रेशमी रुमाल ' ( स. १८६० ) हा छोटा संवाद आलेला आहे. प्रस्तुत खंडांत ' नीतिसंवाद ' ( १८५० ), ' दारूपासून अनर्थ ' ( १८५५ ), ' व्यवहारोपयोगी नाटक ' ( १८५९ ) आणि ' भोजनबंधु पानतंबाखू ' ( १८६० ) असे चार संवाद आहेत. ' व्यवहारोपयोगी नाटका'च्या नावांत ' नाटक ' शब्द आहेच. पण प्रास्ताविकांतहि ' नाटकरूप निबंध ' असे शब्द त्यांनीं योजिले आहेत. गो. ना. माडगांवकर हे वृत्तीनें सुधारक असले, तरी सौम्य प्रकृतीचे होते. त्यांना सामाजिक व्यंगांचें चित्रण तर करावयाचें होतें. तेव्हां उघड निबंधात्मक लेखनापेक्षां संवादरूप पडदपोशी घेऊन केलेलें लेखन त्यांच्या प्रकृतीस मानवलें असावें. केवळ कला किंवा रंजन हे हेतु या लेखनामागें नव्हते. प्रेरणा नीतिबोधाचीच होती. पण नीतिबोध जेव्हां ' त्रैगुण्योद्भव लोकचरित् ' चित्रित करतां करतां संवादरूपानें अवतरतो, तेव्हां त्याला नाट्यरूप येतें. ' व्यवहारोपयोगी नाटका'ला असें रूप आलेलें आहे. तेथें एखाद्या निबंधांतले मुद्दे निरनिराळ्या पात्रांच्या तोंडून वदविलेले नाहींत. नाथा मारवाडी आणि चिमाबाई यांच्या संवादांत नाट्याचा नेटका ढंग उतरलेला दिसून येईल (पृ. १८३-१८४). तीच गोष्ट ' भोजनबंधु पानतंबाखू ' मध्यें आढळते. त्यांतलीं वारू आणि बाळू गडी यांचीं कांहीं भाषणें किंचित् आगाऊ वाटलीं, तरी यजमान–यजमानीण, यजमान–शास्त्रीबोवा यांच्यांतले संवाद स्वभावनिदर्शक असल्यानें नाट्यरूप घेतात. विशेषतः नवऱ्याच्या वर्तनांतील दुटप्पीपणा उघड करणारे भागीर्थीबाईचे टोमणे मार्मिक उतरलेले आहेत ( २१०–२१३ ). ' भोजनबंधु पानतंबाखू'च्या प्रास्ताविक सूचनेंत मांडगांवकरांनीं

म्हटलें आहे, "ह्या ग्रंथांत कोठें कोठें अतिशयोक्ति आहे खरी, परंतु नाटकास रस आणण्याकरितां अशा प्रकारचा ग्रंथ रचणाऱ्यास ही मोकळीक आहे..." ही वाङ्मयीन जाण ध्यानांत घेतल्यास, मराठी सामाजिक नाटकाचें मूळ शोधणाऱ्या अभ्यासकास मांडगावकरांच्या या संवादात्मक लेखनाचें महत्त्व नाकारतां येणार नाहीं.

माडगांवकरांच्या लेखनांत सहजपणें आलेले कांहीं उल्लेख ऐतिहासिक दृष्ट्या लक्षणीय आहेत. 'ओरिएंटल ख्रिस्तीअन स्पेक्टेटर' या नियतकालिकांतील विलबीसाहेबानें ठेविलेल्या पारितोषिकाची जाहिरात वाचून, त्यासाठीं त्यांनीं 'सत्यनिरूपण' हा निबंध लिहिलेला आहे. (पृ. १००) 'नीतिसंवाद' हें पुस्तक त्यांनीं भाऊ दाजी या आपल्या शिष्यास अर्पण केलेलें आहे (१४३). १८५० सालीं लिहिलेल्या 'ऋण-निषेधक बोध' या निबंधाच्या प्रास्ताविकांत त्यांनीं 'वर्तमानपत्र' हा शब्द उपयोजिला आहे (३७). तेथें एतद्देशीय लोकांच्या कर्जबाजारीपणासंबंधीं 'प्रभाकर' वर्तमानपत्रांत पत्रव्यवहार येत असल्याचा उल्लेख आहे. 'कल्पित कादंबरी' ही शब्दयोजना १८६० सालच्या पुस्तिकेंत केलेली आहे (२४५). याच पुस्तिकेंत प्राकृत (मराठी) 'मेस्तक' ग्रंथाचा उल्लेख असून (२३८) बिवलकरी आणि जनोबाभट्टी अशीं मोडी लिपीचीं दोन वळणें सांगितलेलीं आहेत (२४५). तपकिरीच्या व्यसनाच्या संदर्भांत बाळ गंगाधर शास्त्री आणि त्यांनीं 'दिग्दर्शनां'त लिहिलेला बोधपर लेख यांचा उल्लेख येतो (२१३). 'बरें जा, 'ज्ञानप्रसारक' वाचीत बैस' असा उल्लेख 'भोजनबंधु पानतंबाखू' मध्यें येतो (२१५). बीभत्स चित्रें आणि अवाच्य पुस्तकें यांच्याविरूद्ध सरकारनें कायदा केल्याचा उल्लेख 'नीतिसंवाद' या १८५० सालच्या पुस्तकांत आहे (१५४). अफीणीच्या व्यसनाचा व व्यापाराचा निषेध करणारे दोनचार गुजराथी ग्रंथ झालेले असल्याची नोंद 'दारूपासून अनर्थ' (स. १८५५) मध्यें आढळते (१६७). भटजीच्या तोंडीं पाखांडी परमहंस मंडळीचा उल्लेख व्यवहारोपयोगी नाटकाच्या पहिल्या आवृत्त्यांमधून आढळतो (१७९), तो पुढील आवृत्त्यांत आढळत नाहीं. सोसायटीच्या शाळेचा आणि त्या शाळेंत दोन रुपये फी असल्याचा उल्लेख येतो (१९५). याशिवाय ज्ञानोदय, प्रभाकर, धूमकेतु, वर्त्तमानदीपिका व ज्ञानप्रकाश या वर्तमानपत्रांचा उल्लेख 'दारूपासून अनर्थ' या १८५५ सालच्या संवादपुस्तिकेंत आलेला आहे (१६९). या खंडांत 'शुचिर्भूतपणा' या पुस्तिकेची तृतीयावृत्ति छापली आहे. तिच्यावर कर्त्यांचें नांव 'गोविंद नारायण' असें आहे. परंतु १८५३ सालची दु. आ. नंतर पाहावयास मिळाली. त्या आवृत्तींत कर्त्यांचें नांव 'गोविंद नारायण शेणवी' असें आहे.

× × ×

## भाषाविशेष

माडगांवकरांच्या गद्यलेखनाचे भाषाविशेष 'खंड १ ला' मध्यें परिशिष्टांत सविस्तर मांडण्यांत आलेले आहेत. येथें या भागाच्या संदर्भात आढळणाऱ्या ठळक भाषिक वैशिष्ट्यांची नोंद केली आहे.

## उच्चारप्रक्रिया

माडगांवकरांनीं लेखन केलें, तो काळ आधुनिक मराठी गद्याच्या जडणघडणीचा प्रारंभकाळ होता. त्या काळीं लेखनपद्धतीला ठरीव स्वरूप प्राप्त झालेलें नव्हतें. तेव्हां बोलींत आढळून येणारी घरसोड, विकल्प आणि लकबी त्यांच्या लेखनांत आढळून आल्यास त्यांत नवल नाहीं.

**उभयविधता :** अवश्यक–आवश्यक, अवस्था–आवस्था, करजदार–कर्जदार, करनाटक-कर्नाटक, गृहस्थ–ग्रहस्थ, टाकणें–टांकिणे, तकादा–तगादा, बराबर–बरोबर लखोटा–लाखोटा, सारखा-सारिखा इ०

### स्वरप्रक्रिया

१९ व्या शतकांतील गद्यांत आद्यस्थानीं 'अ–आ' आणि 'आ–अ' ही प्रक्रिया मोठ्या प्रमाणांत दिसून येते. उदा. :—

अ–आ : आंग, आंडीं, आधिक, आपराध, आब्रू, आमीन, आमेरिका, आवस्था, आसती ( असती ), गाहाण, जाहागिर, दाहा, पाहा, बाहार, माहाग, राहा, लाखोटे, लाहान, शाहाणा.

आ–अ : अंघूळ, अचरण, अढळणें, अणखी, अवश्यक इ०

आद्येतर स्थानीं : अ–आ : अत्यावस्था, इंग्लांड, कराटी ( करटी ), सोहाळा.

आ–अ : इसपनीति.

ह्रस्वीकरण : ई–इ : बिभत्स; ऊ–उ : खुष, मुळ स्थिती, सुचना.

दीर्घीकरण : इ–ई : अनहीत, पुराणीक, सांगीतला; उ–ऊ : चतूर, धूळींत.

हलन्ताऐवजीं अकारागम : आसमंतात, अकस्मात.

वृथा हलन्त : द्रव्यवान्.

### आणखी कांहीं स्वरप्रक्रिया

बोलभाषेचा स्पष्ट परिणाम पुढील स्वरप्रक्रियांत दिसून येतो.

अ–आ : वहमा ( वहीम–'महिमां'शीं साम्याभास ).

इ–अ : अपरमित.

इ–उ : हिंडुस (स्वरविषमीकरण).

इ–य : घाय (घाई), भुयमुग (भुईमूग),—उलट 'य–इ' असें संप्रसारणहि आढळतें. उदा० सवई, हयगई.

उ–इ : भिंवया (भ्रूवर्तिका–भुवया).

ऊ–व : नवशें (नऊशें).

ओ–उ : अंघूळ.

औ–अं : हंस (हौस–'वंश'शीं साम्याभास).

ऋ–र् : ग्रहस्थ.–या उलट 'अर्–ऋ' अशी ही प्रक्रिया आढळते : परामृष (परामर्श).

अनुस्वारागम : अर्थांत, उंचीं उंचीं (वस्त्रें), गोंवा, टांकणें, वेंठ, फांटूं लागणें, सदांसर्वदां.

अनुस्वारलोप : विभक्ति प्रत्ययांवरील : ईश्वराने, सरकाराने, दिवसानी, पदार्थानी, हजारो; अ. व. सामान्य रूपांवरील : दिवसानी, पदार्थानी; दीर्घीकरणामुळें : पीक (पिंक).

विसर्गाच्या प्रक्रिया : विसर्गाऐवजीं ष् : निष्पक्षपात; क् ऐवजीं विसर्ग : धिःकार; ष् ऐवजीं विसर्ग : निःकाळजी.

अद्यस्वरागम : इस्पेलिंग (स्पेलिंग) १९५.

स्वरभक्ति : इनसाफ, करजदार, करनाटक, कातरी, खातरी, खुरच्या, गजकरण, परभ (प्रभु), फरडे, मुकरर, विकरी, विशकलित.—शेवटचा शब्द हा मूळरूपाशीं जवळचा आहे.

मध्यस्वरलोप : अक्रावें, कबुलातीनें, तार्वें (तारवें), घोत्रजोडा, नात्वावर, निष्टून (निसटून), पंध्रा, मिस्र (मिसर), मुश्रारा (मुशाहिरा), सत्रंजी, सर्कारी.

## व्यंजनप्रक्रिया

क्–ग् : पोंग २५२, पोशाग ४५, भागडकथा २३७.

ग्–क् : तकादा ३९.

ड्–र् : चरफडणें ३९, बरतर्फी १९४.

त्–द् : बयाती (बयादी).

प्–ब् : इसाबनीति, कबाट (सं. कपाट आणि इं. कबर्ड यांतील साम्याभास) ९.

म्–ब् : गिचबिड.

श् – स् : असी, आळसी, इस् (इश्), उपासीं, कसी, तमासा २२१, थोडीसी, नाहींसी, पासीं, मिजासी, सोसील, हिस्स्याप्रमाणें.

स् – श् : शिताफळ.

ल् – ळ् : कुशळ, काळक्षेप, प्रतिकूळ, बेताळ, मळीण, माळीका, विपुळ.—ही मूर्धन्यीकरणाची प्रक्रिया कालसापेक्ष होय.

व्–म् : परमाणगी.

व्–ह् : पुत्त्रोत्साह.

मध्यव्यंजनलोप : द् : जिनगी, य् : कबलात, भक्ष.

मध्यव्यंजनागम : य् : राज्याची (राजाची); ह् : अनवाहणी, दिल्हे.

महाप्राणलोप : आदी २०९, उदार (उधार) २२०, दैंट, शपत.

वृथा द्वित्व : अल्लग (अलग), बिच्छाना, मुकद्दमा, संघट्टन.

उच्चारांतील आघातानुरूप द्वित्व : अनुमत्ताशिवाय, कर्त्तव्यकर्म, कर्त्ता, किर्त्ति, मुहूर्त्त, वर्त्तणूक, वर्त्तमानपत्रें, सत्कार.

द्वित्वलोप : बतासे, मुकाम, रकम, सवा.–ही रूपें मूळरूपांशी जवळचीं असल्यानें चालू मराठींतील रूपांची पूर्वावस्था होय.

स्थ्–च्छ् : यथास्छित.

च्छ्व्–श्व : श्वासोश्वास.

## व्याकरण

नामविभक्ति, आख्यातविभक्ति आणि अन्य शब्दरूपें यांबाबत प्रचलिताहून जे वेगळे प्रयोग त्या काळीं रूढ होते, त्यांचीच नोद येथें केली आहे.

### लिंग

नपुं० ऐवजीं पु० : शिकल्याने मूल…दुराचारी झाला.

,, ,, स्त्री० : पारध्याच्या हातीं हरीण सांपडली.

,, ,, ,, : ठिगळया (अ० व०).

,, ,, ,, : बांकेवर.

,, ,, ,, : वस्तूची जतन.

,, ,, ,, : कोर्षीस (अ० व०) घाण लागून…

स्त्री० „ पु० : लांच घेतला.

„ „ „ : बाग—हें रूप मूळरूपानुसारच होय.

„ „ „ : जाग्यांत—'ती जागा' असा स्त्रीलिंगी प्रयोगही आढळतो.

„ „ नपुं० : चिलमास धक्का लागून तें उपडी झालें.

पु० „ स्त्री० : चंद्रास काळिमा येती, बदामीचा रोंपा, अर्ज्यांबद्दल (मू० श० अर्जी).

—याशिवाय 'वाटी' या शब्दावरून 'वाटें' असा न. लिं. प्रयोग येतो.

**वचन** : कल्याणें, तांबे (तांब्ये), पिसा (पिसवा) हीं अ. व. रूपें वैशिष्ट्यपूर्ण वाटतात.

## विभक्ति

तृतीया : द्विरुक्त : जेणेंकरून, तेणेंकरून, हरप्रयत्नेंकरून.

नें ऐवजीं णें : त्याणें, तिणें, त्याणीं.

ने आणि नी निरनुस्वार : योगाने, दिवसानी इ.

एं प्रत्ययाचा प्रयोग : जुलमें, रागें.

हीं „ „ : मनुष्यांहीं.

शींऐवजीं सीं : तुसीं (तुजशीं), दारासीं.

चतुर्थी (वा द्वितीया) च्या अ. व. नाऐवजीं ला : त्यांला, लोकांला, व्याख्यानांला.

सप्रत्ययाचें आधिक्य : कामास, दिवसास, मुलास, रात्रीस इ.

शब्दयोगी अव्ययांचे खास प्रयोग :

'कडे' ऐवजीं सविभक्तिक 'कडेस' : कल्याणाकडेस, कृत्यांकडेस, नेमाकडेस, बोधाकडेस, भोगाकडेस इ.

कडूनऐवजीं पासून : तुजपासून असें होणार नाहीं.

खालींऐवजीं खाल : समजुती खाल १५, २४८.

देखतऐवजीं देखतां : त्यांच्या देखतां, मुलांदेखतां.

विरुद्धऐवजीं वर : राजावर कोणी बंड केलें……

केवलप्रयोगी अव्ययें : अगई, इस्, छिः.

## सामान्यरूप

आ—मूळरूप : शेठनी, शेटला, जुगारसंबंधी, राज्यप्रकरणीं.

आ–या : आंगण्यांत, पित्यांचीं.—('पिळीं,' असें अ. व. त्या काळीं होत असे, तदनुसार सा. रू. झालें आहे).

आ–ए : एके (बाईनें).

ए–आ : एका दिवशीं.

या–आ : आदापेक्षां (आद्यापेक्षां).

या–ए : वेळचे (वेळीं), दुसरे (दिवशीं)—ही लकब आधिक्यानें दिसते.

ज–युक्त सा. रू. ची जुनी तऱ्हा : तिजकरितां, त्यांजपाशीं इ.—(दामले मज तुज, जिज इ. सर्वनामरूपांना सा. रू. मानतात.—शास्त्रीय मराठी व्याकरण, दु. आ, मुंबई १९२५, पृ. ३९२–३९३).

## क्रियारूपें

अपूर्ण क्रियावाचक त–कृदन्तांतील इकार : प्रचलित मराठींत हा इकार दीर्घ करण्याकडे प्रवृत्ति आहे, पूर्वी तो ह्रस्व करण्याकडे प्रवृत्ति दिसते. उदा० : ओढित, ओतित, चांचपित, चावित, जेवित.–क्वचित् 'गिळीत' (२४) सारखें रूपहि आढळतें.

व्यंजनादि आख्यात प्रत्ययापूर्वी अकारान्त संकर्मक धातूचे अंत्य अ चे जागीं इ आदेश फार मोठ्या प्रमाणावर होई : करितो, कमावितो, खर्चिला, टाकिला, ठेवितात, धरिली, बांधिले.

—प्रयोजक धातूंतील इकाराचा विपर्यय : वळिवणें, धुशिवणें.—मात्र ही प्रक्रिया कमी प्रमाणांत आढळते.

—वा–कृदन्ताचीं जुनीं रूपें : खायास, दाखवायास इ.

—वा–कृदन्ताऐवजीं णें–कृदन्त : जें करणें तें कर्ज न करतां करावें.

## शब्दघटना

ज्या साधित शब्दांच्या घडणींत प्रचलिताहून वेगळेपणा आढळतो, त्यांचीच नोंद येथें केली आहे :

उत्तरोपसर्ग : ई : अशक्ताई, धुंदाई, श्रीमंताई; ईण : घरकरीण; ईव : घटींव; उक : विश्वासुक (विश्वासू); ऊक : फेडणूक; करी : कर्जकरी; वट : गहाणवट; बे : बेइलाज (नाईलाज).

जोडशब्द : आगमाग ( थांगपत्ता ), कुडाकारव्याचे, कुळंबीमाळंबी, वेळोवेळ ( वेळोवेळीं ), शेजारीवासारी, हिशोबखिशोब.

### फारसी शब्द

त्या काळीं रुळलेल्या फारशी शब्दांत न्याय आणि कारभार यांविषयींचे शब्द अधिक आढळतात. उदा०—अलबत्ता, इनसाफ, कबुलात, कुमक, खत, खातरी, खिजमतगार, जिनगी, जुलूम, तगादा, तलख, दरकार, नखलमी, परमाणगी, फरोक्त, बयाती, बरकत, बरतर्फी, बराबर, बिच्छाना, बेइलाज, मामलतदार, मिजास, मुकद्दमा, मुकरर, मेस्तक, यद्द, रकम, रदबदली, रोजगार, लखोटा, वखत, वहमा, साल्गुदस्ता इ०. 'कसम खाणें' या धर्तीवर 'शपथ खाणें' (२२५) असा वाक्प्रचार आलेला आहे.

### इंग्रजी शब्द

त्या काळीं रुळलेल्या इंग्रजी शब्दांत नवें शिक्षण, नव्या संस्था, व्यवसाय आणि कारभार यांविषयींच्या शब्दांचा भरणा अधिक दिसून येतो. उदा.—अकटोबर, आफीस, आब ( आफ् ), इस्पेलिंग, कांप ( कँप ), कौन्सलर, गलास, जनराल, टेबल, डाक्तर, न्यूज्, पेन ( टांकाचें निब ), पेनशिल, फी, बुक, रीडींग, सेलर, सोसायटी, हपीस इ.

'मोस्तर' हा शब्द पोर्तुगीज Mostra (इं. Muster) या शब्दावरून आल्याची शक्यता दिसते. महाराष्ट्र शब्दकोशांत 'मोस्तर-न० (कु.) महिना' असा व्युत्पत्ति न देतां फक्त अर्थ दिलेला आहे (पृ. २५४६). 'मोस्तराची मुदत करणें', 'आज मोस्तर आहे', 'पाहा, दोन मोस्तरें तुम्ही मला ठकविलें' असा या शब्दाचा उपयोग माडगांवकरांच्या लेखनांत येतो. 'मस्टर'वर सही करून पगार घेणें, यावरून 'मोस्तर' शब्द आलेला दिसतो. लक्षणेनें त्याचा अर्थ 'पगाराचा दिवस' वा 'महिना' असा होऊं शकेल. हा 'मोस्तर' शब्द आणि वस्त्रविषयक 'ल्हाय' हा शब्द, हे पाठारे प्रभु ज्ञातींत रूढ होते. 'Man is a social animal' या सुप्रसिद्ध वचनाचें भाषांतर 'मनुष्य सहचारी प्राणी आहे' (२३६) असें केलेलें दिसून येतें. स्पेलिंग शब्दाचें आद्यस्वरागम होऊन झालेलें 'इस्पेलिंग' हें रूप लक्षणीय आहे. संवादात्मक लेखनांत पुस्तकापेक्षां 'बुक' हाच शब्द अधिक आला आहे, त्यावरून तो लोकांच्या जिव्हाग्रीं रुळलेला होता, यांत शंका नाहीं.

× × ×

गेल्या शतकांतील ग्रंथकाराचें साहित्य पुनर्मुद्रित करतांना शक्यतों उपलब्ध होण्याजोग्या जुन्यांत जुन्या आवृत्त्या मिळविणें, अगत्याचें असतें. या दुसऱ्या खंडांतील कांहीं निबंधांच्या अशा आवृत्त्या मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या संदर्भविभागांत उपलब्ध होत्या. बाकीच्या कांहीं, मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाणें,महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालय पुणें व श्रीराम वाचनमंदिर, सावंतवाडी या ग्रंथालयांकडून मिळवाव्या लागल्या. या कामीं तेथील ग्रंथपाल आणि अन्य कार्यकर्ते यांनीं आपुलकीनें सहकार्य दिलें. विशेषतः पुण्याचे श्री. वा. पु. कोल्हटकर आणि सावंतवाडीचे प्रा. वसंत सावंत यांच्या साहाय्याची साभार नोंद करणें, हें माझें कर्तव्य आहे. मराठी संशोधनमंडळाचे सध्याचे संचालक प्रा. रा. भि. जोशी यांनीं हें संपादनकार्य करण्याची संधि दिल्याबद्दल त्यांचाहि मी ऋणी आहें. गुरुवर्य अ. का. प्रियोळकर व मुं. म. ग्रंथसंग्रहालयाचे प्रमुख कार्यवाह श्री. वा. वि. भट यांच्या मार्गदर्शनाबद्दल त्यांचेहि आभार मानणें अवश्य आहे.

स. गं. मालशे



# A TREATISE ON CLEANLINESS

By

GOVIND NÁRÁYAN,

TEACHER IN THE FREE GENERAL ASSEMBLY'S INSTITUTION.

---

THIRD EDITION,

REVISED AND IMPROVED.

BOMBAY

PRINTED AT GUNPUT KRISHNAJI'S PRESS.

---

1856.

Price Three Annas

# शुचिर्भूतपणा.

हा लाहानसा ग्रंथ स्वदेशाच्या कल्याणार्थ

गोविंद नारायण यांणीं

रचिला आहे.

तिसरी आवृत्ति

मुंबईमध्यें

गणपत कृष्णाजी यांचे छापखान्यांत छापिला.

सन १८५६

# अनुक्रमणिका





# प्रस्तावना

निर्मळपणापासून मनुष्यमात्रास किती सुख व समाधान होतें, आणि मळीणपणापासून किती दुःख व हानि होती, हें बहुतेकांस माहीतच आहे. अंतःकरणाचा आणि शरीराचा निर्मळपणा सर्व सुखाची खाण आहे; कारण त्यापासून सर्व सद्गुण उत्पन्न होतात, हें लक्षांत धरून मनुष्यानें सर्वकाळ शुचिर्भूतपणाने राहायास झटलें पाहिजे. त्याचप्रमाणें मळीणपणा, सर्व दुःखाची खाण आहे, आणि त्यापासून अनेक दुर्गुण उत्पन्न होतात, यास्तव त्यापासून दूर असलें पाहिजे.

सारांश, शुचिर्भूतपणापासून अनेक कल्याणें होतात हें मनांत आणून, या विषयावर कांहीं लिहून आमच्या लोकांचें हित करावें हा मनांत पूर्ण हेतु धरून, म्या हा लहानसा ग्रंथ रचिला आहे. तर आमच्या लोकांनीं तो वाचून पाहावा, आणि त्यांत ज्या गोष्टी रचिल्या आहेत, त्या ब-या अथवा वाईट, याचा विचार करून, ब-या आहेत असें अनुभवास आलें तर त्यांचा स्वीकार करावा; ह्मणजे हा ग्रंथ रचण्याचें सार्थक झालें, असें आह्मास वाटेल. या देशांत सध्या उत्तरोत्तर दुःखाची वृद्धि, आणि सुखाचा अपकर्ष होत चालला आहे, तो न होण्यास हा एक उपाय आहे, असें माझ्या बुद्धीस वाटतें. सूक्ष्म विचार करून पाहिलें असतां असें दिसून येतें कीं, सुशीलता व शुचिर्भूतपणा सर्वत्र पूज्य आहेत आणि सर्व संपत्ति व सुखें त्याला अनुसरून असतात, यांपासून ज्ञानाचीहि वृद्धि होती, असे त्यांपासून अनेक लाभ होतात याचें मनन करून पाहावें, हीच माझी सर्वांस प्रार्थना आहे. सांप्रत हिंदु लोकांची दुर्दशा होत चालली आहे, तिचा प्रतिबंध करण्यास असले कांहीं उपाय आपण न योजिल्यास आपलें कल्याण कधींहि होणार नाहीं, असें निःसंशय जाणावें.

— ० —

## घर व त्याच्या सभोंवतील जागा, कसी निर्मळ ठेवावी, आणि असा निर्मळपणा ठेवल्यानें कोणकोणते लाभ होतात, यांचा विचार

आपण ज्या घरांत राहतों तें स्वच्छ असलें पाहिजे, कारण, आपणास सुख प्राप्त होण्याचें तें मूळ स्थान आहे. घराच्या भिंती मळीण होऊं न देतां त्यांजवर मुलांस कोळशाच्या रेघा, तावें इत्यादि काढूं देऊं नये, व दारांवर किंवा खिडक्यांवर खडूनें चित्रें काढूं देऊं नये; त्याचप्रमाणें त्यांस ओट्यावर किंवा दारासमोर, व दुसरे ठिकाणीं घाण करूं देऊं नये, फळें खाल्लीं असतां, त्यांच्या साली, व बिया, मनास येईल तिकडे टाकूं देऊं नये. त्या एकीकडे दूर नेऊन टाकायास सांगावें, किंवा आपणापाशीं चाकर असला तर त्याजकडून टाकवाव्या. आपल्या सामर्थ्यानुरूप घरास प्रतिवर्षी चुना लावावा, व जमिनी करवाव्या, व त्यांस वारंवार सारवीत जावें, घरांत जिकडे तिकडे घुशींनीं बिळें पाडलीं आहेतच, मांजरांनी घाण केलेली आहेच, मुलें माणसें पाहिजे तिकडे थुंकत असतातच, घरांत कोणी तंबाखु ओढणारा असला ह्मणजे, जिकडे तिकडे मशेरीच्या राशी पडलेल्या आहेत. गुडगुडीचें पाणी सांडून दुर्गंधी सुटलीच आहे. असा बेबंद कारभार ठेवूं नये. वेळोवेळ केर काढून घर निर्मळ ठेवीत असावें. भलत्याच ठिकाणीं आंघूळ केली, भलत्याच ठिकाणीं तोंड धुतलें, भलत्याच ठिकाणीं आंचवलें, भलत्याच ठिकाणीं हात धुतले असें करूं नये. कित्येक लोक पानसुपारी खाऊन जिकडेतिकडे पिचकाऱ्या मारीत असतात. कोणी कोणी पानास चुना लावून चुन्याचीं बोटें सत्रंजीस, भेजास व कबाटास पुसतात; असें केल्यानें काय अपकार होतात, ते त्या वेळीं दिसत नाहींत, तथापि ते कांहीं दिवसांनीं दिसून येतात.

एके दिवशीं एक तंबाखु खाणारा गृहस्थ आपल्या मित्राच्या घरीं समारंभास गेला होता. तो सभेंत बसला असतां आदरसत्कारपूर्वक त्याला पानसुपारी दिली. ती खाऊन त्याणें दिवाणखान्याची भिंत व नवा गालिचा नासून टांकिला. तो असा कीं, जेव्हां त्याला थुंकावें पडे, तेव्हां तो गालिचा वर करून खालीं थुंके. तो गेल्यावर जेव्हां गालिचा कवळायास लागले तेव्हां तो सगळा पिकीने भरलेला होता. हें पाहून घरधन्यास फार वाईट वाटलें आणि आपल्या मित्राचा तिरस्कार आला. याप्रमाणें मळीणपणा ठेविला व बेशिस्तपणानें वागलें असतां मानहानी होऊन स्नेहांत अंतर पडतें.

घरांत भलत्याच ठिकाणीं पाणी सांडलें असतां तेथील जमीन कुजती, आणि तिजपासून दुर्गंधी निघून ती आपण श्वासोश्वास घेतों तेव्हां पोटांत जाती, तेणेंकरून पडसें, खोकला, ज्वर, इत्यादि शरीरास नाना प्रकारचे विकार उत्पन्न होतात. घरांत बिळें

पडलेलीं असलीं ह्मणजे त्यांत अनेक प्रकारचे जीव राहतात, मग ते कदाचित्, पाण्यांत व खाण्याच्या पदार्थांत जातात, आणि जर त्यांबरोबर ते पोटांत गेले, तर त्यांपासून अनेक अपकार होतात; व कितीएक लहान जीव अंथरुणावर चढून उपद्रव करितात, आणि झोंप लागूं देत नाहींत, आणि कदाचित् कानांत, नाकांत व तोंडांत शिरतात. आणि असी अव्यवस्था फारच झाली ह्मणजे तिजपासून हानिकारक परिणाम घडून येतात. ढेंकूण व पिसा यांच्या उपद्रवानें रात्रीस निद्रा लागली नाहीं ह्मणजे प्रकृति बिघडती व दिवसास काम करितेवेळीं डुलक्या येतात. कोणी एकास विचारिलें कीं, कां हो आज सुस्तसे दिसतां, तेव्हां त्याला त्यानें उत्तर दिलें, काय करावें रात्रीस ढेंकूण नीज लागूं देत नाहींत. घर निर्मळ ठेवायास केवळ द्रव्यच पाहिजे असें नाहीं. गरीबगुरीब लोकांसहि घर स्वच्छ ठेवायास अवघड पडणार नाहीं; त्यापासून आपल्यास किती सुख होतें हें त्यांणीं लक्षांत मात्र ठेविलें पाहिजे. आणि शरीरास थोडेसे श्रम देऊन आळस सोडून उद्योग केला पाहिजे. मग सर्व सुखें त्यांच्या घरीं आपोआप चालत येतील. कोणतेंही सुख श्रमावांचून प्राप्त होत नाहीं. घर निर्मळ ठेवण्यास घरच्या यजमानानें स्वतः मनांत धरिलें पाहिजे. हें सिद्धीस नेण्यास त्याणें सारा दिवस मेहनत घेतली पाहिजे असेंहि नाहीं; दिवसांतून घटिका अर्धघटिका या कामांत लाविली ह्मणजे पुरे. घरांत एक वेळ नेम लावून दिल्हे ह्मणजे मुलें माणसें त्याप्रमाणेंच वागतात, आपण मात्र त्यांजवर दृष्टि ठेविली पाहिजे, तेणेंकरून सर्व सुरळीत चालतें.

कोणी असी शंका काढील कीं, घर स्वच्छ ठेवण्यास तें मोठें व चुनेगच्ची भिंतींचें असावें; तर असें नाहीं, तें कुडाकारव्यांचें कां असेना, तेंहि निर्मळ ठेवितां येतें. ज्यांस चुना लावायाची शक्ति नाहीं त्यांणीं शेणामातीनें सारवावें, कोळ्याचीं घरें इत्यादि झाडून जिकडे तिकडे स्वच्छ ठेविलें ह्मणजे झालें. घरास चुना लावण्यानें किती लाभ होतात ते पाहा, भिंती चांगल्या दिसून घरांत उजेडहि पडतो, पाहाणारास तें स्वच्छ दिसून घरांत राहणाऱ्यांस समाधान होतें; अणखी एक त्यापासून मोठा लाभ होतो, तो पाहा, चुन्याच्या आंगीं जो दर्प आहे त्याच्या योगानें घरांत जिकडे तिकडे जी वाईट हवा जमलेली असती तिचा नाश होऊन हवा हितकारक होती, आणि तेणेंकरून घरांत राहणाऱ्यांस आरोग्य होतें. घराच्या भिंती इत्यादि मळलेल्या, व जिकडे तिकडे केर जमलेला असला म्हणजे, त्यापासून जी अति नाशकारक हवा निघती तिजपासून मोठी हानि होत असती. त्या हवेच्या योगानें शरीरास नाना प्रकारचे रोग उत्पन्न होतात. लाहान मुलांची प्रकृति क्षणोक्षणीं बिघडून त्यांची बुद्धि प्रकाशित होत नाहीं, व त्यांच्या आंगीं हुशारीहि राहत नाहीं, आणि आलस्याची वृद्धि होऊन अनेक प्रकारच्या हानि होऊं लागतात. कितीएक विद्वानांचें असें ह्मणणें आहे कीं, नाकारी हवा कांहीं काळपर्यंत पोटांत गेली असतां तेणेंकरून मनुष्याचें आयुष्यहि क्षीण होत असतें; असें त्यांचें मत

वास्तविक आहे, हें स्पष्ट दिसून येतें. घरांत मोऱ्या असल्या तर त्यांत आठ पंधरा दिवसांनी चुन्याचें पाणी करून घालावें ह्मणजे घाण नाहींशी होते.

कोणी कोणी हजारो रुपये खर्च करून, तीन, चार, मजली इमारती बांधितात; परंतु त्यांची चांगली व्यवस्था ठेवीत नाहींत, तेणेंकरून त्याला त्या घरापासून जी सुखें प्राप्त व्हावयाचीं तीं होत नाहींत. ओटीवर ढोरें बांधितात, मुलें माणसें मनास वाटेल तिकडे हवा तसा व्यवहार करितात. इच्छेस येईल तिकडे तोंड धुतात, पाहिजे तिकडे पाणी सांडितात; भाजी कापून सालें व देंट घरांत कोनांत टाकितात. असी वहिवाट केल्यामुळें घरास ओल चढून शरीरास नाना प्रकारचे विकार होऊं लागतात; तर नुसतें मोठें चुनेगची घर असून उपयोग नाहीं, त्याची व्यवस्था चांगली असली तरच त्यापासून जीं सुखें प्राप्त व्हावयाचीं तीं होतील.

घरांत चांगला बंदोबस्त ठेविला, आणि घराच्या आसमंतात, व घरास येण्या जाण्याच्या रस्त्याकडे कांहींच लक्ष न दिल्हें तर तेंहि उपयोगाचें नाहीं. घरांत येण्या-जाण्याचा रस्ता वेळोवेळ झाडून निर्मळ ठेवीत असावा. त्याचप्रमाणें घराच्या सभोंवता स्वच्छपणा ठेवावा. घरांत कांहीं कचरा व घाण असली ह्मणजे ती खिडकीबाहेर टाकून दिल्ही, व केर झाडून ओट्याखालीं लोटून दिल्हा असें करूं नये, तें सर्व भरून दूर नेऊन टाकावें. जेवल्यानंतर उष्टया पत्रावळी घराच्या बाजूस भिंतीजवळ टाकितात, तसें करूं नये. हे पदार्थ घराच्या आसमंतात टांकिले असतां, ते जर तेथें राहिले तर तेथेंच कुजून त्यांपासून मोठी नाकारी हवा निघून घरांत येती, मग तिजपासून घरांतील मनुष्यांस अपकार होतात; ती नाकारी हवा पोटांत गेली, ह्मणजे जठराग्नि मंद होतो, अन्नपचन होत नाहीं, तोंडास अरुचि येती, आणि कदाचित् वांतिहि होती, मस्तक दुखतें. अशा प्रकारच्या व्यथा उत्पन्न झाल्या असतां त्यांपासून मनुष्यांची बुद्धि प्रफुल्लित राहत नाहीं.

घर व त्याच्या आसमंतात जागा स्वच्छ असल्यामुळें मनुष्यांस किती समाधान होतें याविषयीं एथें एक उदाहरण लिहितों; तें वाचल्यावरून सर्व लक्षांत येईल. एके दिवसीं मी एका रोग्यास घेऊन इंग्रज वैद्याच्या घरीं कांपावर गेलों होतों; तेथें त्या वैद्याच्या घरांत त्यास एक घटकाभर बसविलें, इतक्यांत त्याच्या घरचा निर्मळपणा पाहून व बागांतील चांगल्या हवेचा स्पर्श होतांच, त्यास कांहींशी हुशारी येत चालली, आणि त्याची इच्छा झाली कीं कांहीं वेळ एथें फिरावें, मग तो हळू हळू कांहीं फिरल्यावर त्याच्या जिवास समाधान वाटलें. नंतर वैद्यानें त्यास औषध दिल्हें आणि हवा पालटायाकरितां दुसरे ठिकाणीं जायास सांगितलें. पुढें तसें केल्यावरून त्यास गुण पडत चालला. आतां पाहा ! ज्या घरांत तो गृहस्थ राहत असे तें फार संकुचित जागीं

होतें, त्याच्या आसमंतात जो चिखल सांचलेला होता त्याच्या दुर्गंधीमुळें त्याचा रोग वाढून त्यास औषधापासून कांहीं गुण येत नसे. जेव्हां तो घर सोडून गेला तेव्हां त्यास लागलाच गुण पडला. यावरून तुह्मी पाहा कीं निर्मळपणापासून किती लाभ होतो.

घर केवढेंहि मोठें असलें, आणि त्यांत राहणारा कितीही श्रीमंत असला, तरी, त्याणें त्या घराची डागडुजी यथास्थित न ठेविली, तर त्यापासून त्यास हवें तेवढें सुख होणार नाहीं, उलटी कांहीं तरी इजाच होईल. तें घर बाहेरून लोकांस दाखवायास मात्र उपयोगी आहे, असें समजावें. ज्या घरांत असा बेबंदपणा असतो कीं पडलें तिकडेच पडलें, सांडलें तिकडेच सांडलें, राहिलें तिकडेच राहिलें, त्या घरांत कोणताहि नेम राहत नाहीं, असें घर असलें ह्मणजे त्यापासून मोठी हानि होती; मुलें व्याधिग्रस्त होऊन त्यांस नाना प्रकारचे गुण दुर्गुण लागतात, तीं मनास वाटेल तसें वागतात, त्यांचीं मनें सर्वकाळ व्यग्र असतात, अभ्यास करायास हुशारी राहत नाहीं; आपलीं वस्त्रें पात्रें कोठें पडलीं, त्यांचें काय झालें, यांचें त्यांस भान राहत नाहीं; यास्तव घरांत सर्व गोष्टींचा नेम ठेविला पाहिजे.

घरांतील भांडीं, वस्त्रें, चिरगुटें, पेट्या, पाट, इत्यादि सर्व सामान जिकडचें तिकडे ठेविलें पाहिजे. आपल्या पोथ्या पेटींत नीट रचून ठेवाव्या, त्यांजवर मळ बसूं देऊं नये, त्या वेळोवेळीं काढून पुसून ठेवाव्या, त्यांजवर डाग पडूं देऊं नये; त्या भलत्याच ठिकाणीं टाकूं नये, ज्या पेटींत पुस्तकें ठेविलीं आहेत तीहि वेळोवेळ झाडून स्वच्छ करावी, नाहीं तर तींत तसर शिरून पुस्तकांचा नाश करिती. ती पेटी आंतूनच स्वच्छ केली ह्मणजे झालें, असें नाहीं; ती बाहेरूनहि स्वच्छ करीत असावी, जेणेंकरून पाहणारांस चांगली दिसेल, आणि उघडतेवेळीं आपल्या हातांस मळहि लागणार नाहीं. आपण एक दोन वेळां नेमानें वागलें ह्मणजे कुटुंबांतील सर्व मुलें माणसें त्याप्रमाणें वागतात. मग त्या घरांत सुखाची वृद्धि होऊं लागती. वारंवार कलह न होतां लोकांत प्रतिष्ठाहि मिळती. आणि आपल्या वस्तूची जतन चांगली होती, घर स्वच्छ होऊन, मुलें बळकट व हुशार असतात, असीं नाना प्रकारचीं हितें होतात. जे लोक नेमानें वागतात, त्यांपासून शेजाऱ्यांचे, व दुसरे लोकांचेंहि हित होतें, मग त्यांचा शुचिर्भूतपणा पाहून तेहि त्याप्रमाणेंच करावयास यत्न करितात.

ज्याप्रमाणें घर असलें पाहिजे; त्याचप्रमाणें मुलांच्या शाळेचीहि जागा असली पाहिजे. कोठें कोठें मी असें पाहिलें आहे कीं, लहानशा मळीण, व ओलसर ओट्यावर पांच पन्नास मुलें एकमेकांस लागून दाटीनें बसतात, आणि तीं त्या सर्दींत, व धूळींत दिवसभर लोळलेलीं असतात, तेणेंकरून त्यांचीं वस्त्रें मळतात, व त्यांच्या आंगावर मळ बसतो, आणि तीं मळकट दिसतात. पंतोजी तर त्यांच्या निर्मळपणाविषयीं तिळमात्रहि

काळजी ठेवीत नाहींत, ते आपला धडा शिकले ह्मणजे झालें, मग त्यांचे गुण कसेहि असोत! तर त्यांणीं असें करूं नये, मुलांस धुळींत व सर्दीच्या जाग्यांत, व जेथें दुर्गंधि येती तेथें कधीं बसवूं नये. त्यापासून त्यांच्या कोमळ शरीरास तात्काळ विकार होतात. दुसरी एक मोठी हानि होती, ती असी कीं, तीं अशा जाग्यांत बसूं लागलीं ह्मणजे त्यांची बुद्धिहि मळीण होती, मग तीं मतिमंद आळसी असीं होतात. जरी तीं धडा शिकलीं तरी त्यांच्या बुद्धीचा तेवढा प्रकाश होत नाहीं. जसें लहान झाडास चांगली जमीन व विपुळ पाणी असलें ह्मणजे त्यास पुष्कळ खांद्या फुटून, तो मोठा विस्तीर्ण वृक्ष होतो, तद्वत् लाहान मुलांस स्वच्छ जागा, आणि दुसरा निर्मळपणा असला ह्मणजे त्यांच्या बुद्धीस प्रतिदिवशीं नवे नवे अंकुर फुटत असतात, आणि तीं बुद्धिवान सुशील असीं होतात. मुलांकडून बाळपणांत विद्याभ्यास करविला असतां तो साध्य होण्यास जसा फार प्रयास पडत नाहीं, तसाच निर्मळपणा राखावयाचा नेम लावून दिला म्हणजे त्याप्रमाणें वागावयास त्यांस पुढें कठीण पडत नाहीं. मग जसीं जसीं तीं वाढत जातात, तसतसा तो गुण त्यांच्या आंगीं जडतो, आणि निर्मळपणा हा त्यांचा एक स्वाभाविक गुणच होतो. तोच गुण मोठेपणीं लावीन झटलें, तर लागणार नाहीं. मोठेपणीं असल्या लाहानशा नेमाकडेस मन लावणें फार कठीण पडतें, आणि जरी आपण मोठा प्रयास केला तरी तो यथास्थित साध्य होत नाहीं. यास्तव हे मुलानो! तुह्मी आपल्या अल्पवयांत या प्रकारच्या नेमाकडे लक्ष देऊन निर्मळपणा हा एक सद्गुणच आहे, आणि त्यापासून आपलें कल्याण आहे, असें समजा. जरी त्यापासून कोणकोणतीं सुखें उत्पन्न होतात, तीं तुमच्या दृष्टीस आतां आलीं नाहींत, तथापि तीं तुह्मास पुढें दिसतील. तुह्मी नेमानें वागूं लागलां ह्मणजे तुमचे लाहान भाऊबंध तुह्मासारिखेच वागतील, त्यांस शिकवायाचे श्रम तुह्मास पडणार नाहींत. मग घरांत कोणत्याहि प्रकारचा बेबंद होणार नाहीं, व सुखाची वृद्धि होत जाईल.

पशुपक्षीदेखील आपलें घर स्वच्छ ठेवण्यास झटतात, तर मनुष्यानें ठेवलें म्हणून नवल नाहीं. आमच्या घरासमोर लाहनसा बाग असून त्यांत एक बदामीचा रोंपा होता. त्यावर सन १८४८ सांत एका कंचुक पक्ष्यानें घरोटा बांधिला ह्या पक्ष्यानें घरोटा बांधायास प्रारंभ केल्यापासून त्यांत अंडीं घालून पिलें होऊन उडून जाईतोंपर्यंत मी नित्य ओटीवर बसून त्या पक्ष्यांचे सर्व व्यापार पाहात असें. त्याणीं प्रथम दोन चांगली बळकट या बदामीचीं पानें पाहून तीं मजबूत काथ्याचे तंतू आणून शिवून टाकिलीं. मग त्यांत कापूस पिसें व अनेक तऱ्हेचे मउ व उष्ण पदार्थ आणून आंत मऊ, स्वच्छ जागा केली. मग महिन्या पंध्रा दिवसानीं त्यांत आंडीं घातलीं. नंतर कांहीं दिवसांनीं तीं पिलें तयार झालीं. त्या वेळीं उभयतां त्या पिल्यांचीं आईबापें चोंचींत लाहान

जीव घेऊन पाळी प्रमाणें घरोट्यांत येऊन त्या पिल्यांस भरवीत. अणखी क्षणभर घरोट्याच्या कांठीं बसून तोंडांत कांहीं पदार्थ घेऊन उडून जात. असा हा प्रकार मी सतत आठ पंध्रा दिवस पाहिला. त्यावरून मी विचारांत पडलों कीं, हें काय असावें. पुढें एके दिवशीं पूर्ववत् त्या पिल्यांची आई भक्ष घेऊन आली आणि तो त्यांस भरऊन क्षणभर इकडे तिकडे फिरून नेहेमीप्रमाणें तोंडांत कांहीं घेऊन शेजारच्या भिंतीवर जाऊन बसली, आणि तेथें एक बीळ होतें, त्यांत तोंडांतील पदार्थ टाकिला. हें पाहातांच मी उठून लागलाच तेथें गेलों, तों मला मोठें आश्चर्य वाटलें कीं तेथें घरोट्यांतील मळ नेऊन जमविला होता. कांहीं दिवसांनीं पिलें उडून गेल्यावर जेव्हां तो घरोटा काढून पाहिला तेव्हां तो आंतून फार निर्मळ होता. याप्रमाणें मुकीं जनावरें निर्मळपणा ठेवितात. त्यांचीही वहिवाट पाहून जर मनुष्याने निर्मळपणा ठेविला नाहीं तर तो त्याचा दुर्गुण असें समजावें.

## शरीर निर्मळ ठेवण्यानें कोणकोणते लाभ होतात, व मळीणपणापासून कोणकोणती हानि होती, यांचा विचार

सर्व संपत्तीमध्यें शरीरसंपत्ती श्रेष्ठ, असी मानिली आहे. तर ती संपादन करून घेण्यास कोणकोणते उपाय आहेत, यांचा शोध केला पाहिजे. आपणास वरकड सर्व सुखें आहेत, आणि जर शरीर व्याधिग्रस्त आहे, तर तीं व्यर्थच. निरोगी शरीर असून दुसऱ्या कांहीं अडचणी असल्या तर त्या पुरवतात; यास्तव सर्व प्रकारेंकरून शरीर निर्मळ ठेवण्यास जपलें पाहिजे. मग त्यापासून कोणतीं सुखें निघतात तीं आपोआप अनुभवास येतील.

सकाळच्या प्रहरीं तोंड, हात, पाय, स्वच्छ धूत जावें, व अंघूळ करावी, मनुष्यास अंघूळीपासून मोठे लाभ होतात. या उष्ण देशांत तर लाहान मोठ्यांस स्नान हें शरीरास फार हितकारक आहे. स्नान केलें नाहीं तर हुशारी नसती, याचें कारण या उष्ण देशांत मनुष्यास फार घाम येतो, मग त्यावर रस्त्यांतील धूळ उडून शरीरास चिकटती, आणि शरीर मळीण होतें, तेणेंकरून मोठी इजा होती. घाम आला असतां त्याजवर धूळ बसली ह्मणजे ती शरीराच्या रोमरंध्रांत जाऊन शिरकती, तेणेंकरून तीं बंद होतात. रोमरंध्रें हीं शरीराचीं द्वारें आहेत, तींच बंद झालीं म्हणजे शरीर जड होतें. मग घाम निघत नाहीं; तो न आला म्हणजे शरीरास विकार होतात. आपण जें पाणी पितों, व दुसरे जे पदार्थ खातों; ते घामाच्या योगाने बाहेर निघतात. तेणेंकरून शरीरास विकृति होत नाहीं, शरीर हलकें असतें; आंगांत हुशारी येऊन आळस नाहींसा होतो, आणि शरीरप्रकृति वेळोवेळ बिघडत नाहीं.

स्नान कर्तेवेळीं अंग चांगलें चोळलें पाहिजे, उगीच डोक्यावरून तांबे ओतून घरांत येऊं नये. आंग चांगलें ह्मणजे रोमरंध्रांतील चिकटलेली धूळ निघून जाऊन शरीर स्वच्छ होतें, मग घाम येऊं लागतो, आणि हुशारी येती. लाहान मुलांस अंघूळ घातली म्हणजे त्यांच्या आंगीं चपलता येती; पाहा! आपण अंघूळ करितों तेव्हां आपणास किती समाधान वाटतें बरें! स्नान केलें म्हणजे शरीर स्वच्छ होतें, आणि झोंप स्वस्थ लागती. जीं मुलें मातींत खेळतात त्यांस तर दिवसांतून एकदोन वेळ अंघूळ अवश्य घातलीच पाहिजे, त्यावांचून त्यांस समाधान होणार नाहीं; स्नान घातलें म्हणजे धूळींत व वाईट जाग्यांत त्यांस जाऊं देऊं नये. त्यांच्या आंगास मळ लागला तर, तो लागलाच धुऊन टाकावा. आणि स्वच्छ वस्त्रानें त्यांस पुसावें. स्नानाविषयीं कोणी एकानें असी गोष्ट सांगीतली कीं, करनाटक देशांत कोणी मनुष्यास ज्वर आला म्हणजे त्यास ऊन पाण्यानें अंघूळ घालितात; आणि त्याचें अंग चांगलें चोळितात; व दुसरें कांहींच औषध देत नाहींत. असें केल्यानें त्या रोग्यास घाम येऊन त्याचा ज्वर जाऊन तो बरा होतो. याचें कारण उघड दिसून येतें कीं, त्या रोग्याच्या शरीरास मळ चिकटलेला असतो, त्या योगानें त्याचा घाम निघत नाहींसा होतो, तेणेंकरून ज्वरसंतप्त होऊन त्याची वृद्धि होती, त्यास अंघूळ घातली ह्मणजे आंगावरचा बसलेला मळ धुऊन जातो, मग रोमरंध्रें उघडीं होऊन घाम निघतो; घाम निघूं लागला ह्मणजे त्याजबरोबर ज्वरहि निघून जातो, आणि तो निरोगी होतो.

कोणाकोणाचें असें ह्मणणें आहे कीं, लाहान मुलांस निर्मळ ठेवून फळ काय? आतां धुतलीं तर तीं अर्ध घटिकेनें फिरून होतीं तशींच होतील, तर अशा समजुतीखाल त्यांस मळीण ठेवूं नये, त्यांस वेळोवेळ निर्मळ ठेवावें. कांहीं खाल्लें असतां त्यांस तेच हात आपल्या आंगास पुसूं देऊं नयेत. ते लागलेच धुऊन कोरडे करावे, जमिनीवर तर जमिनीवर, धुळींत तर धुळींत, असें भलत्याच ठिकाणीं त्यांस बसूं देऊं नये. सर्वकाळ निर्मळ जाग्यांतच बसवावीं. लाहान मुलें गैरशिस्तपणानें वागविलीं म्हणजे तीं सुस्त होतात, आणि कदाचित् त्या योगानें त्यांस एकादा रोगहि होतो, मग तो शेंकडों रुपये खर्च केले तरी एकाएकीं जात नाहीं. मुलें लिहावयास बसलीं म्हणजे त्यांच्या निर्मळपणाविषयीं पंतोजीनें फार जपलें पाहिजे; खडें वाळिवतेवेळी आंगावर शाईचे डाग पडूं देऊं नयेत, एकदां तीं मळीणपणानें वागूं लागलीं ह्मणजे तें त्यांस जन्मभर सुटत नाहीं.

शरीर स्वच्छ असलें ह्मणजे मनुष्याच्या आंगांत हुशारी येती, मन आनंदित असून, बुद्धि तीक्ष्ण असती; त्या पुरुषास कांहीं तरी चांगलें करावें असी उमेद येऊन उद्योग करावा असें वाटतें; चांगली क्षुधा लागती, अन्न पचन होतें; मग उद्योग जास्ती करवतो. मळकटपणानें बहुत नाश होतो. मळीण लोक बहुतकरून मंदमति,

व्याधिग्रस्त, गयाळ, असे असतात, त्यांच्या हातांस खरूज व अंगावर गजकरण इत्यादि होत असतें, ते द्रव्यवान असले तरी तेजःपुंज दिसत नाहींत; त्यांच्या मळीणपणामुळें त्यांजवर निरंतर दारिद्राची छाया पडती. दारिद्र त्यांजवर आपली सत्ता चालवायास सतत टपत असतें. मळीण लोकांच्या संगतींत बसायास, फिरायास व दुसरे कोणत्याहि प्रकारचा व्यवहार करायास लोक इच्छित नाहींत. पाहा! एकादें मूल कितीहि सुरेख व शाहाणें असून त्याच्या आंगावर; कितीहि जवाहीर असलें, तथापि तें जर मळकट असलें तर त्याच्या शाहाणपणावर व सुरेखपणावर कोणीहि लक्ष देत नाहींत. त्याच्या मळीणपणावरून सर्व गुणांचा लोप होऊन जातो. तेंच मूल गरिबाचें कां असेना! तें जर स्वच्छ आहे तर त्यास कोणास तरी घ्यावेंसें वाटतें.

आतां पाहा! ज्या देशांचे लोक निर्मळपणा ठेवितात, ते बहुतकरून, बुद्धिवान, चतुर, उद्योगी असे असतात. जे लोक प्रतिदिवशीं अंघूळ करीत नाहींत, व आपल्या शरीराचा, दुसऱ्या अनेक गोष्टीविषयीं शुचिर्भूतपणा ठेवीत नाहींत, त्यांच्या बुद्धीस, आणि जे लोक आपला निर्मळपणा ठेवितात, त्यांच्या बुद्धीस किती फेर असतो, तो पाहा! त्यांच्या व त्यांच्या मुलांबाळांच्या स्थितीकडे किंचित् लक्ष द्या! त्यांचें भाषण कोणत्या प्रकारचें असतें, व दुसरें आचरण कसें असतें, हें आमच्या दृष्टीस प्रतिदिवसीं पडतच आहे. विद्वान व्हावें, नवे नवे उद्योग करावे, असी त्या लोकांस इच्छा होत नाहीं, ते आपल्या मळीणपणाच्या भाराखालीं दबलेलेच असतात शरीराच्या मळीणपणामुळें त्यांच्या आंगीं सुस्ती येती, तेणेंकरून ते सर्वकाळ अज्ञानीच राहतात.

परम दयाळु परमेश्वरानें मनुष्यमात्रास निर्मळपणा ठेवण्यास दुर्भिक्षता न पडावी ह्मणून सर्व ठिकाणीं पाण्याची सामग्री पुष्कळ करून ठेविली आहे. गरीबगुरीब लोकांनीं हवा तसा निर्मळपणा ठेवावा ह्मणूनच त्याणें पाण्याचा एवढा सुकाळ करून ठेविला आहे. यथाकाळीं पाऊस पाडून प्रतिवर्षीं पाण्याची वृद्धि करून, ईश्वर लोकांस सुचना करितो कीं, तुह्मी आपल्या शुचिर्भूतपणांत कांहीं व्यंग पडूं देऊं नका. जी सामग्री ईश्वरानें आमच्या सुखासाठीं करून ठेविली आहे, तिचा जर आपण अनादर केला, तर तिजपासून आह्मास सुख कसें प्राप्त होईल? आपणास या पृथ्वीवर पुष्कळ सुखें मिळत नाहींत ह्मणून आम्ही वारंवार चडफडत असतों, याचें कारण काय तें पाहा! सुख प्राप्त होण्याचीं जीं साधनें ईश्वरानें आह्मास लावून दिल्हीं आहेत, त्याप्रमाणें आह्मी करीत नाहीं, आणि तें प्राप्त होत नाहीं, ह्मणून ईश्वरास दोष कां लावावा? आमचें निमें आयुष्य तर आळसांतच जातें, आणि हा आळस एका मळीणपणापासून उत्पन्न होतो. मग त्याच्या मागून सर्व विपत्ती हळूहळू घरांत शिरतात. यास्तव जे जे नेम भगवंतानें आमच्या कल्याणासाठीं लावून दिल्हे आहेत, ते यथास्थित चालवावे; ह्मणजे आपणास इहलोकीं, व परलोकीं सुख प्राप्त होईल.

जेव्हां आपण एकाद्या नेमनिष्ठेनें आणि निर्मळपणानें चालणाऱ्या गृहस्थास पाहतों, तेव्हां आपणास असा भास होतो कीं, हा कोणी सुशील, कर्मनिष्ठ, ईश्वरभक्त असावा. तो मग कसाहि असो, परंतु लोक त्याचा निर्मळपणा पाहूनच त्याच्या सद्गुणाचें अनुमान करितात. निर्मळ लोक सर्व सुशीलच असतात, असें माझ्यानें ह्मणवत नाहीं; परंतु जरी ते चांगले नसले तरी लोकांस ते चांगलेसे दिसतात; आणि बहुधा जो मनुष्य शरीर निर्मळ ठेवायास जपतो, व नेमनिष्ठेनें वागतो, तो ईश्वरास भिऊन चालत असतो. तेव्हां जो निर्मळपणा लोकांस इतका आवडतो, तो देवास किती आवडत असेल बरें !

## खाण्यापिण्याचा कोणकोणत्या प्रकारचा निर्मळपणा ठेवावा व त्यापासून काय लाभ होतात, त्यांचा विचार

प्राणिमात्राचें संरक्षण अन्नापासून होतें. यास्तव अन्न हें सर्वांस अवश्यकच आहे. "अन्नमय प्राण, प्राणमय शक्ति, आणि शक्तिमय पराक्रम," असी एक ह्मण आहे. परंतु जें अन्न आपण खातों तें निर्मळ, आणि हितकारक असलें पाहिजे, नाहीं तर त्यापासून आपली उलटी हानि होती. याजवरूनच असी ह्मण आहे कीं, "अन्न तारी अन्न मारी," जें अन्न आपण खातों तें परिपक्क झालेलें असलें, आणि जसें असावें तसें असून तें जर बेतानें खात गेलें; तर त्यापासून शरीराचें रक्षण होऊन रक्तवृद्धि होऊं लागती; व बुद्धिहि प्रकाशीत होती, असे नाना प्रकारचे लाभ होतात. तेंच अन्न अर्धकच्चे, मळीण, व भलतेच प्रकारचें असून मनस्वी खाल्लें असतां त्यापासून शरीरास सुस्ती, व नाना प्रकारच्या व्याधि होतात, यास्तव विचार केल्यावांचून भलतेच पदार्थ खाऊं नयेत.

जेवायास स्वच्छ जाग्यांत बसत असावें, व त्याप्रमाणेंच त्या वेळीं आपल्या शरीराचाहि निर्मळपणा असावा. जर आपण मळीण हातांनीं कांहीं पदार्थ खाल्ले, तर तो मळ त्या पदार्थांबरोबर आपल्या पोटांत जाऊन विकास करितो. आणि आपला मळीणपणा पाहून दुसऱ्या लोकांसही वीट येत असतो. यास्तवच ब्राह्मण इत्यादि लोकांत हातपाय धुऊन सोवळें नेसून जेवायास बसावें, असा नेम लावून दिल्हा आहे; असा जर नेम लावून दिल्हा नसता, तर लोकांच्या मळीणपणाची उत्तरोत्तर फारच वृद्धि झाली असती.

जेवायास बसलें ह्मणजे जे पदार्थ ज्या ठिकाणीं वाढावे, ते त्याच ठिकाणीं वाढावे; भलताच पदार्थ भलत्या ठिकाणीं वाढूं नये. सर्व पदार्थ एका पोटांत जातात; ह्मणून सर्व एकत्र करून एकदम स्वाद न घेतां खाऊं नयेत. प्रत्येक पदार्थांचा स्वाद घेऊन स्वस्थपणीं जेवीत असावें. उतावळीनें कोणताहि पदार्थ खाल्ला असतां,

त्याचा चांगला रस होऊन पचन होत नाहीं; तो अर्धकच्चा आपल्या पोटांत राहिला असतां, त्यापासून विकार होतात, जठराग्नि मंद होऊन चांगली क्षुधा लागत नाहीं. जेवायास बसलें असतां, आपणास लागेल तितकेच पदार्थ घ्यावे, स्वार्थानें पुष्कळ घेऊन पानावर टाकूं नयेत, आणि आपलें पान स्वच्छ ठेवावें. पानावर पदार्थ घेऊन टांकले ह्मणजे एक तर अन्नाचा नाश होतो, आणि जे पंक्तींत, दुसरे कोणी जेवायास बसले असतील, त्यांस तें पान पाहून वीट येतो, आणि यापासून दुसरी एक हानि आहे, ती असी कीं, पानावर जे उष्टे पदार्थ आपण टांकितों, ते कोणाच्या उपयोगीं पडत नाहींत, ते केवळ उकिरड्यांवर टांकावे लागतात; मग ते पदार्थ तेथें एक दोन दिवसांनीं कुजून गेले असतां त्यापासून दुर्गंधि निघती; मग ती हवेंत मिश्रित होऊन, लोकांच्या पोटांत शिरलीं असतां, तिजपासून फार उपद्रव होतात. कितीएका वैद्यांचें असें ह्मणणें आहे कीं, अशा प्रकारच्या हवेपासून पटकी इत्यादि महा रोग उत्पन्न होतात.

मुलांनीं खाण्यापिण्याविषयीं फार निर्मळपणा आणि नेम ठेविला पाहिजे, मिळेल तें खाऊं नये, फळें अर्धकच्चीं, तर अर्धकच्चीं अथवा नासलेलीं तर नासलेलीं, असीं कधींहि खाऊं नयेत. जेवतेवेळीं स्वस्थपणें जेवावें; अतिशय खाऊं नये, थोडीसी भूक राखून उठावें. एक शाहाणा गृहस्थ असें म्हणतो कीं, “हे गृहस्था, जेवावयास बसला असतां तूं भूक ठेवून उठ ह्मणजे तुला भूक नाहीं असें कधीं होणार नाहीं.” एकादा पदार्थ गोड लागला ह्मणून सुमार न पाहतां अधाशीपणानें खाऊं नये. पाणी निर्मळ भांड्यानें पीत असावें.

मुलानो! तुह्मी शाळेंत गेल्यावर तुह्मास भूक लागेल ह्मणून कांहीं विकत घेऊन खायाकरितां घरांतून पैसे दिल्हेले असतात, त्यांचें भलतेंच घेऊन खाऊं नका; आणि रस्त्यांत खात जाऊं नका. वटाणे, भुयमुगाच्या शेंगा, व दुसरीं कोणत्याहि प्रकारचीं खाणीं खिशांत घालून शाळेंत नेऊन धडा पाठ करतेवेळीं व दुसरीं कोणतींहि उदाहरणें शिकतेवेळीं ते खात जाऊं नका; ज्या मुलाचें खाण्यावर चित्त, त्याचें शिकणेंहि होत नाहीं. म्या कोठें कोठें असें पाहिलें आहे कीं, कित्येक मुलें वर्गांत शिकत असतां पंतोजीची नजर चुकवून हळुच खायाचा पदार्थ तोंडांत घालितात. अशा खाण्यामुळें केवढी हानि होती ती पाहा! धडा पाठ होत नाहीं, व पंतोजीनें खातेवेळीं पाहिलें असतां, तो त्या मुलांस शिक्षा करितो, आणि त्यांजवर त्याची अवकृपा होती, मग मुलांमध्यें त्याची फजिती होती. खाल्लेले हात वस्त्रांस लागले ह्मणजे तीं बिघडतात, आणि वाचायाचीं पुस्तकेंहि मळतात. चोरून खाल्लेला पदार्थ स्वस्थपणीं खायास अवकाश मिळत नाहीं, त्यामुळें उतावळीनें गिळावा लागतो उतावळीनें गिळिलें असतां, तो बरोबर पचला जात नाहीं. आणि जे पदार्थ खाल्ले त्यांचा त्यांस स्वादहि चांगला

लागत नाहीं, मग शरीरास त्यापासून विकृति होती. यास्तव जर आपणास भूक लागली आणि शाळेंत कांहीं तरी खायाचें पडलें तर सुटी झाल्यावर जे पदार्थ खायाचे मनांत असतील ते घेऊन स्वस्थ एकीकडे बसून खावे आणि हात स्वच्छ धुतल्यावर फिरून आपल्या उद्योगास लागावें. येणेंकरून आपला निर्मळपणा राहतो. अर्धकच्चीं शिताफळें, हिरवे पेरू, व आंबट आंबे, असे भलते व मनास वाटतील ते पदार्थ घेऊन विचार केल्यावांचून कधींहि खाऊं नयेत. असे पदार्थ एक तर खायास चांगले लागत नाहींत, आणि दुसरें, उलटा अपकार करितात. अर्धिंचे चणे घेऊन शिकतेवेळीं खाल्ले असतां, ही अगदीं अल्प गोष्ट आहे; येणेंकरून मुलांस काय दुर्गुण लागणार आहेत ! असें ह्मणून त्या गोष्टीकडेस डोळेझांक करूं नये. असी गोष्ट पाहिली असतां पंतोजीनें त्या मुलांस प्रथमतः युक्तीनें तसें न करावें ह्मणून बोध करीत असवा; असें करीत असतांहि जर तसेच करूं लागले, तर त्यांस यथायोग्य यथाकाळीं शिक्षा करीत जावी, याविषयीं पंतोजीनें आळस करूं नये. असल्या लाहानसहान गोष्टीकडे लक्ष दिल्हें नसतां, मुलें बिघडत जातात, आणि त्या दोषाचा अधिकारी पंतोजी होतो.



## पोशाक, अंथरूण, पांघरूण स्वच्छ ठेवण्यामुळें कोणकोणते लाभ होतात, व ते ठेवायास कोणते उपाय केले पाहिजेत, यांचा विचार

वस्त्रापासून मनुष्याचें शरीरमात्र आच्छादित होतें इतकेंच नाहीं, परंतु तें थंडी-पासून आणि हवेपासून त्याचें संरक्षण करितें; स्वच्छ वस्त्रें पांघरण्यांत किती भूषण आहे, आणि त्यापासून किती लाभ होतात ते पाहा. शरीर निरोगी असून लोकांमध्यें बहुमान मिळतो, राजदरबारांत जाण्यासदेखील त्यास परमाणगी लागत नाहीं. या प्रकारचे अनेक लाभ होतात.

निर्मळ पोशाख करायास केवळ फार द्रव्य पाहिजे, किंवा वस्त्रें फार बारीक व उंची असलीं पाहिजेत, असें नाहीं. ज्या स्थितींत ईश्वरानें आपल्यास ठेविलें आहे त्या स्थितींतच असून स्वच्छपणा ठेवितां येतो; जाडीं वस्त्रें असलीं तरी तीं स्वच्छ करून यथास्थित वापरावीं यांतच स्वच्छपणा आहे.

निर्मळपणा हा वस्त्र वागविण्याकडे आहे, वस्त्राच्या किमतीचा, आणि त्याचा कांहीं संबंध नाहीं. नेसावयास महेश्वरी धोतरजोडा असला ह्मणजे केवळ निर्मळपणा राहतो, असें नाहीं, घांटी पंचा कां असेना, तोच वारंवार धुऊन स्वच्छ ठेवीत असावा, आणि चांगल्या निऱ्या घालून नीट नेसत जावा, तसेंच पागोटें पैठणी न मिळालें आणि सुरती जरी असलें तरी तें चांगलें बांधून डोकीस घालीत असावें, साहासाहा

महिने पागोटें बांधून झाले आहेतच, त्यांत उवानीं आंडीं घातलीं आहेतच, त्याजवर धूळ उडाली आहेच, व तें घामानें मळून कुजून गेलेंच आहे, व पदर सुटून पडतोच आहे, असा अव्यवस्थितपणा ठेवूं नये. याचप्रमाणें दुसऱ्या वस्त्राची व्यवस्था मनांत आणीत असावी; धोतर अर्धें आंगावर आहे, अर्धें जमिनीवर लोळत आहे, असें करूं नये. वस्त्रें बाताबेताने वापरलीं असतां त्यांची किम्मत राहून आपणास प्रतिष्ठा येती. आणि तीं वस्त्रेंहि पुष्कळ दिवस टिकतात, तेणेंकरून द्रव्याचाहि फार खर्च होत नाहीं. आंगरखा, बंडी, इत्यादि वस्त्रें परटाकडे टाकावयास आळस करूं नये, ओलीं वस्त्रें कधीं आंगावर घेऊं नयेत त्यांपासून शरीराची फार खराबी होती. आपल्या आंगावरलीं वस्त्रें नीट राखावीं, भलत्याच ठिकाणीं, जिकडे धूळ पडली असेल, व पाणी सांडलें असेल, अशा ठिकाणीं अव्यवस्थितपणें बसूं नये. ज्या जाग्यावर आपणास बसावयाचें असेल ती जागा निर्मळ असल्यास तेथें बसावें. आंगरखा किंवा कोणतेंहि वस्त्र फाटलें असतां, तें लागलेंच शिववावें. याजवर असी एक ह्मण आहे कीं, "एक टांचा समयीं मारल्यानें तो नव टांचे वांचिवतो. हरएक पांघरूणाला डाग पडले असतां ते वेळोवेळ धुऊन टाकावे. लिहिते-वेळीं आपल्या बोटांस व वस्त्रांस शाई लागूं देऊं नये. मोठे मोठे व्यापारी, किंवा सरकारी कामदार लोक जेव्हां कारकून ठेवितात, तेव्हां ते त्यांची विद्या तसाच निर्मळपणाहि पाहत असतात आणि ज्यांच्या आंगरख्यास किंवा बोटास शाई लागली आहे; व ज्यांचीं वस्त्रें मळीण आहेत असें जेव्हां पाहतात तेव्हां ते त्यांच्या स्वाधीन एकाएकीं मोठ्या कामाच्या वह्या, व कागदपत्रें द्यावयास शंका पावतात. एखादा कारकून स्वतां जरी फार हुशार नसला, तरी तो आपल्या डौलावरूनच एखाद्या वेळीं पार पडून जातो, सारांश निर्मळपणा द्रव्य मिळविण्यासहि एक साधन होतो.

कितीएक लोकांचा असा वेडा समज आहे कीं, एकादा स्वच्छ वस्त्रें पांघरावयास लागला ह्मणजे त्यास हा उधळ्या, छानछोक असा शब्द लावितात. यास्तव कित्येक लोक आपला साधेपणाचा दाखवावा, आणि दुसऱ्यापासून साधेपणाचा किताब मिळवावा सबब मळीण वस्त्रें पांघरतात. पागोटें चांगलें असलें तरी तें वारंवार बांधीत नाहींत, आणि त्याजवर चहूंकडे धूळ बसलेली तसीच असती. हा किती मूर्खपणा आहे बरें! पाहा! हे लोक मळीणपणा तो साधेपणा, आणि निर्मळपणा तो उधळेपणा, असें मानितात. साधेपणास आणि मळीणपणास जमीन अस्मानाचें अंतर आहे. तसेंच स्वच्छपणास आणि छानछोकपणासहि अंतर आहे. तसेंच छानछोकी करणें हा वस्त्राकडे दोष नाहीं; तो त्यांच्या अंःतकरणाचा धर्म आहे. कितिएक लोक असे आहेत कीं आंगावर धड वस्त्रेंहि नसतात तथापि ते आपला छानछोकपणा कधींहि सोडीत नाहींत. कोणी लोक असें ह्मणतात कीं, निर्मळ वस्त्रें वापरलीं ह्मणजे दिवाळखोरी होती, व

वस्त्रें धुवावयास द्रव्यव्यय व्यर्थ होतो. आठ चार दिवसांनीं वस्त्रें धुवावयास टाकिलीं ह्मणजे परटाची मात्र धन होती, आणि वस्त्रें लवकरच फाटून जातात. अशा नाना प्रकारच्या कल्पना काढून ते मळीणपणांतच राहतात. तर अशा वेड्या समजुती काढूं नयेत; सर्वकाळ लोक जर द्रव्याकडेसच पाहून व्यवहार करूं लागतील तर त्यांस इच्छिलेलीं फळें प्राप्त कधींहि होणार नाहींत. वस्त्रें फार मळविलीं ह्मणजे तीं लवकर फाटतात, व धुवावयासहि फार श्रम पडून तीं स्वच्छ होत नाहींत, आणि मळीण वस्त्रें आंगावर असलीं ह्मणजे त्यांपासून अनेक विकार होऊन सभ्य लोकांत त्यास यथायोग्य मानहि मिळत नाहीं, यास्तव मळकीं वस्त्रें पांघरल्यानें कांहींच किफायत होत नाहीं, उलटी हानि मात्र होती. एकवेळ म्या असें पाहिलें आहे कीं, कोणी एका गृहस्थानें नागपुरी धोत्रजोड्याचें एक पान विकत घेतलें होतें, आणि तें तो कोरेंच पांच साहा महिने नित्य वापरीत असे; मग थोडक्याच दिवसांनी तें धोतर घाम लागून व त्याजवर मळ बसून कुजून गेलें, आणि आपोआप त्याचे तुकडे पडूं लागले. याप्रमाणें त्या धोत्राची अवस्था झाली; तेंच धोतर जर वारंवार धुतलें असतें तर एक वर्षपर्यंत टिकलें असतें. मळीण वस्त्रें आंगावर घेतलीं ह्मणजे त्यांचा मळ शरीरास लागतो, आणि त्याच्या योगानें शरीराचीं रोमरंध्रें बुजतात. तेणेंकरून घाम येत नाहींसा झाला ह्मणजे शरीर व्याधिग्रस्त होतें.

गरीबगुरीब ज्यांस खाण्यापिण्यांचे हाल, ज्यांस वेळेच्या वेळीं अन्न मिळत नाहीं, त्यांणीं परटास द्यावयास पैसे कोठून आणावे ? व वस्त्रें कशानें घ्यावीं ? असें कोणी ह्मणेल, तर गरीब लोकांनीं आपलीं वस्त्रें परटाकडेसच द्यावीं, असें माझें ह्मणणे नाहीं; त्यांणीं तीं स्वतः घरीं धुवावीं, मग ती फाटकीं कां असतना, तीं वेळोवेळीं धुऊन स्वच्छ राखावीं ह्मणजे झालें. आपण निर्मळ असावें असें त्यांच्या मनांत मात्र असलें पाहिजे, मग ते हरप्रयत्नेंकरून त्याप्रमाणें चालतील. असें करण्यास त्यांस फारसी खटपटहि पडणार नाहीं; एक दोन दिवसांनीं एक दोन घटिका मेहेनत घेऊन आपलीं वस्त्रें धुवावीं. यासाठींच ईश्वरानें पाण्याचा सुकाळ करून ठेविला आहे. गरीब लोकांनीं निर्मळपणा ठेविला ह्मणजे त्यापासून त्यांचें कल्याण होतें. एक तर शरीर निरोगी असतें; आणि दुसरें, त्यांचा निर्मळपणा पाहून श्रीमंत लोक त्यांचा तिरस्कार करीत नाहींत. त्यांची कांहीं दुःखाची गोष्ट असली, तरी ती यथास्थित ऐकून घेतात. त्यांचा निर्मळपणा पाहून, दोन आणे द्यावयाचे असले तर चार आणेहि देतात. यास्तव गरीब लोकांनीं आपल्या निर्मळपणाविषयीं फार सांभाळिलें पाहिजे. गरीब आहे, आणि तो जर अतिशय घाणेरडीं वस्त्रें पांघरलेला असला, आणि त्याचें अचरण मळीण असलें, तर त्यास कोणी दारांत उभें करीत नाहींत; त्याचें कितीहि दुःख असलें, तरीं त्याच्या अमंगळपणामुळें लोकांचें अंतःकरण एकाएकीं द्रवत नाहीं.

कोणी असें ह्मणतात कीं, लाहान मुलांस स्वच्छ वस्त्रें घालून उपयोग नाहीं, कारण

त्यांस आपण कितीहि जपलों, तरी तीं एका घटिकेंत मळवून टाकितात. त्यांस स्वच्छ काय, आणि मळीण काय ! तर असें ह्मणू नये, लाहान मुलांस सर्वकाळ निर्मळ वस्त्रें घातलींच पाहिजेत; त्यांच्या नाजूक शरीरास मळ न लागावा ह्मणून फार सांभाळिलें पाहिजे. त्यांस जर मळीण वस्त्रें पांघरायास व आंथरावयास घातलीं तर त्यांचा मळ त्यांच्या आंगास लागतो. तेणेंकरून तीं अशक्त, निर्बुद्धि, आळसी, रोगी अशीं होतात. यास्तव त्यांचीं वस्त्रें मळलीं ह्मणजे तीं काढून लागलींच स्वच्छ घालावीं, असा बेत ठेविला असतां, तीं मुलें चपळ, बुद्धिवान, निरोगी, बळकट, अशीं होतात; आणि मोठेपणीं आपल्या आपण नेमानें वागायास लागतात. मुलांस आंगरखे, बंड्या व इतर वस्त्रें पुष्कळ करून ठेवावीं. कित्येक असे आहेत कीं, शक्ति असूनहि मुलांस हवीं तेवढीं वस्त्रें करीत नाहींत. वर्षांतून एक दोन आंगरखे व बंड्या देऊन, तेवढ्यांतच आपला काळक्षेप करा, असें सांगतात.

पायांत जोडा घालणें हें शरीरास मोठें हितकारक आहे, अनवाहणी चालण्यामुळें पाय धुळीनें व चिखलानें व दुसऱ्या अमंगळ वाईट मलादिकानीं भरतात. मग तशाच पायांनीं आपण चालून आलों ह्मणजे ती घाण घरांत येती. दुसरें, अनवाहणी उन्हांत फिरलें असतां नेत्रांस उष्णता होती, आणि ओलांत फिरलें असतां सर्दीपासून विकार होतात. जोडा पायांत घालतेवेळीं स्वच्छ झाडून पुसून घालावा. त्यांत घामाचा मळ, माती असूं देऊं नयेत. तो फाटूं लागला ह्मणजे लागलाच शिवून घालीत असावा. जोडा पायांचें रक्षण असून, शोभा देणाराहि आहे; जोडा निर्मळ राखावा ह्मणून तो केवळ आपल्या तोंड पुसावयाच्या रुमालानें पुसूं नये. तो पुसावयास एक निराळेंच फडकें करून ठेविलें पाहिजे. जशी वस्त्रांची जतन करावी तशीच जोड्यांचीहि जतन करीत असावी; आपण कितीहि श्रीमंत असलों, तथापि ज्या रीतीनें सभ्य लोक चालतात त्याच रीतीनें चालावें भलतेंच मनास येईल तें करूं नये.

मुलांस चांगलीं उंचीं स्वच्छ वस्त्रें पांघरायास दिल्हीं असतां, त्यांपासून त्यांस अहंकार न होऊं देण्यास फार जपून त्यांला छानछोकी करूं देऊं नये. आणि हवीं तसीं अव्यवस्थितपणानें वस्त्रें वापरूं न देतां तीं नेमानें वापरायास देत असावीं. पागोटें बिनीदार, आंगरखा चुणीदार, कांसोटा तंगदार, असा रिकामा नखरा त्यांस करूं देऊं नये. उंच उंच वस्त्रें, व दुसरे अलंकार नेहेमी लाहान मुलांच्या आंगावर घातले असतां, त्यांचें लक्ष विद्येवर व आपली बुद्धि वाढविण्याकडे लागत नाहीं. सर्वकाळ त्यांचें मन आपल्या पोशाकाकडे व अलंकाराकडेसच लागतें; मग तीं छानछोकी करावयास शिकतात. ती असी कीं, पोशाक चांगला, आणि अलंकारहि उत्तम आहेत, असें पाहूनच तीं मनांत तल्लीन होऊन गर्व करूं लागतात, आणि गरीबगुरीबांचीं मुलें ज्याणीं जाडीं वस्त्रें घातलीं असतील तीं आपणापेक्षां केवळ कमी असें मानितात, त्यांस असें

वाटतें कीं, जो मोठेपणा काय तो उंच पोशाकाकडेसच आहे, असें समजून तीं दुसऱ्या कोणत्याहि सद्गुणाकडे लक्ष देत नाहींत. यास्तव मुलांस नेहेमी वापरायास सामान्य वस्त्रें द्यावीं, तीं मळकट मात्र नसावीं, एखादे वेळीं जुना आंगरखा असला तरी तो त्यांस घालावयास द्यावा. त्यांचीं वस्त्रें फार तंग असूं नयेत, तीं कांहीं सैल असावीं. सारांश पोशाकावरून, व खाण्यापिण्यावरून, व विद्येवरून किंवा दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीवरून मुलांस अहंकार होऊं देऊं नये. हा दुर्गुण त्यांस न लागावा, ह्मणून कुटुंबांतील सर्व मनुष्यांनीं फार जपत असावें; जेणेंकरून त्यांच्या मनांत नम्रता येई असें करावें, मग त्यांच्या आंगावर कितीहि उंच वस्त्रें व अलंकार असले, तथापि त्यांपासून त्यांस अहंकार होणार नाहीं, आणि त्यांचा जन्म सफल होईल.

ज्याप्रमाणें मनुष्यास अन्न वस्त्र अवश्यक आहे, त्याचप्रमाणें निद्राहि अवश्यक आहे. परंतु ती नियमित असावी, जे सगळा दिवस श्रम करितात, त्या श्रमाचा परिहार रात्रीं झोंप घेतल्यानें होतो, तेणेंकरून आंगीं हुशारी येऊन कामकाज करावयास शक्ति येती; आणि शरीर निरोगी असतें. तीच झोंप जर फार घेतली तर तिजपासून विकार होतात; आंगीं सुस्ती येती, खाल्लेले पदार्थ जिरत नाहींत, उद्योग करवत नाहीं, मग तो मनुष्य दारिद्राच्या स्वाधीन होतो. जर झोंप अगदीं थोडी घेतली तर तिजपासून फार उपद्रव होतात. डोळ्यांस त्रास होऊन शरीरांत उष्णता होती, अन्न जिरत नाहीं, असे नाना प्रकारचे रोग उत्पन्न होतात; यास्तव निद्रा परिमित घेत असावी. आपणास निद्रेपासून सुख प्राप्त व्हावें, व ती यथास्थित लागावी ह्मणून जीं साधनें आहेत तीं सिद्ध असलीं पाहिजेत. निजावयाची जागा निर्मळ असून अंथरूण स्वच्छ असावें, त्याजवर धुतलेली चादर घालावी, ती मळकट असूं नये, मळकट वस्त्रें बिच्छान्यावर घातलीं असतां त्यांचा मळ शरीरास लागतो, तेणेंकरून शरीरास विकार होतात. दोन चार मुलें एकाच ठिकाणीं लाहानशा बिच्छान्यावर निजवूं नयेत. निजावयास जाण्याच्या पूर्वीं आपल्या हातपायांस मळ लागला असला तर तो धुऊन टाकावा, आणि स्वच्छ वस्त्रानें ते पुसावे. रोगी मनुष्यास तर निजावयास बिच्छाना फार स्वच्छ असला पाहिजे. तो वेळोवेळ झाडून स्वच्छ करीत असावा; चादर मळली ह्मणजे ती लागलीच धुऊन आणून त्यावर घालावी. रोगी मनुष्यांस निर्मळ ठेविलें ह्मणजे ते हुशार असतात, त्यांचा रोग एकाएकीं बळावत नाहीं. मळीणपणा असला ह्मणजे त्यांचीं मनें व्यग्र होऊन रोग वृद्धिंगत होतात.



## अंतःकरणाच्या निर्मळपणाच्या अवश्यकतेचा विचार

मनुष्याच्या शरीरामध्यें अंतःकरण हें राजा आहे, आणि तेंच जर स्वच्छ नसलें तर त्याचा बाह्य स्वच्छपणा कांहींच उपयोगाचा नाहीं. असला स्वच्छपणा, प्रेतावर नाना प्रकारचे अलंकार घालून शृंगारण्यासारिखा आहे, किंवा, टोणग्याच्या गळयांत फुलांचे हार घालण्यासारिखा आहे, असें समजावें. अंतःकरण स्वच्छ करून आपल्या आंगीं सुशीलता आणण्यास जर बाह्य निर्मळपणा उपयोगी पडेल तरच त्याचें फळ; नाहीं तर त्यापासून जीं अनेक सुखें प्राप्त व्हायाचीं तीं होणार नाहींत; यास्तव अंतःकरण पहिल्यानें शुद्ध असावें, ह्मणजे दुसरा बाह्य निर्मळपणा सहजच येईल. अंतःकरणाची स्वच्छता, आणि बाह्य निर्मळपणा हीं दोन्हीं एके मनुष्यामध्यें मिळालीं ह्मणजे त्याच्या सुखाला पार नाहीं. त्या मनुष्यास ऐहिक आणि पारलौकिक सुखें प्राप्त झालींच, असें समजावें. अंतःकरण शुद्ध नसून दुसरें चांगले गुण आंगीं असले तरी त्यापासून बहुतकरून अभिमान मात्र उत्पन्न होतो, आणि तेणेंकरून सर्व सुखांचा नाश होतो.

मनुष्याच्या अंतःकरणास जन्मापासून अहंकार, विनाकारण क्रोध, लोभ, मत्सर, निर्दयपणा, कपट, असे नाना प्रकारचे दुर्गुणरूप जे मळ जडलेले असतात, ते काढून टांकल्याशिवाय स्वच्छपणा कोठून प्राप्त होईल ? ईश्वराच्या सृष्टींत सगळीं माणसें जन्मापासून अपराधी आहेत, तर या अपराधाची क्षमा व्हावी, ह्मणून त्यानें जे उपाय शास्त्रांत योजिले आहेत ते केले पाहिजेत; नाहीं तर त्या अपराधांची क्षमा, आणि अंतःकरणाची शुद्धता होणार नाहीं. मनुष्याच्या पापाच्या दंडाची क्षमा व्हावी; आणि त्यांचीं अंतःकरणें शुद्ध व्हावीं ह्मणून परम दयाळु परमेश्वरानें जो मार्ग लावून दिल्हा आहे, त्याच मार्गानें चालावें ह्मणजे ईश्वरी कृपा होऊन अंतःकरणाचीहि शुद्धि होईल. ईश्वरप्रणीत शास्त्रावांचून तो मार्ग भलत्याच शास्त्रांत सांपडणार नाहीं, यास्तव मनास येईल त्या मार्गानें जाऊं नये; भलत्याच मार्गानें गेलें असतां, पापाचा परिहार होणार नाहीं. परंतु उलटी हानि होऊन ईश्वरी क्षोभ मात्र होईल. अंतःकरणाची शुद्धता ईश्वरकृपेवांचून होणार नाहीं; तर ती संपादन करून घेण्यास सर्वांनीं झटून उद्योग करावा ह्मणजे ती प्राप्त होईल. हा मळ धुऊन टांकावयास आपणास शक्ति यावी ह्मणून अनन्यभावेंकरून परमेश्वरास शरण जावें. आपल्या अंतःकरणांत शांति, क्षमा, दया, सहनशीलता, दातृत्व, न्याय, प्रमाणिकपणा, सत्य, परोपकार, औदार्य, आणि लीनता, इत्यादि सद्गुणांची उत्तरोत्तर वृद्धि व्हावी ह्मणून परमात्म्याची आराधना करावी. हे गुण अंतःकरणाचीं भूषणें आहेत, आणि जर हे त्याजमध्यें नाहींत, तर त्याच्या मळीणपणाकडेस कोणाच्यानेंच पाहवणार

नाहीं. आणि अशा मळीणपणाखालीं बाह्य निर्मळपणा कितीहि असला तरी तो झांकून जातो. यास्तव सर्वकाळ जें चांगलें तेंच करीत जावें; असत्य भाषण कधीं करूं नये चांगल्या लोकांचाच सहवास करीत असावा, दुर्गुणी लोकांच्या संगतींत कधींहि जाऊं नये, गेलें असतां ते त्यास आपणासारिखेच करितील. यावरूनच "संगतिः संगदोषेण" असें वचन आहे.

चांगले गुण मुलांच्या आंगीं सर्वकाळ वसावे, ह्मणून आईबापांनीं व घरांतील सर्व मनुष्यांनीं प्रयत्न करीत असावा; चांगले गुण त्यांच्या आंगीं लहानपणापासून थोडे थोडे लावीत गेलें ह्मणजे ते कदाचित् मोठेपणीं एकाएकीं त्यांच्या अंतःकरणांतून जाणार नाहींत; ते त्यांच्या शरीरास वज्रलेपासारिखे जडून जातात. मुलांस चांगल्या गुणाचें कांहीं तरी आचरण घडावें ह्मणून त्यांच्या समक्ष जें चांगलें कर्म, तेंच करीत जावें. मग तीं सहज तसींच करूं लागतील. विनाकारण कोणावर राग न करितां तोंडांतून अपशब्द कधीं काढूं नयेत; भिकारी दारांत आला असतां, त्यास हांकून न देतां आपल्या शक्त्यनुसार कांहीं तरी देत असावें. घरांत जिकडे तिकडे नम्रतेचीं भाषणें बोलत असावीं; लाहान मुलांदेखतां अहंकाराचें भाषण आपण केलें असतां, तो दुर्गुण त्यांस लागलाच जडतो, मग तीं द्वाड होऊन भाऊ, बहिणी, शेजारी वासारी, चाकर चुकर यांस शिव्या देण्यास आरंभ करितात. असें केल्यानें तीं मोठेपणीं वजनदार प्रतिष्ठित असीं होत नाहींत, परंतु टवाळ आणि छांदस असीं होतात.

नम्रता, ही एक मनुष्यास मोठें भूषण आहे, परंतु ती खरी मात्र असावी, त्यांत कृत्रिम अगदीं नसावें; मग तो तिजपासून सर्वांस मान्य होतो. अविचारी लोकांस असें वाटतें कीं, आपण नम्र झालों ह्मणजे आपल्यास लाहानपणा येतो, तर आपण सर्वकाळ आपल्या डौलांतच राहावें; असे ज्यांचे समज असतील ते केवळ अज्ञानी आहेत असें समजावें; पाहा! एखाद्या वृक्षास पुष्कळ फळें लागली ह्मणजे त्याच्या डहाळया त्या फळांच्या भारानें भूमीवर लोळूं लागतात; त्याप्रमाणें मनुष्यांस सद्गुण, विद्या व द्रव्य, हीं फार प्राप्त झालीं ह्मणजे त्यांपासून त्याच्या आंगीं नम्रता यावी तरच त्या द्रव्याचा, सद्गुणाचा व विद्येचा उपयोग; नाहीं तर तीं असून तरी फळ काय? मनुष्याच्या सद्गुणावरूनच त्याच्या विद्वत्तेची परिक्षा बहुतकरून होती; मोठा विद्वान् असून तो जर गर्विष्ट आहे, तर त्यास कोणी विचारीत नाहीं. अहंकाराइतका दुसरा वाईट दुर्गुण मनुष्याच्या अंतःकरणास जडलेला असा कोणताहि नाहीं. आणि तो ईश्वरास तर तिलमात्रहि साहत नाहीं. मनुष्यास अहंकार उत्पन्न झाला, ह्मणजे तो त्याचा हरएक रीतीनें नाश करितो. "अहंकाराचें घर खालीं" असी एक ह्मण आहे. एक ज्ञानी पुरुष असें ह्मणतो कीं "लाहान मुलांत गर्वासारिखा नाशकारक दुसरा

दुर्गुण कोणताहि नाहीं. यास्तव तो पहिल्यानें न लागूं देण्यास प्रयत्न करीत असावा; त्याचा संपर्क न लागला तर त्यांस नाना प्रकारचीं सुखें प्राप्त होत जातील."

सर्व सृष्टीचा क्रम पाहून मनुष्यमात्राच्या आंगीं लीनता यावी, ह्मणून ईश्वरानें काय चमत्कारिक योजना करून ठेविली आहे, ती पाहा! प्रथम मनुष्यांस परतंत्र करून ठेविलें आहे, पृथ्वीवरील केवढाहि मोठा श्रीमंत किंवा सार्वभौम असो, तथापि तो परतंत्रच. मनुष्याचें ज्ञान, शक्ति व पराक्रम, इत्यादि ईश्वरानें आपल्या स्वाधीन ठेविले आहेत. सर्व पृथ्वीवरील सुखें अशाश्वत आणि पारलौकिक सुखें शाश्वत करून ठेविलीं आहेत. तीं अशासाठीं कीं जेव्हां मनुष्य त्यांजकडे पाहतो, तेव्हां त्यास जें ऐहिक सुख तें नाशवंत आहे असें मनांत येऊन त्याच्या आंगीं लीनता यावी. ईश्वराच्या अपार ज्ञानापुढें मनुष्याचें कितीहि ज्ञान असलें तरी तें कांहींच नाहीं. कदाचित समुद्राच्या उदकापुढें लहानशा झऱ्याच्या उदकाची कांहीं तरी गणना होईल, परंतु ईश्वराच्या ज्ञानापुढें मनुष्याच्या ज्ञानाची काडीमात्रहि गणना होणार नाहीं. यास्तव सर्व वैभवाचा स्वामी ईश्वर आहे, आणि तो सर्वज्ञ, सर्वव्यापी, सर्वशक्त, क्षमाशील, नीतिमान् असा आहे. सर्वकाळ असें लक्षांत ठेवून जें करणें तें करीत असावें, ह्मणजे आपल्या अंगीं अहंकार उत्पन्न होणार नाहीं.

आतां मनुष्याच्या स्थितीचा विचार करून पाहा! मनुष्याचें शरीर केवळ मृत्तिकेच्या भांड्यासरिखें आहे; त्यांत आपला अंश आहे ह्मणून पृथ्वी त्याजवर सत्ता करिती. मृत्यु तर त्याजवर क्षणोक्षणीं घाला घालावयास टपलाच आहे. मनुष्याच्या आयुष्याचा क्षणभर तरी भरंवसा आहे काय? याजविषयीं ग्रीक देशांतील एक विद्वान् असें ह्मणतो कीं "आमचें आयुष्य इतकें अशाश्वत आहे कीं, जसा पाण्याचा बुडबुडा स्वप्नांत पाहावा, तद्वत् जीवाचें जीवित्व क्षणिक आहे." अशा स्थितींत मनुष्यास अहंकार करावयास कांहीं तरी आधार आहे तर विचार करून पाहा! आणि एका ग्रंथांत असी गोष्ट लिहिली आहे कीं, ग्रीक देशांत कोणीएक सूज्ञ कवि रस्त्यांतून फिरत असतां, मनुष्यांत अहंकार आणि ईश्वराविषयीं अज्ञान, हीं पाहून रडत असे. तेव्हां कोणी लोकांनीं त्याला रडण्याचें कारण पुसलें असतां, त्याणें असें उत्तर करावें कीं, "अहो लोकांनो! तुमची दुःखित स्थिति पाहून मला काळजी उत्पन्न झाली आहे. तर तुमच्या अंतःकरणास जो अज्ञानरूप मळ लागला आहे तो दूर करा, आणि आपण कोण आहों, आलों कोठून, आणि पुढें जाणार कोणीकडे, याचा पक्केपणीं विचार करा." असें तो वारंवार सांगत असे, तेव्हां अज्ञानी लोक त्याजकडे पाहून हंसत असत; आणि त्यांणीं त्याचें नाव, रडवा कवी, असें ठेविलें होतें. तो इतका दयाळू असे कीं, लोकांचें दुःख त्याच्यानें साहवलें नाहीं, ह्मणून तो शेवटीं एकीकडे रानांत

जाऊन राहिला; मग कांहीं दिवसांनीं त्या लोकांतील कित्येकांस आपल्या मूर्खपणाचा अनुभव आला.

पृथ्वीवरील सर्व सुखांकडे एक क्षणभर लक्ष देऊन पाहा! तीं किती क्षणभंगुर आणि दुःखमिश्रित आहेत? त्यांचा प्रकार असा, नाना प्रकारचे रोग, हानि, विघ्नें, नाश, दरिद्र, विपत्ती हीं सर्वकाळ मनुष्यामागें लागलींच आहेत. मनुष्याची कितीहि शक्ति असली, तरी ईश्वरी अवकृपा झाली ह्मणजे ती क्षणामध्यें तृणवत् होऊन जाती. तो कितीहि विद्वान असला तरी क्षणांत पशुवत् होतो. कोणी कितीहि द्रव्यवान असला, आणि तो कितीहि द्रव्यास जपला, तरी तें जावयाचा समय आला ह्मणजे कसें जातें हें समजतहि नाहीं. मग त्याला आपोआप पाय फुटत असतात. आपणास उपयोगी पडणारे जे सोयरेधायरे ते कितीहि शक्तिमान असले तरी क्षणांत अनुपयोगी होऊन जातात. या प्रकारचे घोर मनुष्यामागें असतां, त्यास गर्विष्ठ असावयास कांहीं तरी प्रयोजन असेल तर पाहा! मनुष्याला सुखापासून गर्व होऊं नये, ह्मणूनच परमेश्वरानें ऐहिक सुखें क्षणिक आणि दुःखेंकरून युक्त, अशीं केलेलीं आहेत. जसा हत्ती मदोन्मत्त झाला ह्मणजे त्याला स्थितीवर आणावयास माहात त्याचें मस्तक तीक्ष्ण अंकुशानें टोंचितो, त्याप्रमाणें मनुष्यास सुखापासून मद उत्पन्न न व्हावा आणि त्याची शुद्धि न जावी, ह्मणून ईश्वरानें नाना प्रकारचे रोगरूप व दुःखरूप अंकुश करून ठेविले आहेत. असें असतांहि मनुष्य शुद्धीवर कोठें येतो! तो हत्ति प्रयत्नेंकरून वळणीस येतो, परंतु मनुष्य येत नाहीं. मनुष्याच्या अति गर्वाकडे पाहून एक इंग्रज विद्वान् असें ह्मणतो, "अरेरे, अधम मनुष्या! तूं एवढा परतंत्र आणि दुःखें करून व्याप्त, असा असतांहि तुला तिलमात्र अधिकार प्राप्त झाला, ह्मणजे तूं एवढा अहंकार करितोस कीं जो सृष्टीचा कर्त्ता, तो तुजपुढें कांहींच नाहीं असें तूं मानितोस; हें तुझें दुराचरण पाहून आकाशांतील देवदूत तुजविषयीं शोक करितात."

मनुष्यानें आपल्यास कितीहि सत्ता मिळविली तरी ती क्षणिक आहे, तसेंच आपलें शरीरहि नाशवंत आहे, आणि ईश्वर सर्वव्यापक असून, आपलीं सर्व कर्में तो पाहातो, हें निरंतर लक्षांत ठेवावें. असी वर्त्तणूक ठेवून, भूतदया, परोपकार, इत्यादि करीत असावीं, ह्मणजे अंतःकरण उत्तरोत्तर शुद्ध होत जाईल. या प्रकारें आचरण ठेविलें ह्मणजे अहंकार व दुसऱ्या नाना प्रकारच्या दुर्वासनारूप अंतःकरणाचा जो मळ, तो कमी होऊन सुखाची वृद्धि होत जाईल. कोणी असें समजतात कीं ज्यापासीं पुष्कळ द्रव्य आहे तोच सुखी, तर असेंच केवळ आहे असें नाहीं. कित्येक असे आहेत कीं, लक्षावधि रुपये जवळ असूनहि जन्मभर दुःखीच असतात. सुख देण्यास द्रव्यच समर्थ आहे असें नाहीं. सुख प्राप्त होण्यास ईश्वरी कृपा आणि मनाची संतुष्टता असली पाहिजे. हीं दोन प्राप्त झालीं ह्मणजे तो मनुष्य सुखी असा समजावा.

ईश्वरानें ज्या स्थितींत मनुष्यास ठेविलें, तींत असंतुष्ट असणें हेंच दुःखास कारण; जी स्थिति ईश्वरानें आपणास दिल्ही, तींतच संतुष्ट असावें, आणि सन्मार्गानें चालत जावें, ह्मणजे त्याजपासून कल्याण होत जाईल.

सारांश याप्रमाणें वर्त्तणूक करून अंतर्बाह्य शुचिर्भूतपणा ठेवून, परम दयाळू जो परमेश्वर त्यास अनन्यभावें शरण जावें, ह्मणजे सर्व गोष्टी सुलभ होऊन सुखांचा उत्कर्ष होत जाईल.

समाप्तम्

*

# THE EVILS OF DEBT

By

GOVIND NARAYAN SHENVI

TEACHER IN THE FREE GENERAL ASSEMBLY'S INSTITUTION,
BOMBAY.

BOMBAY:

PUBLISHED BY THE DECCAN VERNACULAR SOCIETY.

MDCCCL

# ऋण निषेधक बोध

हा ग्रंथ

गोविंद नारायण शेणवी याणीं

लोककल्याणार्थ

रचिला आहे.

तो

दक्षिणी भाषेंत पुस्तकें प्रसिद्ध करणाऱ्या मंडळीच्या आज्ञेवरून
आंग्रोळींत छापिला.



मुकाम मुंबई इशावी सन १८५०.

२

# अनुक्रमणिका

गोष्ट



*

# प्रस्तावना

ह्या देशांत लोक नाना प्रकारच्या संकटांत पडले आहेत. त्यांतून कर्ज ह्मणून जें एक महादुर्घट संकट, त्याच्या योगानें तर मनुष्याच्या सद्गुणाला फारच धक्के बसले आहेत; तर असें जें महासंकट तें होण्यास काय काय कारणें होतात, तीं या ग्रंथांत यथामति स्पष्ट करून दाखविलीं आहेत. अशा हेतूनें कीं, एतद्देशीय लोकांचीं दुःखें दूर होऊन त्यांस लोकांमध्यें सुख व प्रतिष्ठा प्राप्त व्हावी. असल्या दुःखाचा आपण तिरस्कार करून जर तें दूर करण्यास यथाकाळीं उपाय योजिले नाहींत, तर तें वृद्धिंगत होऊन सर्वस्वी नाश करील. बहुतकरून मनुष्यास जीं संकटें प्राप्त होतात, तीं त्यांचे अविचार आणि दुर्गुण इहींकरून घडतात. तर मनुष्यानें आपल्या आचरणाकडे लक्ष देऊन वर्तणूक करीत असावी; केवळ दैवावर भरंवसा ठेवून उगेंच राहूं नये.

हा ग्रंथ लिहावयास प्रारंभ केल्यावर कर्जापासून मनुष्यांची किती हानि व अप्रतिष्ठा होती, आणि ते सर्व सुखास कसे मुकतात, याविषयीं मजकूर इंग्रजी आणि मराठी वर्तमानपत्रांत पुष्कळ छापण्यांत आले. यावरून असें दिसतें कीं, या गोष्टीचा विचार लोक करूं लागले आहेत. प्रभाकर वर्तमानपत्रांत कोणी एका सूज्ञ ग्रहस्थानें आपल्या जातीची सांप्रत आपत्ति निवेदन केली. त्यांत तो असें ह्मणतो कीं, "आह्मी कर्ज भरितां भरितां मेलों, तरी तें कमी होतच नाहीं." यावरून या देशांत सध्यां लोक कर्जापासून किती त्रास पावतात, हें सहज ध्यानांत येईल.

सारांश, कर्जापासून जीं दुःखें होतात, तीं निवारण करण्यास हा आमचा नूतन प्रयत्न आहे, हें लक्षांत आणून सूज्ञ वाचणारांनी यांत कांहीं दोष असल्यास ते लक्षांत न आणितां हें काम केवळ लोकहितार्थ आहे, असें समजून ह्याचा अंगिकार करावा हीच आमची सर्वांस विनंती आहे. ह्या ग्रंथास मैराळ गणेश शास्त्री यांचें साह्य घेतलें आहे.

*

# कर्जाविषयीं साधारण विचार

सुख, मोठेपणा, सत्कार, सत्ता, यांची सर्व मनुष्यांस इच्छा असती, आणि कित्येकांचा असा समज आहे कीं, हीं सर्व द्रव्याच्या संबंधाने घडतात; तर कोणत्याहि प्रकारेंकरून तें संपादन करून सुख भोगावें; मग तें द्रव्य स्वकष्टार्जित असो, किंवा दुसऱ्याचें अपहार करून घेतलेलें असो, कोठून तरी तें प्राप्त झालें ह्मणजे पुरे. अशा नाना प्रकारच्या कल्पना काढून लोक द्रव्य शोधीत असतात; मग आपणांपेक्षां जे कोणी द्रव्यवान् असतील, त्यांजपासीं जाऊन त्यांचें मोठें आर्जव करितात, आणि सवड सांपडेल, त्याप्रमाणें त्यांजकडून कांहीं रुपये कर्जाऊ घेतात; त्या पैक्याबद्दल त्यांस सव्याज खत लिहून देऊन तो पैका फेडायाची कांहीं मुदत करितात. याप्रमाणें दुसऱ्याचें द्रव्य कर्ज घेतलें किंवा कांहीं माल उधार घेतला, आणि जर त्याची फेड न केली किंवा मालाची किम्मत धन्यास न दिली, तर त्यासच ऋण ह्मणावें. आणखी दुसऱ्याची चाकरी घेऊन त्याचें वेतन त्यास न दिलें तर तेंहि ऋणच आहे.

दुसऱ्याजवळून कर्ज काढल्यावेळीं फार सुलभ वाटतें, परंतु त्याचा परिणाम मोठा कठीण आहे. याजविषयीं असें वचन आहे कीं,

" विषमेकाकिनं हंति ब्रह्मस्वं पुत्रपौत्रकम्
न विषं विषमित्याहुः विषं ब्रह्मस्वमुच्यते."

याचा अर्थ-विष एकालाच मारितें. आणि कर्ज, पुत्र, नातु, पणतु, इत्यादिकांस मारितें; यास्तव केवळ विषालाच विष ह्मणत नाहींत, तर विष कर्जालाच ह्मणावें.

ज्या वेळीं कोणी दुसऱ्यापासून कर्ज घेतात, त्या वेळीं त्यांस असें वाटतें कीं, हें द्रव्य आतां आमचेंच. जेव्हां आह्मी त्यास देऊं तेव्हां तो घेईल, पुढें पाहातच आहों; प्रस्तुत आपलें काम तर साधून घ्यावें; असी मनाची खोटी समजूत करितात, आणि त्या द्रव्यावर सुख भोगावें, ह्मणून उत्कंठा धरितात; परंतु तें कसें प्राप्त होईल? याविषयीं असी एक ह्मण आहे कीं,

" कर्ज घेणारा विसरतो,
परंतु सावकार सदां स्मरतो,
मुदत अकस्मात सरती,
पण मागणी अकस्मात येती."

दुसऱ्यापासून अधिक किंवा कमी कर्ज काढणें हें मोठें दुःखाचें साधन आहे. एकदां जीवाविशेष कर्ज झालें ह्मणजे त्याच्यामागें नाना प्रकारच्या विपत्ती लागल्या ह्मणून समजावें; मग त्यांतून मुक्त होण्यास फारच कठीण पडतें. तेव्हां तो

कर्जकरी सांपळ्यांत सांपडलेल्या वाघासारिखा हात पाय आपटून आपल्या मूर्खपणाचा पश्चात्ताप करूं लागतो. मग जसजसे तो विचार करितो, तसतसें त्यापासून त्याला दुःखच प्राप्त होतें, आणि घर नको, दार नको, असी त्याची अवस्था होऊन जाती.

सर्व लोकांच्या शास्त्रांत कर्जाविषयीं निषेध सांगीतला आहे. हिंदुशास्त्रांत असें वचन आहे.

लोकद्वयप्रतिभयैकनिदानमेतत्
धिक् प्राणिनां ऋणमहो परिणामघोरम् ॥
एकः स एवहि पुमान् परमस्त्रिलोके
क्रुद्धस्य येन धनिकस्य मुखं न दृष्टम् ॥

याचा अर्थ—हें ऋण मनुष्यांला परिणामीं भयंकर, आणि या लोकीं व परलोकींहि दुःखास कारण; अशा ऋणाला धिक्कार असो. तोच एक पुरुष त्रैलोक्यांत धन्य, कीं ज्यानें क्रुद्ध सावकाराचें तोंड कधींहि पाहिलें नाहीं.

इंग्रेजी ग्रंथांत हीं पुढील वचनें आहेत त्यांचा संस्कृतांत असा भावार्थ होतो.

“पापं कर्तुं ऋणं कर्तुं सुखं मन्यति मानवः ॥
परिणामोतिगहनो महतामपिनाशकृत् ॥”

अर्थ–पाप आणि ऋण करावयास मनुष्य सुख मानितो, परंतु त्याचा परिणाम फारच कठीण; त्यापासून थोरांचाहि नाश होतो.

“ऋणमेव परं दुःखं”

ऋणच मोठें दुःख आहे, असें समजावें.

कर्जापासून आळस, लबाडी आणि ढोंग हे दुर्गुण उत्पन्न होतात, ह्मणून मिस्र देशांत असा नेम केला होता, कीं लोकांनी सावकारापासून उगीच कर्ज घेऊं नये. जर कोणास कर्ज घेण्याचें अगत्य पडलें, तर त्याने आपल्या बापाचें प्रेत सावकाराजवळ गाहाण ठेवावें, नाहीं तर कोणी सावकारानें त्यास कर्ज देऊं नये. तेथील लोक आपआपल्या बापाचें प्रेत संरक्षणार्थ सुगंधिक पदार्थांनी वाळवून तें पेटींत ठेवीत असत. आणि जर कोणी आपल्या बापाचें प्रेत सोडविल्यावांचून मेला तर तो मोठा दोषी, असें मानून त्याची उत्तरक्रिया करीत नसत.

ग्रीक देशांत असा कायदा होता कीं, सावकाराने कर्जदारापासून हरतऱ्हेने आपल्या कर्जाची फेड करून घेत असावें, आणि ती न झाली, तर कुळास विकावें, किंवा आपला गुलाम करून ठेवावें.

जे लोक दुसऱ्याच्या कर्जांत असतात. ते कोणत्या प्रकारचीं दुःखें भोगितात, तीं आम्ही प्रत्यक्ष पाहातों. कर्ज घेणारा कितीहि योग्यतेचा असला, आणि कर्ज देणारा कितीहि हलका असला, तरी तो आपलें कर्ज मागूं लागला, ह्मणजे त्याच क्षणी देणेदाराचें तोंड उतरून जातें, तेव्हां त्याची तो काय काय विनवणी करून काकळूत करितो कीं, शेठजी! चार दिवस धीर धरा; मी तुमच्या कर्जाची फेड लवकर करीन. मी त्याच उद्योगांत आहे. परंतु काय करूं, माझा हात सध्या चालत नाहीं. दादा! आतां लोकांसमक्ष माझी फजिती करूं नको. याविषयीं मी फारच त्रासलों आहे, आपण मजवर कृपाकरून माझे आब्रूचें रक्षण करा. याप्रमाणें तो मोठ्या नम्रतेने त्यास शरण जातो, आणि त्यास एकदां कांहीं तरी वायदा करून घरांतून घालवितो; मग असें ह्मणतो, हाय हाय, काय सांगावें! ज्यांस कर्ज नाहीं ते किती सुखी; कर्जासारिखें दुसरें दुःख नाहीं, असें ह्मणून श्वासोश्वास टाकून व्यर्थ चरफडत असतो.

"पंचमेहनि षष्ठे वा शाकं पचति यो गृहे,
अनृणीचाप्रवासीच स सुखी परमो मनः"

याचा अर्थ–ज्याला कर्ज नाहीं, आणि ज्याला कुटुंब सोडून आपल्या चरितार्थासाठीं प्रवास करावा लागत नाहीं, त्याला जरी पांच साहा दिवसांनी भाजीच खावयास मिळाली, तरी तो सुखी, असें समजावें.

मनुष्य कर्जदार झाला ह्मणजे तो सर्व सुखास मुकला, असें समजावें. त्याला सावकाराचा तकादा येऊं लागला, ह्मणजे मग त्याचे काय हाल सांगावयाचे आहेत! त्याजमध्यें प्रमाणिकपणा राहत नाहीं. असी एक ह्मण आहे कीं,

"कर्जाच्या पाठीवरी,
असती असत्याची स्वारी"

त्याकडून किती खोटे वायदे होतात, त्याचा नेमच नाहीं. त्याच्या बोलण्याचें प्रमाण नसतें. जसा एकादा मृग तृषेने अति पीडित होऊन टाहो करीत पाणी शोधीत असतां वनांत फिरतो, त्याप्रमाणें तो ज्यांजपासीं द्रव्य असेल, त्यांच्या दारोदार खेपा घालून कर्ज काढायास यत्न करीत असतो; मग तो सावकाराची कोणत्या प्रकारें खुशामत करितो, हें सांगवत नाहीं. देणारा कितीहि हलका असला, तरी त्याचें तो मोठें आर्जव करितो. अशा प्रसंगीं त्याला किती असत्य बोलावें लागतें, याचा ठिकाण नाहीं. हरयुक्तीने दुसऱ्यापासून द्रव्य काढावें, इतकेंच मात्र तो पाहातो. द्रव्यावांचून त्याला दुसरें कांहींच दिसत नाहींसें होतें.

एखादा कर्जबाजारी झाला, ह्मणजे व्याधिग्रस्तासारिखा होऊन त्याला जेवण

देखील सुचत नाहीं, बोलणें रुचत नाहीं, असी अवस्था होऊन जाती, रात्रीं सुखाने झोंप येत नाहीं, कारण, ह्मटलें आहे कीं,

"चिंतातुराणां न सुखं न निद्रा"

निद्रा नाहींसी झाली, ह्मणजे उद्योगावर चित्त लागून तो चांगला सिद्धीस जात नाहीं. शेवटीं असें होतें कीं, त्याच्या हयगईमुळें असलेला उद्योग नाहींसा होतो. मग त्याच्या विपत्तीस काय पार सांगावा! ऋणी मनुष्याकडून विद्याभ्यास, ईश्वराची सेवा, आणि सत्कर्में, हीं होत नाहींत; तर असें जें ऐहिक, आणि पारलौकिक सुखाचें हरण करणारें कर्ज, तें होण्यास मूळ काय? हें शोधून तें न होई असे उपाय योजीत असावे.

कर्ज केवळ गरीब लोकांसच होतें, असें नाहीं; ज्या मोठ्या लोकांस हजारों रुपयांच्या नेमणुका असतात, व शेंकडो रुपये दरमहाहि मिळत असतो, त्यांसहि हजारों रुपये कर्ज होतें, याचें कारण असें आहे कीं, जें त्यांस ईश्वराने दिल्हेलें असतें, त्यांत ते संतुष्ट नसतात, आणि त्यांला असी इच्छा उत्पन्न होती कीं, ईश्वरानें जें दिल्हें आहे, त्यापेक्षां आपणास अधिक असावें. आह्मापेक्षां जे श्रीमंत असतील, त्यांची बरोबरी आह्मी करावी. तर तसी योग्यता प्राप्त होण्यास पुष्कळ द्रव्य असावें, तें तर आह्माजवळ नाहीं. आतां यास हाच उपाय कीं, कोणी सावकार पाहून त्याजपासून कांहीं रुपये व्याजीं काढावें. नंतर त्याची थोडी थोडी फेड करीत जावी. अशा कल्पना करून कर्जी रुपये काढितात; मग ते रुपये हातास आले ह्मणजे हे कोठून आले, असें भान न राहातां मनास वाटेल, तसा त्यांचा व्यय करितात. पुढें सावकारास कांहीं पोंचत नाहींसें होतें; व्याजामुळें पांच चार वर्षांनी ती रकम दुप्पट होऊन जाती. मग सावकार जिंदगी असेल, ती जप्त करावयास लागतो. शेवटीं खाण्यापिण्याचेहि हाल होतात. एकदां कर्ज झालें, ह्मणजे नदीसारिखें वाढत जातें. त्याविषयीं असी एक ह्मण आहे कीं,

"आदापेक्षां खर्च मोठा.<br>त्याला होईल सदा तोटा."

नंतर त्याचें कर्ज उत्तरोत्तर वाढून नाना प्रकारच्या विपत्ति प्राप्त होतात; कारण, ज्या स्थितींत ईश्वरानें ठेविलें आहे, तिचा तो अनादर करितो, ह्मणून ईश्वराचीहि अवकृपा त्यावर होती.

न्यायाधीश किंवा कोणताहि सर्कारी हुद्देदार असो, तो जर लोकांचा देणेदार असला, तर त्याजकडून निष्पक्षपातानें न्याय घडणें कठीण, असें समजावें. कारण, ज्यापासून तो कर्ज घेतो, त्याचा तो सर्वस्वी मिंधा होऊन जातो. याविषयीं असें ह्मणतात.

"ऋणको धनकोचा दास,
घेणार देणाराचा दास."

यास्तव जो कोणी मोठा किंवा लाहान सरकारी कामगार असेल, त्याणें कोणाचें कर्ज घेऊं नये. ईश्वराने जितकें दिल्हें, तितक्यांतच निर्वाह करून असावें; यांत मोठेपणा आहे. नाहीं तर तो अधिक डौल करून मोठेपणा मिळवायास जाईल तर त्यांत आपली मोठी अप्रतिष्ठा आहे, असें त्याने समजावें. कर्ज घेणारा केवढाहि मोठा असला, तरी त्याने सावकारास पाहिलें असतां त्याचें पाणी उतरून जातें. मग त्याला हवा तसा इनसाफ करणें जरूर पडतें, त्याचा इलाज चालत नाहींसा होतो. पाहा! ह्या एका कर्जापासून किती अनर्थ घडतात! सत्य सोडावें लागतें. कदाचित् खऱ्याचें खोटेंहि करावें लागतें, कोणाचा सत्कार राहत नाहीं. ह्यामुळें सरकारची नुकसानी होऊन त्यासहि अपशब्द लागतो. अणखी ही गोष्ट सरकारच्या कानावर गेली, ह्मणजे आपली अप्रतिष्ठा होऊन प्राप्त झालेला हुद्दाहि जातो; आणि लोकांतहि अपकीर्ति होती. शेवटीं ईश्वरी क्षोभ होऊन नरकवास भोगावा लागतो. याप्रमाणें एका कर्जामुळें ऐहिक आणि पारलौकिक सुखास लोक मुकतात.

याजवर एकाने असी गोष्ट सांगितली कीं, कोणीएक पहिलवान मोठा बलाढ्य होता, त्याने एके दिवशीं रस्त्यांत मोठी धुंदाई मांडिली, ती असी कीं, हातांत एक नागवी तरवार घेऊन येणारे जाणारे लोकांस मारावयास धांवे, व कित्येक जखमीहि केले. त्या समयीं लोकांस मोठें संकट पडून तें निवारण करण्याचा विचार करूं लागले. कित्येकांनी जाऊन सरकारी चावडीवरून शिपायी त्यास धरावयास आणिले. परंतु त्याच्यापुढें कोणाचा उपाय चालला नाहीं. शिपायीदेखील चकित होऊन गेले; तेव्हां तेथें कोणी एक शाहाणा पुरुष होता, त्यास असी युक्ति सुचली कीं, या वेळीं याच्या शक्तीचा मोड करावयास कोणी एखादा याचा सावकार एथें याला तकादा करावयास आणिला असतां कांहीं तरी बंदोबस्त होईल. असी त्याणें युक्ति काढून त्याचा एक सावकार होता, त्यास बोलावून आणून हें वर्तमान सांगून त्यास त्या पहिलवानासमोर उभें केलें; तेव्हां त्या सावकारास पाहातांच आपल्या हातांतील तरवार खालीं ठेवून त्यास रामराम करून मोठ्या काकुळतीने तो त्याची प्रार्थना करूं लागला; इतक्या संधींत त्याला शिपायांनी लगट करून धरिलें. यावरून पाहा बरें! आपण दुसऱ्याचे कर्जदार झालों ह्मणजे किती तेजोहानि होती!

ऋणी मनुष्याचें चित्त व्यग्र असतें, यामुळें कोणताहि मुकद्दमा त्याच्या ध्यानांत बरोबर न येतां त्याचा निवाडा यथान्याय होत नाहीं. दुसरें, कामदार लोकांस पैक्याची

ओढ असली, ह्मणजे लोकांस आपलें काम करून घेण्यास शेंकडों रुपये लांच कबूल करण्याची सवड सांपडती. आणि जरी अमलदारास लांच घेणें हें फार निंद्य कर्म आहे, व तें परमेश्वरास अमान्य असून सरकारी कायद्यासहि विरुद्ध, आणि या अपराधासाठीं आपली लोकांमध्यें अपकीर्ति होऊन शेवटीं नरकवास भोगावा लागेल हें त्यांस पक्कें समजतें, तरी त्या वेळीं कर्जदाराच्या तगाद्यामुळें त्याचें त्याला अगदीं भान न राहातां तें द्रव्य पाहातांच तो केवळ मोहित होऊन बुद्धिभ्रष्ट होतो. आणि तें द्रव्य घेतो. जेव्हां त्याला ह्या निंद्य कर्मासाठीं अंतःकरण टोचीत असतें, तेव्हां तो क्षणोक्षणीं विचार करून आपल्या अंतःकरणाची असी समजूत करून घेतो कीं, "मी फिरून असें कर्म कधीं करणार नाहीं, एवढें कर्ज फिटलें ह्मणजे झालें. पुढें मी कोणाच्या द्रव्यास शिवणार नाहीं." असे क्षणभंगुर मनोरथ करून तो आपल्या अंतःकरणाचें समाधान करीत असतो. मग त्यांतील कांहीं द्रव्य धर्मकृत्यास लावून, तो दोष दूर करावयास पाहातो; परंतु तो महान् दोष येणेंकरून कसा दूर होईल ? जी गोष्ट ईश्वरास अमान्य, ती केली असतां तो प्रसन्न होऊन कृपा करील, हें कसें घडेल ? "दुष्ट कर्म करून धर्म करीन, आणि ईश्वरास संतुष्ट करीन," असें ह्मटलें तर तें कधीं होणार नाहीं. परमपवित्र जो भगवान् त्यास काडीमात्रहि अपवित्रपणा साहत नाहीं. तर त्यास हें कसें मान्य होईल ? हें लक्षांत आणून जें कर्तव्य, तेंच करीत असावें.

ऋण दोन प्रकारचें आहे. एक सार्थक, आणि एक निरर्थक; सार्थक कर्जाचा प्रकार.–जर घरांत एका कुटुंबाची दाहा मनुष्यें आहेत. आणि त्यांचें संरक्षण करणाऱ्यास चरितार्थापुरतें द्रव्य मिळत नाहीं. तर त्यांच्या उपजीविकेपुरतें कर्ज काढून संरक्षण करणें त्यास भाग आहे. अथवा घरांत कोणी आजारी झाला. आणि त्यास औषध उपाय करण्यासाठीं कांहीं द्रव्य पाहिजे, तर त्याला आरोग्य होण्याकरिता कर्ज काढावें. तथापि तेंहि अविचाराने घेऊं नये. द्रव्य खर्चल्यावांचून मुलास विद्याभ्यास होत नाहीं, आणि सांप्रत उपेक्षा केली असतां विद्याभ्यासाचा समय निघून जातो, असा जर प्रसंग प्राप्त झाला, तर कांहीं कर्ज करून त्याजकरवीं विद्याभ्यास करवावा, परंतु तें कर्ज अशा रीतीनें करावें कीं, त्यापासून पुढें मुलांस उपद्रव होऊं नये. मुलें मोठीं झाल्यावर कमाई करून तें कर्ज फेडतील; अशा हेतूने दुसऱ्याचें फार कर्ज उपसूं नये. यावर असें एक वचन आहे कीं,

ऋणकर्ता पिता शत्रुः

याचा अर्थ—जो बाप आपल्या मुलांस कर्ज करून ठेवितो, तो शत्रु असें समजावें.

दुसरी असी एक ह्मण आहे कीं,

"होणार लाभाच्या आशेवरी,
कधींहि उधळेपणा न करीं."

मुलगी उपवर होऊन लग्नाचा समय आला, आणि तिचें लग्न करणें तर अवश्य आहे, जवळ तर कांहींच अर्थ नाहीं, तर आपणास तोलेल; अशा प्रकारें समयानुसार कर्ज काढून तें कार्य करून घ्यावें; परंतु कर्ज न होतां विवाहादिक कार्यें केलीं असतां फारच प्रशस्त.* सारांश, योग्य प्रसंग पाहून कर्ज केलें असतां, त्यास सार्थक ऋण ह्मणावें. या प्रकारचें कर्ज झालें. आणि समयानुसार त्याच्या हातून तें न फिटलें, तर त्याचा अपमान करूं नये. अशा संकटांत कोणी एखादा पडला असतां दुसऱ्यानें त्याचें साह्य करून त्यास ऋणमुक्त करावें, हें योग्य आहे.

निरर्थक कर्जाचा प्रकार–एखाद्यास कुटुंब संरक्षणापुरतें मिळत असतां तो मोठे-पणा मिळावा, यासाठीं शेंकडों रुपये कर्ज करून रिकामा डौल मिरवितो, आणि मनास वाटेल, तसा खर्चहि करितो; पांच रुपये खर्चावयाचे तेथें अविचारानें दाहा खर्चून एखादें धर्मकृत्यहि करितो. असें करण्यासाठीं जें कर्ज करावें, त्यास निरर्थक कर्ज असें ह्मणतात. कर्ज काढून दुसऱ्यानें मिळविलेल्या द्रव्यावर जो सुख भोगावयास इच्छितो, तो केवळ अविचारी, अधम, असें समजावें. जो दुसऱ्याचें कर्ज घेऊन तें फेडीत नाहीं, तो मोठा दोषी असें हिंदुशास्त्रांत लिहिलें आहे. त्यांतील सारांश असा कीं, ऋण फेडल्यावांचून ऋणी मुक्त होत नाहीं. इहलोकीं जरी कर्जाची फेड न झाली, तरी परलोकीं ईश्वर त्यास शासन करीलच. यास्तव कोणी असें समजूं नये कीं, या लोकीं सरकारी कायद्यामुळें, अथवा हरयुक्तीने तें चुकविलें, ह्मणून आह्मी त्यांतून मुक्त झालों. जो कर्ज काढून तें फेडावयास इच्छीत नाहीं, तो चोरासमान आहे, असेंहि सांगितलें आहे.

---

## प्रसंगामुळें कर्ज झाल्यास तें फेडण्याच्या उत्सुकतेचा दृष्टांत

आमेरिका देशांतील डेनूहाम् या नावाच्या एका व्यापाऱ्याची असी गोष्ट ग्रंथांत लिहिली आहे कीं, हा भला प्रमाणिक सावकार इंग्लंड देशांत मोठा व्यापार करीत असे. समयविशेषीं त्याला व्यापारांत तोटा आल्यामुळें त्याचें दिवाळें निघालें. मग त्याची मालमत्ता विकून सरकार कायद्याप्रमाणें कर्जदारांनी दर रुपयास मिळालें, तें हिस्स्याप्रमाणें वांटून घेऊन त्यास पावत्या देऊन ऋणमुक्त केलें. तेव्हां तो भला व्यापारी आपल्या

* नारायण स्वामी याणीं आपले शिष्यांस शिक्षापत्र दिलें आहे, त्यांत असें लिहिलें आहे, "विपत्ति प्राप्त झाली असतां भिक्षा मागावी परंतु ऋण कधीं काढूं नये."

देशीं परत गेला, आणि तेथें मोठे श्रमाने व दक्षपणाने व्यापार चालवून बहुत द्रव्य संपादन केलें. नंतर कर्ज फिटे, इतकें द्रव्य जमलें, असें पाहून लागलाच तो जहाजांत बसून विलायत देशीं आला, आणि हिशेबाच्या वह्या काढून कर्जदारांचा व्याजासुद्धां हिशोब करून त्यांच्या बेरजेप्रमाणें हुंड्या केल्या; आणि प्रत्येकाच्या नांवाचे लाखोटे करून ते एकेका तबकांत घालून वर रुमाल झांकले, आणि ती तबकें मेजावर मांडून आपल्या सर्व करजदारांस मेजवानीसारखें बोलावणें केलें; ते आल्यानंतर सत्कारपूर्वक त्यांस नावनिशीप्रमाणें बसविलें. जेव्हां त्यांणीं तबकांवरून रुमाल काढिलें, तेव्हां त्यांच्या दृष्टीस आपापल्या नावाचे लाखोटे दिसले, आणि ते फोडून पाहातात, तों त्यांत व्याजासुद्धां बाकी राहिलेल्या रकमांच्या हुंड्या आहेत! असें पाहून त्यांस परमाश्चर्य झालें. मग ते त्याच्या औदार्याची व प्रमाणिकपणाची प्रशंसा करून व आभार मानून परत गेले.

कोणी असें ह्मणूं नये कीं, ज्यानीं आजपर्यंत लक्षावधि रुपये कर्ज काढिले, ते काय मूर्ख होते? त्यांस ह्या गोष्टी माहीत नव्हत्या कीं काय? तर याचें कारण असें आहे कीं, लोक एकमेकांचें पाहून ईर्षेने कर्ज करितात. कित्येक स्वतां कोणत्याहि गोष्टीचा काय परिणाम होईल, याचा बहुतकरून चांगलेपणीं विचार करीत नाहींत. याविषयीं असी गोष्ट आहे कीं, कोणी एक गृहस्थ प्रवासास निघाला, तो फिरत फिरत एका नदीजवळ पोंचला असतां तिचें स्वच्छ पाणी पाहून त्यास असें वाटलें कीं, एथें स्नान करून कांहीं वेळ विश्रांति घ्यावी. परंतु बरोबर कोणी सोबती नव्हता, ह्मणून जवळचें भांडें त्या नदीच्या कांठीं पुरून त्यावर लिंगाकृति खूण केली; आणि आपण अंघूळ करावयास गेला. नंतर तेथें दुसरे कित्येक गांवकरी आले. त्याणीं ती खूण पाहून असें मनांत आणिलें कीं, आज कांहीं तरी पर्वणी आहे. तर आह्मीहि एथें स्नान करून असेंच करावें. असा विचार करून जसी त्या बिचाऱ्याची खूण होती, त्याप्रमाणें हजारों लिंगाकृति खुणा जिकडे तिकडे झाल्या. नंतर तो गरीब मनुष्य स्नान करून नदीच्या कांठीं येऊन पाहातो, तों त्याची खूण त्यास सांपडेना, असें झालें, कारण आपल्या खुणेप्रमाणें हजारों खुणा दृष्टीस पडल्या; त्या वेळीं त्यानें आपल्या भांड्याचा शोध लागावा, ह्मणून पुष्कळ यत्न केला; तथापि तें हातीं लागलें नाहीं. तेणेंकरून तो मोठा खिन्न होऊन त्याने हा श्लोक ह्मटला,

"गतानुगतिको लोको न लोकः पारमार्थिकः
वालुकालिंगमात्रेण गतं मे ताम्रभाजनम्"

अर्थ--लोक एकमेकांचें पाहून त्याप्रमाणें वागतात. वास्तविक विचाराने कोणी चालत नाहींत. "पाहा! म्या खुणेसाठीं वाळूचें लिंग केलें, परंतु तेणेंकरून माझें भांडें हरवलें.

कर्ज करण्यामुळें काय दुःख होतें, व त्यापासून किती हानि होती, याचा दूरवर विचार करून कोणीच पाहात नाहींत. मनुष्यमात्राने आपल्या ज्ञानाचा कांहींतरी उपयोग करावा; दुसरा कितीहि विद्वान् असला, तरी तो जें सांगेल, त्याजवरच केवळ विश्वास ठेवूं नये. ईश्वराने आपणास जितकें ज्ञान दिल्हें, तितक्याचा उपयोग करून जी गोष्ट दुसऱ्याने सांगितली, ती खरी किंवा खोटी याचा विचार करून तदनुसार वागावें, ह्मणजे त्या पुरुषास बहुधा कर्ज वगैरे दुसऱ्या विपत्ती प्राप्त होणार नाहींत. याजवर एका ग्रंथांत असी गोष्ट लिहिली आहे कीं, "एक धनगर मेंढ्यांचा कळप चारून घरीं आणीत असतां, वाटेंत असी एक अडचण प्राप्त झाली कीं ती वाट संकुचित असून तिच्या बाजूस एक विहीर होती, आणि तिची वरांडी दोन तीन हात उंच बांधिली होती, तेव्हां तो कळप तेथें पोहोंचतांच समोरून एक गाडा आला. त्यामुळें तो रस्ता कोंडला गेला; त्या समयीं तो कळप कांहीं वेळ थबकून उभा राहिला, इतक्यांत पुढें जो मेंढा होता, त्याने त्याच वरांडीवरून विहिरींत उडी टाकिली, तें पाहाताच त्याच्या मागील दुसऱ्या मेंढ्यानें तसीच उडी मारली, याप्रमाणें त्याच्या मागून सर्वांनी उड्या टाकून आपला नाश करून घेतला." जरी मनुष्यें आपण मेंढ्यापेक्षां ज्ञानी, असें समजतात, तथापी कांहीं गोष्टीविषयीं त्या मेंढ्यांसारिखीच वर्तणूक करून आपला नाश करून घेतात.

कित्येकांस पैक्याची अडचण पडली, ह्मणजे ते सोन्यारुप्याचे दागिने किंवा घर इत्यादिक जिंदगी गाहाण ठेवून व्याजी पैका काढितात, त्यामुळें ते कर्जांत पडून त्यांची सर्वस्वी नासाडी होऊन जाती. मनुष्यास कांहीं अडचण आली, ह्मणजे त्याने प्रथमतः विचार करून पाहावें कीं, आपण जो ऐवज कर्जी घेतों, तो परत देण्यास आपल्यापासीं मुदतिबरहुकूम येईल किंवा नाहीं; आणि जो पैका कांहीं वस्तू गाहाण ठेवून व्याजीं काढावा, त्याबद्दल ती वस्तू जर आतांच विकून टाकिली, तर तसी फिरून विकत घेण्यास सावकाराला व्याजानिमित्त जो पैका द्यावा लागेल, त्यापेक्षां कमी खर्च होत असला तर ती वस्तू कधींच गाहाण ठेवूं नये. सांप्रतच्या अनुपपत्तीकडेस पाहून ती वस्तू लागलीच फरोक्त करून टाकिली असतां व्याज सावकारास द्यावें लागणार नाहीं. अशा गैरशिस्त व्यवहारामुळें बहुत लोकांची खराबी झाली आहे. मुळीं सावकार गाहाणवट जिन्नस अर्ध्या किमतीस आपल्याजवळ गाहाण ठेवून घेतो, आणि त्यावर व्याज वाढलें, ह्मणजे मालकावर उलटी फिर्याद करून बाकी घेण्यास तयार होतो; तर असला तोट्याचा व्यवहार कधींच करूं नये. कित्येकांची असी समजूत आहे कीं, आपल्या जवळची वस्तू विकली ह्मणजे आब्रू जाती, परंतु अशा करण्यामध्यें सर्वस्वीं बुडणूक आहे, याकडे ते लक्ष देत नाहींत. आपल्या गरजेकरितां वस्तू विकली तर त्यांत आब्रू जाण्याची गोष्ट कांहीं दिसत नाहीं.

द्रव्य मिळेल, तेव्हां तसी फिरून करितां येईल. परंतु गाहाणावर व्याजाने पैका काढून आपली वस्तू अर्ध किम्मतीस सावकारापाशीं ठेवून शेवटीं त्यापासून आपली अप्रतिष्ठा करून घ्यावी, यापेक्षां लोकांकडून गरीब ह्मणून घेऊन ती वस्तू लागलीच विकून आपलें काम करावें, तें उत्तम, त्यांत कोणापाशीं द्रव्याकरितां याचना करावी लागत नाहीं आणि कोणाचा कर्जदारहि होत नाहीं. आपला काळ प्रतिकूळ आला ह्मणजे आपण किती जरी झांकाझांकी केली, तरी ती प्रसिद्धीस आल्यावांचून राहाणार नाहीं.

कित्येक, जवळ पैका नसतांना कर्ज काढून घर बांधितात, व डागिनेहि करितात, त्यामुळें त्यांच्या संसाराची दुर्दशा होती; कर्ज काढून घर बांधिले, किंवा डागिने केले, ह्मणजे मिळकत व्याजाखालींच मुरून जाती, आणि मुद्दल न पोंहचलें, ह्मणजे कांहीं वर्षांनीं त्याबद्दल घरदार जाऊन उलटी फजिती मात्र होती; तर असें करूं नये. आपणापाशीं कांहीं द्रव्यसंचय झाल्यावर जर घर बांधण्याची इच्छा झाली, तर त्यांतून कांहीं शिल्लक राखून घर बांधावें.

जुगार खेळण्यामुळें लोक कर्जदार होऊन भिकेस मिळतात, तें असें. त्या छंदांत पडले, ह्मणजे त्यांस आपल्या स्थितीचें भान राहात नाहीं; मग गांठीस द्रव्य असेल तेंहि जातें. शेवटीं कर्जबाजारी होऊन उत्तरोत्तर दुराचरणांत पडूं लागतात. यास्तव लाहानपणापासून मुलांस अशा प्रकारचा छंद न लागण्यासाठीं फार जपत असावें. ज्या ठिकाणीं जुगार चालतें, त्या ठिकाणीं त्याला जाऊं देऊं नये. व त्यांच्या देखतां जुगारसंबंधी गोष्टीहि काढूं नयेत, हे खेळ मोठें निंद्य कर्म आहे, असें समजून त्याचा सर्वकाळ तिरस्कार करीत असावा. अशा कृत्यांत पैका मिळाला, तरी त्यास बरकत नाहीं. व त्या पैक्याच्या संबंधाने जवळचेंहि जातें, असें समजावें. ह्या एका जुगारामुळें मोठेमोठे लक्षाधीशहि भिकेस मिळाले आहेत, असे दाखले प्रतिदिवसीं आपल्या दृष्टीस पडतात.

कित्येक लोक आपले स्नेही द्रव्याच्या पेंचात आले असतां त्यांस मदत करावी, ह्मणून आपला आदिअंत न पाहातां अविचाराने जामीन राहातात. तेणेंकरून ते सर्वस्वीं बुडून जन्मभर दरिद्री होतात. आपले सुहृत्संबंधी, स्नेही, व शेजारी यांस अशा प्रकारचें संकट प्राप्त झालें असतां त्यांस साह्य करणें हा मनुष्यमात्राचा धर्म आहे खरा; परंतु जो या नेमाविरुद्ध चालतो, तो केवळ अधर्मी असें समजावें. अशा प्रसंगीं मनुष्याने आपली शक्ति पाहून वर्तणूक करावी. पैशाबद्दल दुसऱ्याची ओढ दूर करण्यासाठीं आपला नाश करून घेणें हें अनुचित आहे. याजविषयीं असी एक ह्मण आहे कीं, "आत्मा राखून धर्म करावा." जर संकटसमयीं दुसऱ्यास मदत होणें अवश्य आहे, तर आपली जिंदगी किती आहे, आणि आपण जिजकरितां जामीन राहातों, ती रकम किती आहे, याचा पक्केपणीं विचार केल्यावर जामीनगिरीची सही द्यावी. आपण

दुसऱ्यास जामीन राहिलों असतां, आपल्या कुटुंबाच्या चरितार्थांत कांहीं हरकत पडणार नाहीं, व जामीनगिरीचा पैका देण्यासहि भारी पडणार नाहीं; असें असल्यास दुसऱ्यास जामीन राहून त्याचें संकट दूर करावें. कोणी कोणी अभिमानामुळें द्रव्यवान्, कार्यकर्ता, असीं मोठीं विशेषणें मिळावीं, ह्मणून अविचाराने जामीन राहातात; परंतु पुढें त्याचा पल्ला कोठपर्यंत पोंहचेल, याचा त्यांच्या मनांत विचार न येतां, जामी नगिरीची सही देऊन निःकाळजीने वागतात. घेणाराने द्रव्य न फेडलें, तर आपणास फेडावें लागेल, याचीदेखील काळजी वाहात नाहींत. भोळेपणाने दुसऱ्यास जामीन राहिल्यामुळें कितीएकांची दुर्दशा होऊन दिवानी तुरुंगाची वतनदारी मिळाली. जामीन राहून आपल्या संसाराची नासाडी करून घेतली, असीं उदाहरणें हजारों सांपडतील. याजविषयीं असी एक ह्मण आहे कीं, "जामीन राही तो गांठचें वाही." यास्तव जो कोणी दुसऱ्यास जितक्या पैक्यास जामीन राहातो, तितका आपणाकडेस राखून ठेवावा. आणि आपली जामीनगिरी सुटे, तोंपर्यंत त्या पैशास स्पर्श करूं नये. अशा रीतीने जामीन राहाणें असल्यास राहावें. तेणेंकरून आपणावर जामीनकीबद्दल कधीं संकट येणार नाहीं.

याविषयीं एक चतूर विद्वान् असा उपदेश करितो कीं, "हे माझ्या प्रिय मुला ! तूं उगीच कोणास जामीन राहूं नको. असें असतां जर तुला आपल्या मित्रास जामीन राहाण्याचा प्रसंग घडून आलाच तर मोठ्या सावधगिरीने वाग; आणि तूं हें लक्षांत धर कीं, आपण आपल्या वचनाने बांधला गेलों, तर त्यांतून हरयुक्तीने सुटका करून घ्यावी. हें काम सिद्धीस जाई तोंपर्यंत तूं सुस्त निजून राहूं नको. पारध्याच्या हातीं एखादी हरीण सांपडली असतां, जसी निष्टून जाण्यास युक्ति करिती, त्याप्रमाणें तूं जामीनगिरींतून आपला हात सोडवायास युक्ति कर."



## स्त्रिया सुशिक्षित नसल्यामुळें कर्ज होतें, याचा प्रकार

कोणास असें आश्चर्य वाटेल कीं, स्त्रियांच्या सुशिक्षितपणासीं आणि कर्जासीं संबंध काय ? कर्ज करणारा निराळाच असतो, स्त्रीचा एथें संबंध दाखविण्याचें प्रयोजन काय ? याचें कारण, जर ते चांगला विचार करून पाहातील, तर त्यांच्या सहज ध्यानांत येईल. लोक असें ह्मणतात कीं, बायको जर शाहाणी असली, तरच तो संसार, नाहीं तर विपचार, असें समजावें. तर तें शाहाणपण त्यांजमध्यें कोठून येतें ? याचा विचार करून पाहिलें असतां स्पष्ट दिसेल कीं, त्यांजकडून विद्याभ्यास करवावा, ह्मणजे अर्थात त्यांमध्यें शाहाणपण, विचार, सद्गुण येतील; आणि तेणेंकरून त्या संसार यथास्थित चालवितील. कित्येक ह्मणतात कीं, अनृत, साहस, माया, असे स्त्रियांमध्यें साहजिक दुर्गुण आहेत, तर

त्यांला विद्याभ्यास काय उपयोगी ? तर असें नाहीं. त्यांच्या आंगीं हें दुर्गुण असण्याचें कारण हेंच कीं, त्यांला या देशांत अगदीं अशिक्षित ठेवितात. यामुळें त्यांची बुद्धि दुर्गुणाने भरलेली असती. स्त्रियांस वाचतां लिहितां येत नाहीं; आणि उपयोगी उद्योग नसतो, ह्मणून त्यांच्या मनांत नाना प्रकारच्या वाईट कल्पना येऊन त्यांचीं मनें संसारावर ठरत नाहींशीं होतात.

स्त्रिया सुशिक्षित नसल्या, ह्मणजे किती तोटा आहे, तो पाहा ! त्यांस असें वाटतें कीं, जो मोठेपणा व जें सुख, हीं केवळ उंच वस्त्रें, आणि अलंकार यांपासून आहेत. तर तीं मिळालीं ह्मणजे आह्मी श्रीमंत व सुखी आहोंत. अशा कल्पना करून त्यांचीं मनें संसाराकडे नसतात. नवऱ्याला कितीहि दुःख असलें, तरी ती त्याकडे लक्ष देत नाहीं. मग तो तिची मर्जी राखण्याकरितां कोठून तरी कर्ज काढून तिला डागिने करून देतो; तथापि तिची इच्छा तृप्त न होतां अशिक्षित असल्यामुळें निरंतर असुखी असती.

पाहा ! हा सर्व प्रपंच केवळ स्त्रीच्या स्वाधीन; आणि तीच जर शिक्षित नसली, तर त्या पुरुषाच्या हालास काय पार ! लाहान मुलाचें संघट्टण बापापेक्षां आईपाशीं फार असतें; तिजपाशीं त्याला क्षणोक्षणीं काम पडतें, जें त्यास कांहीं करावेंसें वाटतें, तें बहुधा आईस विचारून करतें. जसे आईच्या आंगीं गूण असतील, तसे त्याला लागतात. ती अशिक्षित असली, ह्मणजे आपल्या मुलांचें दुसरें कांहीं पाहात नाहीं, परंतु त्याच्या आंगावर अलंकार घालून बाहेर फिरवावें, आणि लोकांनी त्यास श्रीमंताचें मूल ह्मणावें, इतकेंच पाहाती. त्याला चांगले गूण लागावे, ह्मणून ती कांहींच काळजी वाहत नसती एखाद्या वेळीं मुलाकडून लहान लहानसा अपराध घडला असतां मनास वाटेल तसी शिक्षा करून तोंडानेहि शिव्या देती; व कदाचित् त्यापासून मोठा अपराध घडला. तरी त्यास कांहींच शिक्षा करीत नाहीं. अशा रीतीच्या वर्तणुकीमुळें मुलेंहि मोठेपणीं दुर्गुणी होतात.

त्या कुटुंबांत स्त्रिया सुशिक्षित असतात, तीं सुखी राहून त्यांतील मुलेंहि बहुतकरून चांगलीं सुशिक्षित निवडतात. आईस वाचतां लिहितां येऊं लागलें, ह्मणजे ती मुलास लहानपणापासून वाचायास शिकविती; तेणेंकरून बापाला मुलास शिक्षा लावण्याचे फार श्रम पडत नाहींत. आणि गरीबी असली, तरी मुलाच्या विद्याभ्यासाकरितां द्रव्याचीहि फारसी गरज पडत नाहीं. सुशिक्षित स्त्री आपल्या नवऱ्यास कर्ज न होऊं देतां, दुसऱ्या लोकांची हेवा करणार नाहीं. ईश्वरानें जें दिल्हें आहे, त्यांत ती संतुष्ट राहून आपल्या पतीच्या आज्ञेने वागूं लागेल. मग असी आईची वर्तणूक पाहून मुलेंहि आईबापाच्या आज्ञेने वागायास लागतील. मुलें लहानपणापासून सुशिक्षित ठेविलीं, ह्मणजे ती मोठेपणीं शाहाणीं, चतुर, होतात. पुढें कर्जांत न पडून अविचाराने खर्च न करितां ईश्वरास भिवून वागतील. सारांश जे लोक अविचारानें वागतात, ते देवाचें भय

न बाळगतां त्याची आज्ञा उल्लंघून मनास वाटेल, तसी वहिवाट करितात. यास्तव स्त्रिया हरप्रयत्नेंकरून लहानपणापासून सुशिक्षित करा. ह्मणजे निरर्थक कर्ज होण्याच्या मार्गांतून लोक सुटतील.

कितीएकांचें असें ह्मणणें आहे कीं, स्त्रियांस विद्या प्राप्त झाली असतां तेणेंकरून त्या जशा हल्लीं आहेत, त्यापेक्षां अधिक दुर्गुणी होतील. कारण विद्या हें केवळ बळ आहे, असें ह्मणतात. जसें दुष्ट लोकांस बळ सत्ता प्राप्त झाली, ह्मणजे त्यापासून लोकांचें कल्याण होणें तर एकीकडे राहतें; परंतु त्यापासून उलटा लोकांचा नाश मात्र होतो. तसें स्त्रियांस विद्या प्राप्त झाली, ह्मणजे त्या अनाचार करूं लागतील. ही गोष्ट खरी आहे कीं, विद्येचे आंगीं अहंकार, आणि तिजपासून जेवढें कल्याण होतें, तेवढेंच अकल्याणहि होतें; परंतु ती विद्या कोणत्या प्रकारची, याचा विचार करावा. जो विद्याभ्यास ईश्वरशास्त्रमिश्रित व ज्यामध्यें सदाचरणाच्या गोष्टी सर्वकाळ वाचण्यांत, लिहिण्यांत, ऐकण्यांत व बोलण्यांत येतात; अशा प्रकारचा विद्याभ्यास केला असतां कधींहि कोणास अपकार होणार नाहीं. अगदीं कल्याणच होईल.

सत्य सहनशीलता प्रमाणिकपणा यांपासून काय काय लाभ होतात, हें नेहेमी स्त्रियांस सांगत असावें, किंवा अशा विषयांवर जे ग्रंथ असतील, ते त्यांस वाचायास द्यावे; ह्मणजे त्या सुशील, सद्गुणी, प्रपंचदक्ष, ईश्वरास भिऊन चालणाऱ्या अशा होतील, आणि आपल्या नवऱ्यांस कर्ज इत्यादिक अडचणी कधीं येऊं देणार नाहींत, जर स्त्रियांस शृंगारविषयक व मनास मोह करणारे असे ग्रंथ वाचायास दिल्हे, आणि त्या सद्गुणी शाहाण्या व्हाव्या, असी इच्छा केली, तर तें कसें होईल ? जर काजऱ्याचा वृक्ष दारांत लाविला, आणि त्यापासून चांगलें फळ मिळावें, असी अपेक्षा धरिली, तर ती कसी सिद्धीस जाईल ?

स्त्रिया सुशिक्षित झाल्या, ह्मणजे जें आयुष्य त्या रिकाम्या गोष्टींत घालवितात, तें सोडून देऊन उपयोगी उद्योग करूं लागतील; आणि त्या आपल्या घरखर्चाचा हिशोब ठेवून घरधन्यास उत्पन्न काय, आणि खर्च होतो किती ? याचें धोरण राखून संसाराचा बंदोबस्त ठेवूं लागतील. ऋण काढून डागिने केले असतां त्यापासून आपला किती नाश होतो, तो त्यांच्या समजण्यांत उघड येईल. द्रव्य मिळवायास घरधन्याला किती श्रम पडतात ? हें त्यांच्या लक्षांत सहज येऊन त्या कर्ज काढून खर्च करूं देणार नाहींत.

व्याजी रुपये काढिले असतां त्यापासून आपला किती नाश होतो, हें बहुतेक स्त्रियांस अगदींच समजत नाहीं. त्यांस असें वाटतें कीं, हा एक आपणास ठेवाच सांपडला आहे, असें मानून त्या निर्धास्त असतात. तर अशा स्त्रियांस विद्याभ्यास झाला असतां असें समजेल कीं, चक्रवाढीच्या व्याजानें मुदलापेक्षां दुप्पट तिप्पट ऐवज

सावकारास भरावा लागतो, तेणेंकरून आपल्या संसाराची नासाडी होती; आणि शेवटीं सर्वस्व जाऊन उलटी फजितीहि होती; असें त्यांच्या समजण्यांत स्पष्ट येऊन त्या कर्जास भितील; आणि सुखी होतील.

## लहानपणीं मुलांचें लग्न केल्यामुळें व लग्नांत दुसरे वावगे खर्च करण्यामुळें जें कर्ज होतें, त्याविषयीं विचार

मुलांस लहानपणीं अनेक अपाय घडतात, ह्मणून त्या समयीं त्यांचें लग्न करूं नये. मुलगा अठ्ठावीस वर्षांच्या वयांत आणि मुलगी बारा तेरा वर्षांच्या वयांत आली, ह्मणजे लग्न करावें. त्यांचें लग्न लहानपणीं केलें, आणि कदाचित् कांहीं वैपरित्य झालें, ह्मणजे तो खर्च व्यर्थ होऊन लोक दुःखांत पडतात.

पाहा ! पंध्रा वीस वर्षांपर्यंत मुलाचें वय विद्याभ्यासांत व दुसरे उपयोगी उद्योग करण्यांत लावावयाचें, असें असतां त्या वयांत त्याचें लग्न करून जर त्याच्यामागें संसाराचें गाडें लाविलें, तर त्याला विद्या प्राप्त होऊन पुढें तो कसा सुखी होईल ? लहानपणीं मुलाचें लग्न झालें, ह्मणजे कदाचित् त्या मुलास असा अभिमान उत्पन्न होतो कीं, “ आतां मी मोठा शाहाणा झालों, माझी मुलांमध्यें गणना नाहीं. ” जेव्हां त्याला सासू, सासरा, व तत्संबंधी लोक “ या जांवईबावा. ” असे मोठ्या सत्काराचे शब्द बोलून त्याच्या योग्यतेपेक्षां त्याला अधिक मान देऊं लागतात. तेव्हां कांहीं मुलें तेणेंकरून बिघडतात. मग त्यांचें विद्येवरील लक्ष उडून जातें. नंतर त्याला शिकण्याची लाज वाटती. एकदां ख्यालीखुशालींत मन पडलें, ह्मणजे तें पुनः विद्येवर बसत नाहीं. त्याची पाठशक्ति जाऊन चांगली स्मृतिहि न राहतां उत्तरोत्तर बुद्धि विपर्यस्त होऊन जाती. जर आईबाप गरीब असले, तर मग त्यांची फजिती काय सांगावी ! बाप एकदां मुलाचें लग्न करून देतो, आणि त्यास सांगतो कीं, म्या चहूंकडून कर्ज काढून तुझें लग्न केलें; आतां तूं आपल्या संसाराची सोय पाहा. ज्या वयांत विद्याभ्यास करावयाचा त्या वयांत जर संसार गळीं पडला, तर त्यांला विद्या कोठून होईल? त्याची बुद्धि प्रकाशित होऊन त्यापासून लोकांचें हित कसें होईल ? द्रव्य मिळवायाचे जे गुण तेच जर त्यामध्यें आले नाहींत, तर तो द्रव्य मिळवून आपला संसार कसा चालवील ?

लोकांचा असा समज आहे कीं, लग्न केलें, म्हणजे जन्माचें सार्थक झालें. अशा अज्ञान समजुती घेऊन ते हरप्रयत्न करून मुलांचे लग्न करून टाकितात. येणेंकरून किती

नाश होतो ? तो पाहा ! शेंकडों कुटुंबें वंशपरंपरा कर्जांत पडून शेवटीं लग्नाचें कर्ज त्यांकडून जन्मभर फिटतच नाहीं. जेव्हां सावकार येऊन जबरीनें आपलें द्रव्य मागतो, तेव्हां कुटुंबातील मुलेंमाणसें म्लानवदन होऊन जातात. त्या कर्जामुळें त्यांच्या अंतःकरणास एवढा धक्का बसतो कीं. त्यांस खाणेंदेखील गोड न लागून विद्या-वृद्धीचाहि व्यासंग होत नाहीं. सावकाराच्या तगाद्यामुळें त्यांचीं मनें चिंताक्रांत होऊन कांहींच रुचत नाहींसें होतें. या प्रकारें कर्ज मुलाच्या बुद्धीस विपर्यास आणितें. आणि त्याच्या पुढील सुखाचे अंकूर बाळपणापासून कोमून टाकितें. जसें ग्रहणाच्या छायेने चंद्रास काळिमा येती, तसें कुटुंबांत एकाने कर्ज केलें असतां त्याची छाया सर्वांवर पडून त्यांच्या सर्व सुखास क्षयरोग लागतो.

लोकांमध्यें असी एक वाईट चाल आहे कीं, लग्नांत विनाकारण पैका खर्चून भलतींच वाद्यें आणवून नाचतमाशे करवितात; आणि ह्मणतात कीं, अशा प्रसंगीं दोन रुपये खर्च झाले, ह्मणून काय झालें ? एवढा खर्च केला, त्यामध्यें अणखी चार जास्ती. अशा कल्पना काढून जें कार्य थोडक्यांत होणार, तें डौलासाठीं शेंकडों रुपये कर्ज काढून नांना-प्रकारच्या अडचणींत पडतात. त्यावेळीं त्यांस देहभान देखील राहत नाहीं. नवरीचा किंवा नवऱ्याचा बाप जे परस्पर व्याही होणार, त्यांजमध्यें प्रीति आणि एकमेकांच्या कल्याणाची इच्छा फार थोडी असती. लग्न करावयास उभे राहिले, ह्मणजे मुलगा कसा आहे ? आणि तो पुढें यथास्थित संसार करून गुणाने कसा निपजेल ? याविषयीं बहुतकरून विचार करणारे थोडे. ते एकमेकांच्या स्थितीकडे न पाहतां पहिल्याने असें कबूल करितात कीं, मुलीच्या अंगावर सोनें किती घालाल ? व मुलास वरदक्षणा काय द्याल ? याचा ठराव मध्यस्थाकडून करवितात. नंतर दोघांतून जो गरीब असेल, तो तेव्हां सावकार शोधायास लागतो, आणि गरजेस्तव मागेल तशा व्याजाच्या कबुलातीने कर्ज काढून लग्न करितो. मग त्याच्या हालास काय पुसावयाचें आहे ! हा आपला व्याही याजपासीं पैका नाहीं, आतां तो कर्ज काढील, आणि त्यांतून मुक्त व्हावयास त्यास फार संकट पडेल, तर आपण त्यास कर्ज करूं देऊं नये; असा कोणी विचार करीत नाहींत; त्यामुळें त्याची फारच फजिती होती. पाहा ! आपला व्याही जाचे घरीं आपली मुलगी दिल्ही, अथवा ज्याची आपण केली, तो जर सुखी असला, तर किती आनंद आहे ? जो पैका व्याजांत व दुसऱ्या निरर्थक खर्चांत जातो, तो जर घरांत राहिला, तर त्यापासून किती सुख आहे ? कर्ज काढून लग्न केल्यामुळें व भलतेच खर्च केल्यामुळें बहुतेक लोक भिकेस लागले आहेत.

बरें, गरीब लोकच लग्नसंबंधी कर्ज करितात असेंहि केवळ नाहीं. जे कोणी वतनदार व जाहागीरदार, जे कोणी शेंकडों रुपये कमाविणारे आहेत, तेदेखील अशा प्रसंगीं हजारों रुपये कर्ज काढून उधळेपणा करितात. या देशांत जसे लोक कर्जभरी

असतात. तसे दुसऱ्या कोणत्याहि देशांत नसतील, असें वाटतें; परंतु बहुतकरून असें कर्ज लग्नमौंजी इत्यादिक कार्यांत अविचारी खर्चामुळें होतें. जर हे लोक अशा रीतीने द्रव्याचा नाश न करिते, तर बहुधा सुखी असते; आणि देशसुधारणूकहि घडली असती. पाहा बरें! लग्न, मौंजी, पुत्रावण अशा शुभकार्यांच्या ठिकाणीं नाचतमाशे करून हजारों रुपये उडवावे. यांत काय लभ्यांश आहे ? ज्या कलावंतिणी लग्नसमयीं नाचायास आणितां, त्या तुमचें अनहित करणाऱ्या असें तुमच्या लक्षांत कसें येत नाहीं ? कित्येक ठिकाणीं त्या कर्ज होण्यासहि कारण झाल्या आहेत. स्त्रीपुरुषांची परस्पर प्रीति राहून सुखी नांदावें, असी त्यांची इच्छा नसती.

जर कोणास असें पुसलें कीं, काय हो! तुह्मी कां व्यर्थ खर्च करितां ? छिः ही गोष्ट फार वाईट आहे; असें करूं नये, असें ह्मटलें असतां, यावर ते असें उत्तर देतात कीं, कर्ज केलें, ह्मणून काय झालें ? कर्जावांचून कोण आहे ?...त्यावांचून कार्यें होतील तरी कशीं ? यावरून असें दिसतें कीं, जेव्हां ते दुसऱ्यापासून कर्ज घेतात, तेव्हां त्यास मुदतीप्रमाणें तें न पोंहचलें, ह्मणजे त्याकडून किती इजा होईल ? याचा त्या वेळीं ते किमपि विचार करीत नाहींत.

लग्न हें मोठें पवित्र आणि कल्याणदायक कार्य आहे, ह्मणून त्यामध्यें अगदीं कृत्रिम भाव असूं नये. मुलग्याचे किंवा मुलीचे जे गुणदोष असतील, ते उभयपक्षांस विदित करावे; त्यांत कांहीं पडदा ठेवूं नये. लग्न ह्मणजे जन्माची गांठ, यास्तव त्यांत कांहीं कपट केलें असतां तेणेंकरून उभयतांचेंहि अकल्याण होतें; याविषयीं शेंकडों उदाहरणें सांपडतील. मुलगा व मुलगी हीं शाहाणी आणि त्यांची एकमेकांवर प्रीति जडेल, व या उभयतांचें कूळ प्रतिष्ठित आहे, असें पाहून त्यांचें लग्न लावून द्यावें, केवळ द्रव्यावरच दृष्टि देऊं नये. उभयतां व्याह्यांनीहि एकमेकांची स्थिति उघड करून दाखवावी. आपली मुलगी दुसऱ्याचे घरीं दिल्ही, किंवा आपण त्याची केली, ह्मणजे ते आप्त होतात. मग त्यांत परकीयपणा नसावा. जी आपल्या व्याह्याची आपत्ति, तीच आपली, असें समजावें. वरदक्षणा मिळाली, तरच मुलाचें लग्न करूं, नाहीं तर नाहीं, असें ह्मणूं नये. तसेंच मुलीच्याहि बापाने असें ह्मणूं नये कीं, माझ्या मुलीवर अमुक सोनें घालाल, तरच तुमच्या घरीं देईन. नाहीं तर नाहीं. पाहा! जर मुलीच्या सासऱ्याने आज कांहीं रुपये व्याजी काढून मुलीवर डागिने घातले, तर नुकसानी कोणाची होईल ? मुलीचा नवरा व सासरा हे कर्जांत पडून दुःख पावतात, असें पाहून तुह्मास कसें सुख वाटेल ? आणि एक वेळ त्यांची नापत झाली, ह्मणजे अब्रु काय राहिली ? मग तुमच्या मुलीस मान, प्रतिष्ठा, सुख कसें प्राप्त होईल ? यास्तव जें करणें तें कर्ज न करितां एकमेकांच्या संमतानें करावें. एकदां आपल्याला ज्याचा स्नेह

जडला, त्यासीं कोणत्याहि गोष्टीविषयीं प्रतारणा करूं नये. तेणेंकरून उभयपक्षीं कधीं कलह न होतां उत्तरोत्तर स्नेहवृद्धि होत जाईल.

कित्येकांचे संसार दांभिक लग्नामुळें धुळीस मिळाले आहेत. लग्नाचा समय प्राप्त झाला, म्हणजे अविचाराने कर्ज काढून मनस्वी खर्च करितात; आणि शेवटीं सावकारास बुडवून आपणहि बुडाले जातात. कोणी एखादा खाऊन पिऊन सुखी असला, आणि त्याच्या मुलास एखाद्या श्रीमंताची मुलगी सांगून आली, ह्मणजे तो आपली स्थिति विसरून चढून जातो. तो पाहातो कीं, आपल्या व्याह्याच्या घरीं गाडी घोडा चाकर लोक इत्यादि संपत्ति जशी आहे, तसी आपल्यास असल्याशिवाय त्याची आपली बरोबरी कसी होईल ? अशा ईर्षेने तो मनस्वी कर्ज काढून त्याच्या बरोबरीने खर्च करावयास जातो; आणि मोठ्या लोकांच्या घरचें जवाहीर आणवून आपलीं मनुष्यें साजरीं करून दाखवितो. तेव्हां त्याची अवस्था मोराचीं पिसें लावलेल्या कावळयासारिखी होऊन जाती. पुढें सावकारास नेमाप्रमाणें ऐवज न पोंहचला, ह्मणजे त्यापासून दुर्दशा होऊन नादारीमुळें बंदिशाळेचेंहि सुख भोगावें लागतें.

---

## उधळेपणा केल्याने कर्ज कसें होतें, याचा विचार

ईश्वराने कोणी राजा, कोणी रंक, कोणी श्रीमंत, कोणी गरीब, कोणी धनी, कोणी चाकर, असे नाना प्रतीचे लोक केले आहेत; आणि त्यांच्या त्यांच्या उपजीविके-प्रमाणें त्यांस द्रव्यांश देऊन आपल्या नेमामध्यें कांहीं विपर्यास न पडावा, ह्मणून त्यांस निरनिराळे उद्योग योजून दिल्हे आहेत. प्रजेने राजास मान देऊन त्याच्या आज्ञेंत वागत असावें. राजाची व आपली बरोबरी आहे, असें कधींहि मानूं नये. याप्रमाणें धनी व चाकर यांचीहि असीच मर्यादा असावी कीं, चाकर कितीहि धनवान झाला, तरी त्याणे आपल्या धन्याची बरोबरी करावयास जाऊं नये. ज्यास ईश्वराने श्रीमंत केलें आहे, त्याणे आपली श्रीमंताई ओळखून धर्म इत्यादिक कृत्यें करीत असावीं. गरीब, ज्याची प्राप्ति थोडी आहे, त्याणेंहि आपल्या थोडक्या प्राप्तीप्रमाणेंच धर्म लग्न इत्यादिक कार्यें करीत असावीं. दुसऱ्याचें पाहून आपली व त्याची बरोबरी असावी, ह्मणून दानधर्म अथवा कोणतेंहि कर्म ईर्षेने कर्ज काढून करूं नये. असें केल्याने ईश्वराच्या आज्ञेचें उल्लंघन होतें. कोणास काय असावें ? कोणाच्या हातून काय धर्म घडावा ? हें सर्वज्ञ ईश्वरास ठाऊक आहे; आणि त्याप्रमाणें त्याने त्यांच्या स्थित्यनुसार नेमणूक करून ठेविली आहे. तो सर्व जगाचा स्वामी, ह्मणून त्यास कांहीं कमी नाहीं; परंतु

तो एकास कमी, एकास जास्ती असें देऊन त्याच्या सत्याची परीक्षा पाहत असतो. तर मनुष्याने त्याच्या नेमाचा अनादर करून अव्यवस्थित वहिवाट करूं नये, असें केलें असतां ईश्वरी क्षोभ होऊन सर्वस्वी नाश व्हावयास लागतो. जें सर्व तुह्मापासीं आहे, तें त्याचेंच; तुमचें नव्हे. यास्तव त्या दात्याच्या आज्ञेप्रमाणें तुह्मी वागावें. त्याला तुमच्या द्रव्याची व कोणत्याहि वस्तूची काडीमात्र गरज नाहीं. केवळ तुमच्या अंतःकरणाची प्रीति आणि भाव यांचीच त्याला गरज आहे. जर गरीबानें दुसऱ्याचा कांहीं अपहार न करितां आस्थापूर्वक भक्ति केली, तर ती त्याला आवडती; परंतु दांभिक भावानें कोट्यावधि रुपयांचा धर्म केला असतां तो धर्म ईश्वरास अगदीं प्रिय लागत नाहीं. सुख प्राप्त होण्याचे धर्म मनाचे आहेत. कदाचित् पांच रुपये दरमहां प्राप्तीचे लोक यथायोग्य खर्च करून जशीं सुखें भोगितात, तशीं हजारों रुपयांच्या धन्यांसहि असत नसतील.

कोणत्याहि खर्चाला तुच्छ मानून त्यांत जास्ती काय आहे ? असें ह्मणून उगेंच राहूं नये. अव्यवस्थित खर्च लागलेच तोडून टाकावे. नाहींतर त्यापासून नुकसानीचा आरंभ होऊं लागतो. याविषयीं असें ह्मटलें आहे.

"क्षणशः कणशश्चैव विद्यामर्थंच साधयेत् ॥
क्षणत्यागी कुतो विद्या कणत्यागी कुतो धनम् ॥"

अर्थ—ज्यास विद्या आणि द्रव्य संपादन करणें आहे, त्याणें एक क्षण व कणही व्यर्थ न जाऊं देतां तीं संपादन करावीं; आणि जो क्षण व कण फुकट जाऊं देतो, त्यास विद्या आणि अर्थ हीं कोठून प्राप्त होतील ?

दिवाळखोरास आपल्या कुटुंबाची अगदीं दया येत नसती. त्याला उधळावयास पैका मिळाला, ह्मणजे दुसऱ्याचे किती जरी हाल झाले, तरी त्याकडे तो लक्षच देत नाहीं. त्याला देवाचें शास्त्र व भक्ति हीं शत्रूसारिखीं दिसतात. समयविशेषीं द्रव्य हातीं आलें असतां तो प्रतिष्ठा मिरवायासाठीं हजारों रुपये धर्म करितो खरा; परंतु तें कृत्य काय उपयोगाचें आहे ? असलें कृत्य ईश्वरास अगदीं आवडत नाहीं. शेवटीं तो पुरुष देवासमोर क्रोधपात्र होतो.

हिंदुस्थानांत जसे साडेतीन शाहाणे होते, तसेच ग्रीक देशांत सात शाहाणे होऊन गेले. त्यांत एक सोलन् या नावाच्या पुरुषाची गोष्ट असी लिहिली आहे कीं, तो देशाटन करीत असतां त्या देशाच्या दक्षिणेकडे एका राजाच्या शहरांत पोंहचला. तेव्हां तेथील राजानें त्यास आपल्या घरीं बोलावून नेऊन त्याचा मोठा सत्कार केला; आणि त्यास आपल्या एथें कांहीं दिवस राहवून त्याजपाशीं पुष्कळ गोष्टी विचारून घेतल्या. त्यांत ही एक गोष्ट विचारिली कीं, 'आपण बहुत देश फिरून आला, तर त्यांत सुखी

कोण अढळला ? " असें ऐकून त्या शाहाण्या पुरुषाने उत्तर केलें कीं, "महाराज मी इतके देश फिरून आलों, परंतु त्यांत मला एकच गृहस्थ सुखी दिसला." ग्रीकदेशाच्या उत्तरेकडेस एक लहानसें खेडेंगांव आहे, तेथें एक कुणबी कुटुंबा-सुद्धां राहतो, त्याच्या संततीसंपत्तीविषयीं विचाराल, तर सांगतों. त्याला एक मुलगा आणि एक वडिलोपार्जित शेत इतकें मात्र आहे. मुलगा बायको आणि आपण असे तिघेजण शेतांत वर्षभर मेहनतीने धान्य वगैरे उत्पन्न करून यथाकाळीं सरकारचा धारा देऊन जें राहील, त्यांत खाऊन पिऊन आनंद करीत असतात. त्याला कोणाच्या दोन कवड्याहि कर्ज नाहींत. शत्रूचें भय, राजाचें भय, चोराचें भयहि नाहीं; आणि फार समाधान वृत्तीने तो कुणबी ईश्वराचे मोठे आभार मानून सुखी आहे. तर हे राजा ! त्यालाच मी सुखी म्हणतों; त्यावांचून मला दुसरा कोणीहि सुखी अढळला नाहीं. ही गोष्ट ऐकतांच राजा आपल्या अंतःकरणांत फार खिन्न झाला. कारण, त्याला आपल्या संपत्तीचें आणि संततीचें वैभव पाहून असा अभिमान होत असे कीं, मजसारिखा दुसरा कोणीच सुखी नाहीं.

आतां पाहा ! दैवयोगाने पुढें अशी गोष्ट झाली कीं, कांहीं वर्षांनी इराण देशच्या बादशाहाची त्या राजावर इतराजी झाली. त्यामुळें त्यानें सैन्य पाठवून त्याचें राज्य घेतलें; आणि त्या राजास कुटुंबांतील सर्व मनुष्यांसुद्धां कैद करून इराणदेशीं नेले. नंतर कायद्याप्रमाणें त्या राजास सुळीं द्यावयाचें ठरविलें. जेव्हां सुळावर चढविलें, तेव्हां त्यास त्या शाहाण्या पुरुषाचें स्मरण होऊन "सोलन् सोलन् सोलन्" अशा तीन वेळां मोठ्याने हाका मारिल्या. तें ऐकून तेथें जे लोक जमले होते, त्यांस व बादशाहास मोठें आश्चर्य वाटलें. मग त्या राजास सुळावरून खालीं उतरावयाचा हुकुम बादशाहाने करून त्यास सोलन्चें नांव घेण्याचें कारण विचारिलें. तेव्हां त्याणें सर्व पूर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकतांच बादशाहाचे अंतःकरणास मोठा द्रव उत्पन्न होऊन ही गोष्ट खरी आहे, असें त्यास वाटलें. मग बादशाहाने त्या राजास कुटुंबांतील सर्व मनुष्यांसुद्धां कैदेंतून मुक्त करून त्याचें राज्य त्यास देऊन स्वदेशीं पाठवून दिलें. तेव्हांपासून तो बादशाहा उत्तरोत्तर सुधारत गेला.

पाहा ! कित्येक लोक जे कर्जबाजारी आहेत, त्यांचें कर्ज अविचारामुळें आणि दिवाळखोरीमुळें झालेलें असतें. जर ते ईश्वरास भिऊन विचाराने चालले असते, तर त्यांची इतकी दुर्दशा झाली नसती; त्यांनी ईश्वरी नेमाचा तिरस्कार करून आपणावर व आपल्या कुटुंबावर त्याचा क्षोभ करून घेतला; त्यामुळें त्यास सुख प्राप्त होत नाहीं. जें द्रव्य मिळतें, तें संसारास पुरत नाहींसें होऊन ते जन्मभर कर्जांत पडलेले असतात.

यास्तव मनुष्याने आपली प्राप्ति पाहून वहिवाट ठेविली असतां तो एकाएकीं विपत्तींत शिरणार नाहीं.

कर्ज देणारा सावकार शाहाणा, विचारशील दयावंत असावा; नाहींतर कर्ज घेणाराच्या विपत्तीस पार नाहीं. ज्या वेळीं सावकार दुसऱ्यास कर्जी रुपये देतो, त्या वेळीं व बहुतकरून घेणाराकडून आपला ऐवज परत येईल, किंवा नाहीं ? याचा पक्का शोध करून त्यास ऐवज देत असतो. ह्यांत तो केवळ आपल्या मतलबाकडेसच पाहतो; पुढें घेणाराचे कसेहि हाल होवोत; आपला पैका व्याजसुद्धां आला, ह्मणजे पुरे. तर त्यांनी केवळ आपल्याच स्वार्थाकडे न पाहतां दुसऱ्याच्या स्थितीकडेसहि लक्ष देत असावें. कोणी कर्ज मागावयास आला असतां पहिल्यानें असा शोध लावावा कीं, याला उत्पन्न काय ? याच्या कुटुंबांतील मनुष्यें किती ? आणि याचा खर्च काय ? मुलामाणसांची स्थिति कशी आहे ? त्यांचा खर्च भागून याजपाशीं शिल्लक काय राहती ? जें हा कर्ज मागतो, तें कुटुंबाच्या पोषणार्थ किंवा ख्याली खुशालीसाठीं ? बरें, हें कर्ज दिलें असतां याच्या कुटुंबाचें संरक्षण होऊन व्याजासुद्धां मुदतीबरहुकूम त्याची फेड याकडून होईल, किंवा नाहीं ? असें पाहून त्यास कर्जी रुपये द्यावे. उगीच आपणास व्याज अधिक मिळतें, ह्मणून दुसऱ्यास कर्ज देऊन त्याच्या मुलाबाळांचे हाल करूं नयेत. अधिक व्याज घेणें हें शास्त्रांत निषेधिलें आहे; आणि असें करणें ईश्वरासहि रुजू नाहीं. कोणी लग्नसंबंधी कर्ज मागत असला, तर त्याची मिळकत काय ? आणि या कार्यांत हा खर्च करावयास इच्छितो किती ? याचा विचार केल्यावांचून त्यास कर्जी रुपये देऊं नयेत. कारण, रुपये हातांत पडले, ह्मणजे लोक आपली मूळस्थिति विसरून भलत्याच कामासाठीं तें द्रव्य उधळून टाकितात. ह्या हिंदुस्थानांत लग्नाच्या खर्चाचें एवढें खूळ जर माजलें नसतें, तर हे लोक फार सधन असते. कोणी असें समजूं नये कीं, लग्न करण्याविषयीं आमची मनाई आहे, तर असें नाहीं. लग्न करावेंच; परंतु कर्जभरी न होतां आपणापाशीं जें द्रव्य असेल, तितक्यांत तें कार्य साधून घ्यावें. आपणास गरीब ह्मणतील, या भयाने कर्ज काढून वावगा खर्च करून आपल्या संसाराचा नाश करून घेऊं नये. वेळेस अन्नाची भ्रांति असून लोकांनी मातबर ह्मणावे यांत काय फळ ! अंथरूण पाहून पाय पसरावे, हें फार उत्तम. केवळ उधळेपणा करूं नये.

कांहीं दिवसामागें अशी एक चमत्कारिक गोष्ट घडली कीं, या मुंबई शहरांत एका ग्रहस्थास लाख रुपयांची सोडत आली. तो पूर्वीं अगदीं गरीब होता. रुपयांचे तोडे पाहतांच त्याची नजर फिरून त्यास असें वाटलें कीं, इतके रुपये कोणत्याहि प्रकारें खर्चिले, तरी ते सरणार नाहींत. असें मनांत आणून तो तें द्रव्य इच्छेप्रमाणें उडवूं

लागला; तें असें कीं, प्रथमतः त्याणें कोणास शेले, कोणास पागोटीं, असीं वाटलीं. अशांतच चार पांच हजार रुपये घालवून पुढें नाचतमाशे करण्यांतहि शेंकडों रुपये उधळिले; आणि जेव्हां कधीं कधीं तो मुलांच्या शाळेंत जाई, तेव्हां मुठीभर पैसे घेऊन त्यांजवर ते फेंकून देई. दारापासीं कोणी भिकारी जमले, ह्मणजे तो माडीवर बसून खिडकींतून रस्त्यांत पैसे टाकून देत असे. याप्रमाणें त्याची स्थिति बदलून मनास वाटतील, तशा ख्यालीखुशाली करूं लागला. त्याला त्या द्रव्यापासून असा अभिमान झाला कीं, मी पूर्वीं कोण होतों? हें अगदीं तो विसरून गेला. परंतु पाहा अरे अरे! त्याचा काय परिणाम झाला! एका वर्षांत त्याचें द्रव्य सपून तो लोकांच्या दारीं कर्ज मागावयास खेपा घालूं लागला. नंतर पांच पंचवीस रुपयांच्या कर्जासाठीं त्याणें कैददेखील भोगिली. शेवटीं त्याचे हाल होऊन तो मरण पावला. याजवरून विचार करा कीं, उधळेपणाचा परिणाम किती दुर्घट आहे? त्याच द्रव्याचा उपयोग जर तो ग्रहस्थ व्यवस्थेनें करिता, तर त्याचा उपभोग त्याचे नातूपणतू देखील घेते; आणि तेणेंकरून त्यांचें किती कल्याण झालें असतें! अशा प्रकारचीं उदाहरणें दुसऱ्या ग्रंथांत वाचण्यांत आलीं, तीं असीं.

ग्रीक देशांत आथेन्स् ह्मणून एक शहर आहे, तेथें क्रेसिपस् ह्या नावाचा एक मांडलीक राजपुत्र होता; तो अतिशय उधळ्या निघाला. त्याणें आपली सर्व जिंदगी ख्यालीखुशालींत उडविली. जवळ कांहींच अर्थ राहिला नाहीं. तेव्हां त्यास आपल्या बापाच्या कबरीचें स्मरण झालें. ती कबर गांवकरी लोकानी पुष्कळ द्रव्य खर्च करून त्याच्या स्मरणासाठीं बांधिली होती. तिचेदेखील चिरे काढून विकले. आणि मौजा केल्या.

दुसरी गोष्ट असी कीं, विलायत देशांत ज्यार्ज नेविल् ह्मणून एक श्रीमंत राहत होता, त्याला सरकारच्या कृपेमुळें एक मोठा हुद्दा मिळाला. ज्या दिवसीं त्यास कामावर नेमलें, त्या दिवसीं त्याणें लोकांस मोठी मेजवानी केली; तिचा वृत्तांत निरनिराळ्या ग्रंथकर्त्यांनीं लिहिला आहे, तो वाचिला असतां त्यापासून कंटाळा मात्र येतो—एका ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, ह्या मेजवानीची सामग्री तयार करावयास एक हजार चाकर ठेविले होते; याशिवाय बासष्ट आचारी, आणि साडेपांचशें खटपट्ये, याप्रमाणें त्याणें अद्भुत समारंभ सिद्धीस नेऊन लोकांस मेजवानी दिल्ही; परंतु त्याचा परिणाम कसा झाला, तो पाहा! जो हुद्दा त्यास प्राप्त झाला होता, तो त्याच्या उधळेपणामुळें धड सिद्धीस न जातां सरकारची त्याजवर इतराजी झाली, आणि त्याची सर्व जिंदगी जप्त करून त्यास एका किल्ल्यावर कैदेंत ठेविलें. तेथें त्याचे पुष्कळ हाल झाले. याप्रमाणें उधळे लोकांस ईश्वर शासन करीत असतो. यास्तव आपण सर्व काळ जपून व्यवहार करीत असावा.

न दाक्षिण्यादृते धीमान् स्वस्मिन्निच्छेद्धनाढ्यताम्
यत्र तद्विद्यते पुंसि निर्धनः स कथं भवेत् ॥

याचा अर्थ—दक्षपणा केल्यावांचून द्रव्यवान् होण्याची इच्छा कोणी धरूं नये. जो दक्षपणाने वागतो, तो बहुतकरून दरिद्री नसतो.

पूर्वी कित्येक मोठे लोक दक्षतेविषयीं प्रख्यात होऊन गेले; त्यांच्या गोष्टी ग्रंथांतरीं अढळल्या त्या अशा. शिकंदर बादशाहाविषयीं असें लिहिलें आहे कीं, तो एवढा नामांकित असतांहि साधारण कामदारासारखीं वस्त्रें घालीत असे. केटो जो रोम देशाचा न्यायाधीश, त्याच्या साधेपणाविषयीं असें वर्णन केलें आहे कीं, तो चार रुपयांच्या किंम्मतीपेक्षां अधिक मोलाचा आंगरखा घालीत नसे; आणि असें ह्मणत असे कीं, "ज्याची मला गरज नाहीं, तें जरी दमडीस मिळालें, तरी माहागच." आगष्टस् जो रोमाचा बादशाहा सार्वभौम पदवी पावला असतांहि आपल्या स्त्रीने व मुलीने शिवलेलीं वस्त्रें घालीत असे; आणि त्याचा निजायाचा बिछानाहि इतर लोकांसारिखाच साधारण असे. जर्मनी देशचा बादशाहा राड्ल्फ अगदीं साधारण वस्त्रें वापरीत असे. एके दिवसीं फिरत फिरत तो रोटीवाल्याच्या दुकानीं जाऊन शेक घेत बसला असतां त्याच्या बायकोने हा कोणी हलका मनुष्य आहे, असें समजून त्या बादशाहास हाकून लाविलें. त्याचा वंशज पांचवा चार्लस जो जर्मनीचा बादशाहा आणि स्पेनचा राजा हेहि साधे पोशाग करीत असत; तसाच फ्रान्स् देशाचा बादशाहा अक्रावा लुई, साधारण वस्त्रें घालीत असे. त्याच्या हिशेबाच्या वहींत बंडीस नव्या अस्तन्या लावायासाठीं एक रुपयाचें कापड आणि जोड्यासाठीं एक आण्याचें तेल, असें लिहिलें आहे. हे राजे जरी एवढे मितव्ययी होते, तरी योग्य प्रसंगीं कोट्यावधि रुपये खर्च करावयास मागेंपुढें पाहत नसत.



## आळस व निरुद्योगीपणा यामुळें कर्ज होतें, याविषयीं विचार

मनुष्यमात्राने स्वतः उद्योग करून आपला चरितार्थ चालवावा, असा ईश्वरी संकेत आहे; आणि त्याप्रमाणें त्याणें प्रत्येकामध्यें एकेक गुणहि निरनिराळा ठेविला आहे. तो असा; कोणी सराफ, कोणी लेखक, कोणी वैद्य, कोणी शास्त्री, कोणी सुतार, कोणी कांसार, कोणी लोहार, कोणी कुणबी, कोणी माळी, कोणी शिपाई कोणी चाकर, कोणी मजूरदार, अशा तऱ्हेतऱ्हेच्या प्रती केल्या आहेत; आणि त्यांस ते उद्योग घडण्यापुरती शक्तिहि ठेविली आहे. ज्यास जो उद्योग करणें अवश्यक आहे, तो त्याणें न केला असतां त्याचा चरितार्थ न चालून तो विपत्तीचा अधिकारी होतो.

आळसी लोकांकडून ईश्वराची आज्ञा मोडली जाती, यामुळें ते निरंतर असुखी राहतात. "रोगाचें घर निरुद्योग, मृत्यूचें घर रोग, उद्योग कर्ज वारितो, निरुद्योग कर्ज वाढवितो."

पाहा! या देशांत शेंकडों मनुष्यें उद्योगवांचून भटकत फिरतात; त्याला कांहीं उद्योगाची इच्छा नसती; परंतु द्रव्य मात्र मिळावें; असी इच्छा असती; ते शरीराने निरोगी बळकट असतात खरे; परंतु शरीरास काडीमात्र देखील श्रम देणें त्यांस आवडत नाहीं. ते भिक्षा मागावयास फिरूं लागले, ह्मणजे देश भिकारी होतो. कारण, एकाच्या श्रमाचे दाहा जण खाणारे झाले, ह्मणजे अर्थातच देश भिकारी होऊन जे श्रम करणारे आहेत, त्यांस ती मिळकत पुरेनासी होती, ह्मणून त्या बिचाऱ्यास कर्ज काढावें लागतें.

एक विद्वान् आळसी लोकांविषयी असें ह्मणतो कीं, आळशी लोक केवळ जीवन्मृत; त्यांजकडून आपलें व दुसऱ्याचेंहि कल्याण होत नाहीं. तर असे जे आळसी, ते पृथ्वीस भार, आणि अन्नास काळ, असे समजावे. आळसी मनुष्य कांहीं उद्योग करीत नाहीं. त्याच्या अंतःकरणांत नाना प्रकारच्या दुर्वासना उत्पन्न होतात. श्रमांवाचून सुख प्राप्त व्हावें, असें त्याच्या मनांत येतें. शेवटीं तो चोरीहि करूं लागतो. दुसऱ्या एका विद्वानाचें असें ह्मणणें आहे कीं, आळशांकडून कांहीं तरी वाईट आचारण घडेलच; ते लोक दुसऱ्यावर श्रमाच्या फळाची आस्था करितात; ह्मणून ते जरी चोर नसले, तरी लोकांस असें वाटतें कीं, चोर असावे. याजविषयीं एक गोष्ट अढळण्यांत आली, ती असी.

आथेन्स् शहरांत दोघे भाऊ राहत होते, ते शरीराने मजबूत असत; आणि घरांत बसून ग्रंथ अवलोकन करून आपली विद्या वाढवीत; परंतु लोकांस त्यांचा उद्योग ठाऊक नव्हता, यास्तव लोकांस असा भास झाला कीं, हे मोठे आळसी आहेत. यांस कांहीं उद्योग नसतां हे सुखी आहेत; तर हे उभयतां रात्रीं चोरी करून आपली उपजीविका चालवितात. असा वहमा त्यांजवर आणून चोरीची फिर्याद फौजदारींत न्यायाधिशाकडे नेली. तेव्हां त्या दोघां बंधूंनी आपल्या तरफेची साक्षी देण्याबद्दल शेजारच्या एका रोटीवाल्यास बोलावून आणविलें, त्या वेळीं त्याने असी साक्षी दिल्ही कीं, हे दोघे भाऊ पाळी पाळीप्रमाणें रात्रीं माझे घरीं येऊन गहूं दळून देतात; आणि मेहनतीबद्दल जें त्यांस मिळतें, तितक्यांतच ते आपला निर्वाह करून असतात. असी साक्षी पटतांच न्यायाधिशाने त्यांच्या उद्योगाची तारीफ केली, आणि त्यांस दोनशें रुपये बक्षीस देऊन मोठ्या सत्काराने घरीं जाऊं दिल्हें.

कित्येक लोक असें ह्मणतात कीं, ज्याला कांहीं उद्योग करावयाचा पडत नाहीं. ते सुखी; परंतु याविषयीं एके विद्वानाचें असें ह्मणणें आहे कीं, जे लोक श्रम केल्यावांचून राहतात, ते ह्या पृथ्वीवर नरकवासच भोगितात, असें समजावें.

दुसरी एक गोष्ट ग्रंथांतरीं सांपडली; ती असी कीं, कोणी एका आळशाला नदी उतरून पलीकडे जेवायास जावयाचें होतें. तेव्हां त्या नदीच्या कांठीं येऊन पाणी उतरलें ह्मणजे जाईन, असा मनोरथ करून तो तिच्या कांठीं सगळा दिवस बसून राहिला. परंतु नदीचें पाणी उत्तरोत्तर अधिकच वाढत चाललें. तरी त्या मूर्खाने असा विचार केला नाहीं कीं, नदीचा पूर अधिकाधिक चढत जातो, तर आपण कांहीं खटपट करून पार होऊन जावें. शेवटीं काळोख पडला, असें पाहून ठेंचा खात त्याला घरीं उपासीं परत यावें लागलें.

एक मोठा विद्वान् शाहाणा आळस्यास असा उपदेश करितो कीं, "अरे, तूं मुंगीचा उद्योग पाहून तरी सावध हो. पाहा! तिला कोणी शिकविणारा व संरक्षण करणारा आणि परामृश घेणारा कोणी नसतां ती उष्णकाळांत उद्योग करून अन्न सांठवून ठेविती."

जसें अन्नाकडून शरीररक्षण होतें, तसेंच उद्योगाने शरीर बळकट राहतें. जें अन्न आपण खातों, तें पचन होण्यासाठीं शरीरास श्रम अवश्यक आहेत; नाहींतर त्यापासून विकार होऊं लागतात. केवळ आळसी मनुष्य ह्या पृथ्वीवर दगडाच्या पुतळ्यासारिखा आहे, असें समजावें.

आळसीं लोकांस जेव्हां पैशाची गरज लागती, तेव्हां ते तो मिळवायास कांहीं श्रम न करितां कोणी एखादा सावकार शोधितात; आणि त्याला एकाचे दुप्पट तिप्पट कबूल करून त्याजकडून कर्जी रुपये घेतात; आणि तो पैका हातीं आहे, तोंपर्यंत मौजा मारितात. कर्जाची फेड करण्याची काळजी तिळमात्रदेखील वागवीत नाहींत. जर कोणी कर्जाच्या फेडणुकीची त्यांजवळ गोष्ट काढिली, तर ते असें ह्मणतात कीं, तें दिल्हें कोणी? घेतलें कोणी? आह्मी कर्जाचें भय बाळगिलें, तर आमचा चरितार्थ कसा चालेल? मुलेंबाळें पदरीं आहेत; त्यांचें पोट कसें भरेल? अशा समजुतीने ते लोक कर्ज काढून दुसऱ्यास बुडवितात.

ह्या देशांत आळसाची वृद्धि आहे; त्याचा क्षय होऊन उद्योगाची वृद्धि व्हावी, ह्मणून लोकांस उद्योगाची गोडी लागण्यासारिखे उपाय करीत असावे. कोणी कांहीं उद्योग करूं लागला, ह्मणजे त्यास उत्तेजन द्यावें. आपल्याकडून त्याची जितकी कुमक होईल, तितकी करीत असावी. आळसी लोकानी कांहीं मेहेनत करावी, ह्मणून त्यांस वारंवार उपदेश करीत असावा. आळसी लोकांचा आळस मोडावा; ह्मणून त्यांस कधीं साह्य होऊं नये. सर्व काळ ह्या दुर्गुणाचा तिरस्कार करून त्यांचा आळस जावा, ह्मणून नेहेमी ईश्वराजवळ मागत असावें.



# अहंकारामुळें लोक कर्जदार होतात, याचा प्रकार

अधिक किंवा उणा असा सर्वांस अभिमान असतो; परंतु तो अति झाला, ह्मणजे त्यापासून मोठी हानि होती; अभिमानामुळें लोक अविद्वान्, गरीब, मूर्ख आणि कर्जबाजारी होतात. ते असे, जो केवळ अभिमान बाळगीत असतो, त्यास असें वाटतें कीं, मी शाहाणा, मी विद्वान्, तर दुसऱ्यापासीं याचना करून शिकायास कां जावें? पुस्तक हातांत घेऊन वाचायास बसणें, किंवा शिकायास जाणें, हें हलक्याचें काम. माझे आईबाप मोठे प्रतिष्ठित; सबब आज काय त्यांच्या कुळास बट्टा लावावा! तें मी कधीं करणार नाहीं. असी अडाणी समजूत घेऊन तो विद्याभ्यास करीत नाहीं. याप्रमाणेंच ज्या हिताच्या गोष्टी असतील, त्यांचाहि तसाच तिरस्कार करितो. जेव्हां एखादा मोठेपणा मिळविण्याचा प्रसंग येतो, तेव्हां तो हुशारीने पुढें सरसावून आपल्या वडिलांच्या नावासारिखें मला कांहींतरी केलें पाहिजे, असें म्हणतो. एखादें कार्यप्रयोजन प्राप्त झालें, म्हणजे हजारों रुपये कर्ज काढून खर्च करितो, आणि उंचीं उंचीं वस्त्रेंहि वापरतो. अशा डौलाखालीं आपला नाश करून घेतो. माझे सोयरे, व शेजारी यांची आब्रू माझ्यापेक्षां कमी, त्यांणीं कार्यसंबंधी अमुक खर्च केला; तर त्यापेक्षां म्या आपल्या नावाप्रमाणें दुप्पट खर्च करावा. बरें, तसें जर नाहीं, तर दिढी किंवा सवाईने तरी असावा. असा विचार करून अभिमानाखालीं मरून जातो. शेजाऱ्याने एक बैठक केली असली, तर आपण दोन करितो. अशा वरचढीने कांहीं दिवस वागून शेवटीं धुळीस मिळतो. तर पाहा, हें केवढें आश्चर्य! याविषयीं पूर्वी कोणी विचार करीत नाहींत.

निरभिमानी मनुष्यास खाण्यापिण्याची आपदा कधीं पडत नाहीं. मनुष्यमात्रास उद्योग केल्यानें उपजीविकेपुरतें मिळत असतें; परंतु तेवढ्यानें ते संतुष्ट नसतात; याचें कारण अभिमान. त्यामुळें ते कर्जबाजारी होऊन जातात. जर लोक अभिमान सोडून आपआपली स्थिति एकमेकांस उघड करून दाखवितील, तर पृथ्वीवर कर्जबाजारी अगदीं थोडे होतील. पाहा! कोणी कोणी इंग्रेज लोकांस हजारों रुपये मिळत असतात, तथापि तेहि कर्जांत पडलेले असतात. याचें कारण हेंच कीं, मिजासीसाठीं एकमेकांचें पाहून आपल्या कमाईपेक्षां चौपट खर्च ठेवितात. यामुळें अप्रतिष्ठा पावून कर्जभरी होऊन जातात.

अशा अभिमानामुळेंच भाऊबंद व दुसरे सुहृत्संबंधी यांमध्यें एखाद्या क्षुल्लक गोष्टीविषयीं परस्पर वैमनस्य पडून आपला वाद तोडायास ते सरकारांत जातात. त्याजमुळें ते लोक खराबीस येऊन विनाकारण खर्च करून भिकेस मिळतात. पाहा! एका अहंकारामुळें त्यांस असें होऊन जातें कीं, आईबाप नकोत, भाऊबंद नकोत,

व सोयरेधायरे नकोत, इष्टमित्रहि नकोत आपण कोण! आणि करितों काय! याची त्यांला अगदींच शुद्धि राहत नाहीं. याजवर असी एक गोष्ट वाचण्यांत आली आहे कीं, एक पांचसाहा वर्षांचा मुलगा बापाबरोबर बागांत फिरावयास गेला होता; तेथें तो फिरत असतां त्याच्या दृष्टीस अकस्मात् पक्ष्याचा घरोटा पडला, तो पाहतांच त्या मुलानें बापास असें पुसलें कीं, "बाबा! त्यांत काय आहे? ते मला दाखीव." तेव्हां बापाने त्या मुलास त्या घरोट्याजवळ नेलें असतां त्यांत पक्ष्याचीं पिलें एकमेकांस चोंचीने मारीत होतीं; तें पाहून मुलगा बापास पुनः विचारितो. "बाबा! हीं लहान पिलें काय करितात बरें?" बाप ह्मणतो, "अरे मुला! तीं भांडतात." असे बापाचे शब्द ऐकतांच मुलगा ह्मणतो. "छी छी बाबा! असी गोष्ट होईल कसी? तीं एका आईबापाचीं पिलें भाऊ बहिणी असीं असून एकमेकांबरोबर भांडतात, असें कसें होईल? असें नव्हे, तीं एकमेकांचे मुके घेत असतील."

कोणी एका ग्रहस्थाने मोठा उंची पोशाग करून व अलंकार घालून मोठ्या अभिमानाने एका शाहाण्या पुरुषाकडे जाऊन त्यास विचारिलें कीं, असी शोभा तुमच्या पाहण्यांत कधीं आली आहे कीं काय? तेव्हां शाहाण्यानें उत्तर केलें, होय, महाराज! तुह्मापेक्षां मोर व कोंबडा आणि इतर पक्षी यांचेठायीं अधिक शोभा दिसती. कारण, त्यांचें सौंदर्य साहजिक आहे, आणि ही तुमची शोभा कृतीची आहे; तर मनुष्यमात्रामध्यें सद्गुण हें सर्व भूषणाचें भूषण, असें समजावें.

एक मोठा गर्विष्ट मांडलिक राजा होता; त्यास असी इच्छा झाली कीं, आपल्या वडिलांचें नांव सतत राहण्याजोगें कांहीं तरी मोठें कृत्य करून ठेवावें. असा विचार करून त्याणें आपल्या बापाच्या नावाची देवालयासारिखी मोठी इमारत बांधावयास प्रारंभ केला; परंतु त्यावेळीं आपणापासीं द्रव्य किती आहे? आणि या प्रसंगीं खर्च किती होईल? याचा त्याने कांहींच विचार केला नाहीं. पुढें त्याचा परिणाम काय झाला, तो पाहा! ती इमारत अर्धी झाली नाहीं, तों जवळील सर्व द्रव्य संपून गेलें. तेव्हां तें कृत्य सिद्धीस न्यावें, ह्मणून लोकांपासून पुष्कळ द्रव्यहि कर्जी घेतलें; तथापि तें सिद्धीस गेलें नाहीं. शेवटीं त्या मूर्खानें अभिमानामुळें तें तडीस नेण्याकरितां अनाचाराने द्रव्य मिळवायाचा उद्योग मांडिला.

यावरून पाहा! अभिमानामुळें लोक कसे अंध होऊन, करावें काय, आणि न करावें काय, हें अगदीं विसरून जातात.



# इंद्रियें स्वाधीन न ठेविल्यामुळें कर्ज होतें, याचा विचार

ईश्वरानें मनुष्यास जशीं पांच ज्ञानेंद्रियें दिल्हीं, तशींच पश्वादिकांसहि दिल्हीं आहेत. जसें मनुष्यास सुख दुःख समजतें, तसेंच त्यांसहि समजतें. निद्रा, आहार, भय आणि विषयसुख हीं मनुष्यासारिखीं त्यांस असतात. मनुष्य आणि पशु यांचा एवढाच भेद कीं, पशूंस विवेक, ज्ञान, दूरदृष्टि, वाचा हीं नाहींत; ह्मणून त्यांला एकमेकांस सुधारतां येत नाहीं. त्यांस ईश्वराने साहजिक एक अंगस्वभाव दिल्हा आहे, त्याप्रमाणें ते वागतात. त्यांस कोणत्याहि गोष्टीचा विचार नाहीं, ह्मणूनच त्यांस पशू असें ह्मटलें आहे; आणि हें नांव यथायोग्य कारण, पशु ह्मणजे ज्ञानशून्य.

ईश्वराने मनुष्यामध्यें विवेक, ज्ञान, बुद्धि, दूरदृष्टि, वाचण्यालिहिण्याचें सामर्थ्य, एकमेकांशीं परस्पर प्रीति व आगतस्वागत अशीं सर्व साधनें ठेविलीं आहेत. याशिवाय त्यांस शास्त्र लावून दिल्हें आहे; त्यानी कशी वर्तणूक करावी, असे सर्व नेम त्यांत सांगितले आहेत. बरें, वाईट, न्याय, अन्याय समजण्यासाठीं अडचणी पडूं नयेत, ह्मणून त्यांच्या अंतःकरणांत ईश्वराने आपली प्रेरकशक्तिहि ठेविली आहे. तेणेंकरून आपण कांहीं कुकर्म करावयास प्रवृत्त झालों असतां ती लागलेंच सावध करिती; परंतु मनुष्य अति दुराचरणांत पडला असतो, ह्मणून तो तिचा तिरस्कार करावयास लागतो. ( हिंदुशास्त्रांत ह्या शक्तीस “ परमात्मा ” असें ह्मणतात; आणि इंग्रेजी शास्त्रांत तिला “ ईश्वरी ज्योति” असें ह्मणतात. )

ह्यावरून असें दिसतें, मनुष्य उत्तम; असें करण्याचें कारण हेंच कीं, त्याणें आपलीं सर्व इंद्रियें स्वाधीन ठेवून पशूप्रमाणें वर्तणूक करूं नये. जिव्हा, घ्राण इत्यादि इंद्रियें स्वाधीन नसलीं, तर त्यांजपासून मनुष्याचें जेवढें कल्याण होतें, तेवढाच नाशहि होतो. ईश्वराने जशा मनुष्यांत लहानमोठ्या पदव्या करून ठेविल्या आहेत, तशाच सर्व पदार्थांमध्यें लहान मोठ्या किम्मतिहि करून ठेविल्या आहेत. असें कीं, मोठ्या मनुष्याने मोठ्या किम्मतीची, आणि गरीबाने हलक्या किम्मतीची वस्तु घ्यावी; येणेंकरून कोणी कोणावर शब्द ठेवणार नाहींत. याकरितां ईश्वराने असे नेम करून ठेविले आहेत; परंतु गरीब असून तो जर विवेक न करितां आपलीं इंद्रियें स्वाधीन ठेवीत नाहीं, तर तो त्यांच्या संबंधाने परतंत्र होऊन मनास वाटेल, तसें करावयास लागतो. इच्छा झाली कीं, आज दूधपाक असावा; आणि हातांत तर कवडी नसती, तरी तो कर्ज काढून तो पदार्थ करून खातो. अशा प्रकारचे जे लोक, ते केवळ स्वच्छंदी असतात. ते आपल्या स्थितीकडेस लक्ष न देतां इंद्रियांची तृप्ति

करावी, इतकेंच मात्र मनांत धरून शेंकडों रुपये कर्जाच्या पेंचांत येतात. तर अशा तऱ्हेच्या वर्तणुकी करणाऱ्या मनुष्यास केवळ पशुच ह्मणावें.

एका मनुष्याच्या तोंडांतून असें भाषण निघालें कीं, परमेश्वराने मनुष्यास उत्पन्न करून सृष्टींत नाना प्रकारचीं फळें आणि मिष्टान्नें केलीं आहेत, हीं कशास बरें ? तर जन्मास आल्यासारिखें एक वेळ हे सर्व पदार्थ यथेच्छ खाऊन जन्माचें सार्थक करावें. खाण्यापिण्यावांचून या जन्मांत दुसरें सुख कोणतें ? सारांश, अशा अविचारी मनुष्यास काय उत्तर द्यावें ? पाहा ! मनुष्याने आपल्या सर्व इच्छा ईश्वराकडेस सोंपून सर्व सुख त्यापासून आहे, असें समजावें; तरच इंद्रियें स्वाधीन राहतील. नाहीं तर कितीहि पदार्थांकडून त्यांची तृप्ति करूं गेलें असतां तीं कल्पांतीं-देखील तृप्त होणार नाहींत.

( एक विद्वान असें ह्मणतो कीं, अधाशीपणा आणि गर्व यांपासून आळस उत्पन्न होतो; आणि आळसापासून दरिद्र, इत्यादिक सर्व प्रकारचीं दुःखें येऊं लागतात. )

ग्रीक देशांत क्रिमिस् नामेंकरून एक गृहस्थ राहत होता. त्याचें चित्त खाण्यापिण्यावर फार असे; यामुळें त्याला व्याधि उत्पन्न होऊन तो निरंतर अशक्त होत चालला. चालूं लागला, ह्मणजे त्यास घेरी यावी; तेणेंकरून त्याच्याने कांहीं उद्योग करवेना, असा झाला. मग त्यास सर्व प्रकारच्या अडचणी येऊं लागल्या. अशा स्थितींत चिंताक्रांत होऊन तो अंथरुणावर पडला असतां त्यास असें स्वप्न पडलें कीं, कोणी एका पुरुषाने त्याजपुढें उभें राहून त्यास असा उपदेश केला. " अरे क्रिमिसा ! जर तुला सुखी होण्याची इच्छा असली, तर नेमस्तपणा स्वीकार. यापासून काय काय लाभ होतात, ते ऐक. शरीर निरोगी राहतें. सद्गुणाची वृद्धि होऊन ज्ञानाचा प्रकाश होतो, संपत्ति प्राप्त होऊन प्रपंच आणि परमार्थहि घडतो. जर तुला आपल्या जन्माचें सार्थक करून घेणें असलें, तर तूं याप्रमाणें वाग. " असें बोलून तो पुरुष अदृश्य झाला. नंतर क्रिमिस् जागा होऊन पुढें आपली वर्तणूक तसी ठेविता झाला. त्यामुळें तो त्या देशांत निरोगी, सद्गुणी, द्रव्यवान् आणि दीर्घायुषी होऊन सुख पावला.

## कैफ केल्याने किती नाश होतो, याचा विचार

कित्येक लोक मोठे मोठे कैफ करून आपला नाश करून घेतात. त्यांचीं इंद्रियें स्वाधीन नसल्यामुळें त्यांस नाना प्रकारचे रोग व दुःखें प्राप्त होतात. प्रथमतः ते थोडासा कैफ करूं लागले, ह्मणजे दिवसानुदिवस त्यांची इच्छा वाढतच जाती. यामुळें तर इंद्रियें अगदींच स्वाधीन राहत नाहींत. तेव्हां त्यांस कोणत्याहि गोष्टीचें भान न राहतां कैफावांचून

कांहींच सुचत नाहींसें होऊन चौघांतून उठल्यासारिखे होऊन जातात. कित्येक या कैफाच्या नादांत पडून घरेंदारें विकून आणि शेंकडों रुपये कर्ज करून आपलीं मुलेंबाळें टाकून देशधडी झाले आहेत. पाहा ! हा एवढा अनर्थ एका ह्या दुर्व्यसनामुळें होतो. यास्तव मुलांस लहानपणापासून व्यसन न लागण्यासाठीं फार जपत असावें. त्यांस कधीं स्वच्छंदपणाने वागूं देऊं नये. या पृथ्वीवर मनुष्यास कितीहि प्राप्त झालें, तरी त्याची तृप्ति होतच नाहीं.

ग्रीक लोकांमध्यें असी एक रीत होती कीं, कैफापासून मनुष्य किती बेशुद्ध होतो, आणि त्याची काय दुर्दशा होती, हें मुलांस दाखवावें; ह्मणून गुलाम लोकांस पुष्कळ दारू पाजवून मस्त करीत असत. मग ते बेशुद्ध होऊन रस्त्यावर भलत्या ठिकाणीं पडले असतां तेथें मुलांस नेऊन ह्या व्यसनापासून किती हानि आहे, ती त्यांस स्पष्ट दाखवीत.

इराणदेशीं केखसु नांवें एक प्रख्यात बादशाहा होऊन गेला, त्याची एक गोष्ट असी आहे कीं, तो पूर्व वयांत असतां आईबरोबर आपल्या आजाच्या घरीं मिडिया-देशांत कांहीं दिवस राहावयास गेला; तो तेथील राजा होता. त्याची आपल्या नातवावर फार प्रीति बसल्यामुळें तो आपल्या घरीं पुष्कळ दिवस राहावा, हा हेतु धरून नाना प्रकारचीं पक्कानें करून त्याणें नातवास मेजवानी केली. तेव्हां ते सर्व पदार्थ पाहून त्यास कांहींच संतोष न होतां तो त्या पदार्थांचा तिरस्कार करून आजास असें बोलला कीं, आमच्या देशांत क्षुधा शमविण्याकरितां आह्मी एवढी खटपट करीत नाहीं. भूक भागविण्याचे आमचे मार्ग फार सोपे आहेत. ते असे, भाजीभाकर खावी, आणि वर पाणी प्यावें, ह्मणजे झालें. तेव्हां आजोबाने त्यास तीं पक्कान्नें मर्जीप्रमाणें वांटून देण्यास सांगितलें असतां जे जे त्याच्या प्रीतींतले होते, त्यांस तीं दिल्हीं; परंतु साकस् ह्मणून एक आजोबाचा आवडता खिसमदगार होता, त्यास त्याणें कांहींच दिल्हें नाहीं. याचें कारण हेंच कीं, जेव्हां त्याची इच्छा होई, तेव्हां तो त्यास आजोबाकडे भेटावयास नेत नसे.

त्या प्रसंगी आजोबास तें वाईट वाटून नातवास बोलला, मुला ! त्वां ह्या माझ्या भल्या चतुर चाकरास कांहींच कां दिल्हें नाहीं ?

**मुलगा**—आजोबा ! ह्या चाकराची चतुराई कशामध्यें आहे बरें ?

**आजोबा**—अरे ! दारूचा प्याला तीन बोटांनी धरून देण्याची लकब त्याचे ठायीं असी उत्कृष्ट आहे कीं, ती कोणालाच साधत नाहीं.

**मु०**—आजोबा ! आपण प्रसन्न होण्यास इतकाच गुण पाहिजे असल्यास त्यासारिखी मीहि आपली चाकरी करीन—असें ह्मनणू त्याच क्षणीं खिसमद्गारासारिखा सजून तयार झाला; आणि रत्नखचित प्याला दारूने भरून त्यासारिखें लकबीने हातांत धरून आजोबासमोर मोठ्या आर्जवाने उभा राहिला. तेव्हां असें त्याचें चातुर्य पाहून

राजा आणि राणी हे उभयतांहि फार खुश झाले; आणि आजोबाने ती दारू प्राशन केली. त्यावेळीं मुलगा आजोबाच्या गळ्यास मिठी घालून पुसूं लागला. आजोबा! आतां आपली मर्जी मजवर प्रसन्न झाली ना?

आ०--होय मुला! परंतु तूं एक गोष्ट विसरलास.

मु०—ती कोणती आजोबा?

आ०—जेव्हां साकस् दारूचा प्याला मजसमोर घेऊन उभा राही, तेव्हां तो प्रथम त्यांतून थोडीसी आपल्या डाव्या हातावर घेऊन चाखी. नंतर तो प्याला मला देई.

मु०— होय आजोबा! ती गोष्ट खरी; परंतु तसें म्या बुद्धया केलें नाहीं. कारण, तें विष मी कसें चाखूं बरें?

आ०—अरे मुला! तें विष आहे?

मु०—यांत काय संशय आजोबा.

आ०—असें तूं कशावरून ह्मणतोस?

मु०—आजोबा! ज्या दिवसीं तुह्मी गांवजेवण केलें, त्या दिवसीं तुमच्या दरबारांतील मोठे मोठे कामगार लोक दारू पिऊन अगदीं बेशुद्ध झाले. ते असे कीं, ते आह्मी राजाची प्रजा, हें केवळ विसरून गेले; आणि तुमचीहि तसीच अवस्था होऊन मी राजा, असें अगदीं विसरून गेला. (तें ऐकून आजोबा त्याच्या चातुर्याविषयीं मोठा विस्मय पावून पुसतो.)

आ०—मुला! तुझा बाप कधीं पीत नाहीं?

मु०—होय आजोबा! तहान लागली, ह्मणजे तो पाणी पीत असतो; तेणेंकरून त्याची अवस्था कांहींच बदलत नाहीं.

सिकंदर बादशाहा याणें मोठे मोठे देश जिंकून सार्वभौम पदवी पावण्याची वेळ आणिली. मग त्याला हें कैफाचें दुर्व्यसन लागल्यामुळें तो असी आढ्यता करूं लागला कीं, "मी ईश्वरी अवतार आहे; यास्तव लोकांनी माझीच भक्ति करावी." त्या वेळीं बहुतेक लोक त्यास देवासमान मानूं लागले. त्याप्रसंगीं त्याचा एक परम मित्र सरदार होता, त्याणें पूर्वीं ह्या राजास मोठ्या मोठ्या संकटांतून वांचविलें होतें; ह्मणून राजाची त्याजवर फार मर्जी बसली होती. एके दिवशीं राजा पुष्कळ दारू पिऊन "मी देवच आहें." असें अहंकाराचें भाषण करूं लागला. त्या समयीं त्याच्या मित्रास ती वर्तणूक फार वाईट वाटून त्याणें राजास उपदेश करण्याचा आरंभ चालूं केला; परंतु राजा कैफाच्या अमलांत असतां त्यास तो उपदेश न आवडून मोठा क्रोधायमान झाला; आणि लागलाच हुकूम केला कीं, याचक्षणीं याचा शिरच्छेद करा. त्याप्रमाणें तसी गोष्ट झाल्यावर जेव्हां त्याचें धड

राजाच्या दृष्टीस पडलें, तेव्हां त्याचा कैफ एकाएकीं उतरून ह्या दुराचरणाविषयीं त्याला मोठा अनुताप झाला; आणि शेवटीं वारंवार आपल्या मित्राचें स्मरण करून शोकांत बुडून मेला.

फिरंगी लोकांच्या पुराणांत गोष्ट एका विद्वानाने लिहिली आहे. ती असी कीं, कोणी एका साधूस एका दुष्टाने अडवून त्यास सांगितलें कीं, मी तीन प्रकारचीं पापें आचरण करण्याचीं नावें घेतों; त्यांतून तूं कोणतें तरी एक कबूल कर, ह्मणजे मी तुला सोडून देईन. तेव्हां त्या बिचाऱ्याने विचार केला कीं, दारू पिणें हें सुलभ आहे. त्याकडून कांहीं दुराचरण घडणार नाहीं. असी समजूत घेऊन तेंच मान्य केलें. परंतु पाहा! जेव्हां तो दारू प्याला, तेव्हां त्याच्या हातून दुसरींहि दोन्हीं पातकें सहज घडून आलीं.

कांहीं दिवसांमागें या मुंबई शहरांत एक सधन कोळी राहत होता, त्याची जिंदगी एक दोन वाड्या वगैरे बरीच होती. तो मेल्यानंतर ती सर्व दौलत मुलाच्या हातीं आली; परंतु तो मुलगा मोठा कैफी निघाला. त्याणें दारू पिऊन सर्वकाळ आपल्या अमलांत असावें. पैका आला कोठून? आणि जातो कसा? याची कांहींच शुद्धि धरिली नाहीं. शेवटीं थोडक्याच दिवसांनी त्याची सर्व जिंदगी जाऊन कर्जभरी होऊन कैफांतच मरण पावला. भांग, अफू, गांजा व दुसरेहि सर्व प्रकारचे कैफ ह्यांचा असाच परिणाम. ह्या एका कैफामुळें मोठमोठाल्या राजांचीहि नासाडी होऊन गेली आहे. जे राजे लोक कैफ करितात, त्यांच्या राज्यांत अंदाधुंदी होऊन सर्व प्रकारें प्रजेचा नाश होतो.

## यात्रेस जाण्यासाठीं अविचारानें खर्च केला असतां कर्ज होतें, याचा विचार

यात्रा कराव्या, असा ज्याने नेम लावून दिल्हा, त्याचा मुख्य हेतु असा असावा कीं, लोक निरंतर संसार खटल्यामध्यें निमग्न होऊन ईश्वराकडे कांहींच लक्ष देत नाहींत; तर त्यांस ईश्वराविषयीं ज्ञान होऊन त्यांजमध्यें सद्गुण उत्पन्न व्हावे; आणि त्याजकडून तारणोपाय घडावे, यासाठीं त्याणें हा नेम लावून दिल्हा असावा. मनुष्याने यात्रा करावी, ह्मणजे त्याचें मन ईश्वराकडे लागावें, ह्मणून यात्रेच्या उद्देशाने देशाटन घडून सृष्टींतील चमत्कार पाहावे; आणि आपला कोणीतरी नियंता आहे, असें त्याच्या मनांत ठसावें. मनुष्य केवळ सर्व काळ प्रपंचांत गुंतलेला असतो, आणि परमार्थाविषयीं कांहींच विचार करीत नाहीं; ह्मणून नेमकर्त्यांने अशी युक्ति योजिली आहे. मनुष्याने घर सोडून दूरदेशीं प्रवासास जावें; येणेंकरून काय होईल कीं, ह्या भवपाशांतून सुटल्या-सारिखा होऊन प्रवासाचे श्रम व दुःखें पडूं लागलीं, ह्मणजे क्षणोक्षणीं ईश्वराचें स्मरण

होत जाईल. प्रवास करीत असतां मोठाले वृक्ष, अरण्यें व नाना प्रकारचीं श्वापदें हीं दृष्टीस पडूं लागल्याने व मोठीं संकटें प्राप्त झाल्याने ईश्वराचें स्मरण होऊन आपण किती परतंत्र आहों, आणि ईश्वराच्या अनंत शक्तीपासून आपलें किती संरक्षण होतें, हें त्यांच्या ध्यानांत येईल. तसेंच समुद्र, महानद्या पाहून त्याच्या अंतःकरणांत ईश्वराची जगद्रचना यावी, आणि त्यामुळें त्याच्या आंगीं अत्यंत लीनता येऊन त्याणें आपल्या उद्धाराचा मार्ग शोधित असावा; परंतु लोक हा सर्व विचार एकीकडे ठेवून असें समजतात कीं, एकदां यात्रा केल्या, ह्मणजे जन्माचें सार्थक झालें. अशा कल्पना काढून जरी जवळ द्रव्य नसलें, तरी हजारों रुपये कर्ज काढून यात्रा करावयास जातात. तेथें जाऊन शेंकडों रुपये खर्च करून आपण कृतकृत्य झालों, असें समजतात. पाहा! कित्येक गरीबगुरीब लोक कर्ज करून अशा प्रकारच्या यात्रा करितात; परंतु वास्तविक यात्रा करण्याचा हेतु कोणी जाणत नाहीं. यात्रा करून आले, म्हणजे त्यांच्या आंगीं लीनता यावी, ती तर एकीकडेसच राहती; उलटा आंगीं मोठा अहंकार उत्पन्न होतो. तो असा कीं, म्यां यात्रा केली, म्हणून मी पुण्यवान्, मजसारिखा पुण्यवान् दुसरा कोणी नाहीं, असें तो मानीत असतो, येणेंकरून त्या यात्रेपासून त्याचें कल्याण होत नाहीं.

पाहा! आपण दुसऱ्याचें कर्ज काढून यात्रा करावी, आणि तें जर न फिटलें, तर त्या यात्रेपासून फळ काय? विश्वासघात करून दुसऱ्यास बुडवावें, यासारिखें मोठें पातक नाहीं. असल्या पातकापुढें त्याचें सत्कार्य काय कामाचें? आयुष्याचा तर घटकेचाहि भरंवसा नसतो; आणि पुढें कमाई करून कर्ज फेडीन, असा भरंवसा धरून कर्ज घेणें हें किती निंद्य दिसतें? याचा कांहींतरी विचार करून पाहा.

ईश्वरप्राप्तीविषयीं केवळ द्रव्याची अवश्यकता नाहीं. ज्याचे हातून एक कवडीहि ईश्वरप्रीत्यर्थ धर्म घडत नाहीं; असा जरी कोणी अति दरिद्री आहे आणि तो जर अंतःकरण शुद्ध करून ईश्वरभक्त झाला, तरी तो लक्षावधि रुपये अविचाराने धर्म करणाऱ्यापेक्षां ईश्वरास अधिक प्रिय होतो. असें मनांत आणून ईश्वरापासीं असी प्रार्थना करावी, कीं हे जगदुद्धारका! मला सत्य मार्ग दाखवून माझीं सर्व कर्मे तुझ्या दृष्टींत मान्य होतील, असें कर, मला सर्व प्रकारच्या संकटापासून दूर ठेव." पाहा! ईश्वर मनुष्यापासून दूर नाहीं. त्याला शोधायास केवळ देशांतरीं जाऊन शेंकडों रुपये खर्च केला पाहिजे, असें नाहीं. तो सर्वव्यापक आहे. जेथें आपण आहों, तेथेंच त्याची कृपा संपादन करून घेतां येती.

मुंबईमध्यें आंग्रोळींत छापिलें.

**समाप्त**



# HINDU DOMESTIC REFORM

# हिंदु लोकांच्या रिती सुधारण्याविषयीं बोध

**Bombay Tract and Book Society.**

2,000 Copies, Mara′thi′

---

मुक्काम मुंबई

**अमेरिकन मिशन छापखान्यांत छापिलें,**

**सन १८५१.**

# अनुक्रमणिका

अंक





# सुधारणुकेविषयीं साधारण विचार

कित्येक लोकांपेक्षां हिंदु लोकांमध्यें बहुतेक रिती, आणि आचरणें, हीं फार वाईट आहेत, यामुळें दुसरे लोक त्यांस अविचारी, आणि अज्ञानी मानितात. पाहिलें असतां ते लोक पूर्वीपासून कांहीं सुधारत आले आहेत, आणि त्यांत कित्येक मोठे मोठे विद्वान्हि होऊन गेले, परंतु त्यांनी देशसुधारणा व्हावी, व दुसऱ्याचें कल्याण व्हावें, आणि लोकांमध्यें आपली प्रतिष्ठा व्हावी, असीं साधनें करून ठेविलीं नाहींत. त्यांनी लोकांची प्रीति संपादन करण्यासाठीं आपल्या विद्येच्या बळाने भलतेच सण, व भलतेच नेम करून त्यांजवर कांहीं ग्रंथ लिहिले. मग कांहीं काळाने त्या ग्रंथांला शास्त्र मानून लोक प्रवृत्तींत आणूं लागले. यास्तव अशा रिती सुधारणें हें आमच्या लोकांस फार कल्याणकारक होईल, आणि तेणेंकरून ते इतर लोकांमध्यें प्रतिष्ठा, आणि बहुमान पावतील, यांत कांहीं संशय नाहीं.

सूक्ष्म विचार करून पाहिलें असतां, असें दिसून येतें कीं, आमचें ऐहिक व पारलौकिक सुख, किंवा दुःख, जे गुणदोष आह्मी आपल्या आईबापांपासून आणि कुटुंबांतील मनुष्यांपासून शिकतों, त्याजवर राहातें. आपले आईबाप, व घरचीं सर्व माणसें जर सूज्ञ असलीं आणि त्यांच्या सर्व रितीभाती चांगल्या असल्या, तर आमचेंहि आचरण तसेंच होईल. आणि जर आईबाप लहानपणापासून मुलांस देवाच्या भयांत वागवून लबाडी, इत्यादिक वाईट गोष्टी करण्यास न शिकवितील, तर मोठेपणीं त्या मुलांच्या रिती एकाएकीं सुटणार नाहींत. बहुतकरून लाहानपणीं मुलांच्या दृष्टीस ज्या ज्या गोष्टी पडतात, त्याच त्यांच्या मनांत ठसतात, आणि मोठेपणीं त्या गोष्टी सोडायास त्यांला फार श्रम पडतात. जर मुलांस लाहानपणापासून आईबाप घरांतच चांगली शिक्षा देतील, तर त्यांस शिकविण्यास फार श्रम पडणार नाहींत; आणि तीं मुलें विद्वान् व सद्गुणी होऊन सुखी राहतील. मुलांची आई चांगली, आणि विद्वान् असली, तर मुलें फारच चांगलीं होतील, कारण लाहान मुलांस फार करून आईपासींच अधिक संबंध पडतो, आणि आईचें आचरण पाहून त्याप्रमाणें तीं वागतात. तर स्त्रियांस विद्या शिकविणें हें त्यांसच उपयोगी पडतें, असें नाहीं, त्यांपासून पुरुषांचेंहि मोठें हित होतें. यास्तव स्त्रियांकडून विद्याभ्यास करविणें हें एक लोकांचे हिताचें मुख्य कारण होय, म्हणून सर्व लोकांनीं अवश्य हरएक प्रयत्नेंकरून या कामास लागावें. पाहा बरें! आईबापांच्या ज्या वाईट बऱ्या गोष्टी लाहानपणांत मुलांच्या दृष्टीस पडतात, त्याच तीं मोठेपणीं करीत जातात; आणि आह्मांलोकांमध्यें उत्तरोत्तर खोट्या रीति वाढत जातात, तेणेंकरून परकी लोकांमध्यें आपला फार उपहास होतो.

ज्या घरांत आम्ही राहतों तें घर आम्हास किती प्रिय असतें, आणि तें नीट

करण्यासाठीं आम्ही किती झटतों ! तसें ज्या कुटुंबांत आम्ही वागतों, तें आह्माला किती प्रिय असावें बरें ! व त्या मनुष्यांस सुधारण्यासाठीं आह्मी किती श्रम घ्यावे ! आणि जर तेंच कुटुंब न सुधारतां त्यांतील मनुष्यें एकमेकांचा द्वेष करूं लागलीं, तर त्यापासून किती हानि होती ! ज्यांबरोबर आह्मास जन्म कंठावयाचा, त्यांची वर्त्तणूक जर यथास्थित नसली, तर आमचें दुःख काय सांगावें ! अशा ज्या ज्या विपरीत गोष्टी असतील, त्या त्या मोठ्या युक्तीने काढून टाकाव्या, आणि दुसऱ्या चांगल्या चालू कराव्या, म्हणजे एतद्देशीय लोकांस सुख प्राप्त होईल, आणि दुसऱ्या लोकांमध्ये मोठा लौकिक होऊन त्यांजपासून मोठी योग्यता प्राप्त होईल. वाईट बऱ्या रिती सर्वांमध्यें आहेत, परंतु अधिक वाईट कोणामध्यें, आणि अधिक चांगल्या कोणामध्यें आहेत, याचा विचार करणें हें सूज्ञ लोकांचें काम आहे. आणि विचार करणें हेंच एक सुधारण्याचें साधन होय. एकादी चाल परंपरागत आहे, अशाच विश्वासानें केवळ राहूं. नये तर आपण गुणदोषाचा विचार करीत असावा.

---

## कुटुंबांतील स्थितीचें निरूपण

हिंदु लोकांत असी रीति आहे कीं, सर्व कुटुंबाने एकत्र राहावें. चार पांच भाऊ असले तरी ते आपल्या स्त्रियामुलांसुद्धां एकत्र राहतात, परंतु कोणी कोणी एकमेकांवर ज्या रीतीने प्रेमा ठेवावा त्या रीतीने ठेवीत नाहींत. कुटुंबात वारंवार स्त्रियांशीं, व पुरुषांशीं कज्जे होऊन एकमेकांचा द्वेष करितात. केवळ आपल्या हितावर मात्र दृष्टि असती, आणि त्या कुटुंबांत ऐक्य, व परस्पर प्रीति तादृश असत नाहीं. आईबापांचा अपमान वारंवार घडत असतो. आईबापहि त्यांसीं यथास्थित वागत नाहींत; स्त्रियांस तर चाकरासारिखें मानितात, स्त्रीपुरुष एकत्र बसून जेवीत नाहींत. कुटुंबांतील सर्व मनुष्यें एकत्र जमून देवाची प्रार्थना करीत नाहींत; मनास येईल तशीं तीं वागतात. मुलाने किंवा दुसऱ्या कोणी कुटुंबांतील माणसाने देवाची प्रार्थना केली नाहीं म्हणून त्यांस कोणी पुसत नाहींत. जर कोणी घरांतील मनुष्य रोगी झाला तर त्यास आरोग्य व्हावें, म्हणून सर्व मंडळी मिळून देवाची प्रार्थना करीत नाहींत, पण पंचाक्षऱ्यासाठीं मात्र पैका व्यर्थ खर्चितात, तो असा कीं, कोणी भलत्याच देवाचें नांव सांगून आंगांत वारें आणितो, आणि मी त्या रोग्यास गुण देतों असें सांगून त्याच्या कपाळास विभूत लावितो, आणि निंबें कापून त्याजभोंवती ओवाळून टाकितो. अशा ठकांवर विश्वास ठेवून लोक त्यांला पैका देतात.

कुटुंबांतील सर्व मनुष्यांहीं एकत्र राहावें, ही रीति फार चांगली आहे; परंतु तें

करें राहावें कीं, एकमेकांनीं मिळून असावें; कलह करूं नये. त्यांनी एकमेकांस सुख द्यावें; यांत द्वेष, मत्सर, कपट, आणि भांडण, हें अगदींच असूं नये. असी जर सर्व कुटुंबांतील माणसें वागूं लागलीं, तर त्या सुखास पार नाहीं; नाहीं तर विभक्त होणें हें बरें. आह्मामध्यें आईबापांचा व इतरांचा अवमान होतो, याचें कारण बहुतकरून असें आहे कीं, मुलांस चांगली शिक्षा मिळत नाहीं, तेणेंकरून तीं मनास वाटेल त्याप्रमाणें वागतात; आईबापासमोर बसून खेळतात, आणि दुसरे नानाप्रकारचे छंदहि करितात. बापाबरोबर मुलें जाऊन बैठकीस बसतात. तेणेंकरून त्यांची भीड मोडून तीं बिघडतात, आणि कुटुंबांमध्यें कांहीं ताळ राहत नाहीं. यास्तव अशा ज्या चाली, त्यांपासून आपली हानि होती, त्याविषयीं कांहीं विचार असावा.

कुटुंबांतील सर्व मनुष्यांहीं एकत्र मिळून ईश्वराची प्रार्थना करीत असावी, असा नेम ठेवावा, व आईबापांची आणि आपल्या वडिलांची यथाशक्ति सेवा करावी. चांगला जो ते उपदेश करतील, तो सर्वकाळ मानून त्यांची आज्ञा मोडूं नये; आपले भाऊबंदांसीं फार स्नेह ठेवावा, त्यांस आपल्याकडून सर्व सुखें मिळावीं ह्मणून देवाची प्रार्थना करीत जावी. ते रोगी झाले असतां औषधोपाय करून त्यांचें साह्य करावें. मंत्र्यांच्या ढोंगावर कदापि विश्वास ठेवूं नये. पाहा ! या अज्ञानास काय ह्मणावें ! जर दुगाणीच्या शेंदुरानें, आणि अर्धीच्या निंबानें रोगी बरे होतील, तर हजारों रुपयांच्या औषधांचा काय उपयोग ? रोग्यास औषध, क्षुधितास अन्न, तृषितास पाणी, हें ईश्वराने केलें आहे, तें उगीच काय ? जर मांत्रिक उपायाने रोग जातील तर क्षुधेलाहि तोच उपाय कां करीत नाहींत ? असल्या खोट्या रिती हिंदु लोकांच्या घरांत बहुतेक आहेत, त्या काढून टाकाव्या. सर्व अवस्थेमध्यें सृष्टिकर्त्ता जो परमेश्वर त्यासच शरण जावें; सर्व दुःखाचा परिहार करणारा त्यावाचून दुसरा कोणी नाहीं. आईबाप, व कुटुंबांतील दुसरे मनुष्यांस जीवंतपणीं जेवढें आपल्याच्याने सुख देववेल, तेवढें देत असावें.

मुहूर्तज्योतिष हें या हिंदुस्थानांत मोठें थोतांड माजलेलें आहे. मुलें जन्मास आल्यादिवसापासून त्यांच्यामागें ग्रहचक्र लागतें, व मनुष्यमात्राचें दैव ग्रहांच्या स्वाधीन आहे, असा या लोकांचा समज आहे. लाहानसान काम करावयाचें असलें तरी ते मुहूर्त पाहिल्यावांचून करीत नाहींत. दर आठवड्यास हजामत करावयाची असती, त्यासहि नक्षत्र, वार, तिथि पाहावी लागती. मग मोठीं कामें त्यावांचून कसीं होतील ? कोणी आजारी पडला अथवा कांहीं व्याधि झाली, तरी त्यास औषधोपाय करण्याबद्दल मांत्रिक उपाय करतील. याविषयीं असी एक गोष्ट झाली कीं, कोणी एक ब्राह्मण मोडशीच्या उपद्रवानें मोठा व्याकुळ होऊन मरावयास पडला होता, परंतु त्यास कोणी औषधउपाय करावयास ह्मटले नाहींत, तें ऐकून मला मोठें आश्चर्य वाटलें,

आणि मी त्याच्या सोबत्यास सांगितलें कीं, त्यास कांहीं औषधउपाय करा, तेव्हां त्याने उत्तर दिल्हें कीं, याला कांहीं औषध उपाय चालणार नाहीं, त्यास हा उपद्रव भूतबाधेपासून झाला आहे. तर यास कोणी चांगला पंचाक्षरी भेटल्यावांचून हा बरा होणार नाहीं. असें ह्मणून तो आणि त्या रोग्याची बायको हीं उभयतां पंचाक्षरी शोधावयास गेलीं. अशा रीतीने लोक अगदीं वेडे होऊन गेले आहेत. पंचाक्षरी आणि मुहूर्त–ज्योतिषी, ह्या दोघांनी तर हें हिंदुस्थान अज्ञानी करून ठेविलें आहे. यांनी हिंदू लोकांचींच मनें हरण केलीं आहेत, असें नाहीं. तर त्यांहीं दुसरे जातीचे बहुतेक लोक ह्मणजे पार्शी, मुसलमान, इत्यादिकांचींहि मनें हरण केलीं आहेत. लोक बहुतकरून मुहूर्तज्योतिषी आणि पंचाक्षरी ह्मटला, ह्मणजे त्यास मोठा प्रतिष्ठित मानितात.

याच प्रकारचें शकुनांचेंहि खूळ माजलें आहे, सहज जर कोणाएकास दमडीच्या जिनसाकरितां बाजारांत जायाचें असलें, तर तो बरावाईट शकून पाहिल्याशिवाय घरांतून बाहेर पडत नाहीं. आणि उमऱ्यांतून बाहेर पडावयाचे संधीस जर कोणी शिंकला, अथवा मांजर आडवी आली, किंवा लाकडाचा भारा समोर आला, किंवा एकटा ब्राह्मण समोर दृष्टीस पडला, तर तो घरांतून बाहेर पडावयास संकोच पावून क्षणभर घरांत बसून मग जातो. या प्रकारचे लक्षावधि बरेवाईट शकून आहेत. असाच लोक स्वप्नावरहि विश्वास ठेवितात. जर एकाद्यास वाईट स्वप्न पडलें, तर तो सर्व दिवसभर चिंताक्रांत असतो, आणि त्याचा दोष निवारण करावा ह्मणून पंचाक्षऱ्यापाशीं जाऊन कांहीं तरी उपाय करितो. पाहा! यापासून कोणास गुण येतो असें क्वचित्; परंतु त्यांचा त्यावर एवढा दृढ विश्वास बसलेला असतो कीं, तो दूर करणें कठीण पडतें. मनुष्यमात्राच्या सुखदुःखाच्या स्थितीची नेमणूक ईश्वरानें त्यास जन्मास घालावयाचे पूर्वीं करून ठेविली आहे. तिचा फेरफार, मांजर, लांकडाचा भारा, ब्राह्मण, अथवा पंचाक्षरी यांच्याने होईल कीं काय? नाहीं. हे वाचणाऱ्यांनो, तुह्मीच याचा विचार करून पाहा.

गोवर, देवी, इत्यादि रोग मनुष्यास जन्मांतून एकदां होतात. ते प्राप्त झाले ह्मणजे रोग्यास आराम पडावा, ह्मणून परम कृपाळू परमेश्वरापाशीं मागणें अवश्य आहे. परंतु रोग हीच कोणी देवी आहे, ह्मणून भलतेच नवस करणें, व तत्प्रीत्यर्थ शेंकडों रुपये उधळणें, हें किती अज्ञान आहे बरें!



## लाहान मुलांचें आचरण

हिंदु लोकांमध्यें लहान मुलांस आईबापांकडून चांगली शिक्षा मिळत नाहीं; तेणेंकरून त्यांची पुढें मोठी हानि होती. जेव्हां मुलें दोन तीन वर्षांच्या वयाचीं होतात, तेव्हांपासून त्यांचे आईबाप त्यांस चांगले गुण लावावयास श्रम घेत नाहींत; तेणेंकरून तीं मुलें लाहानपणापासून लबाडी बोलावयास, व दुसऱ्यांस ठकवायास शिकतात. जेव्हां आईबाप लाहान मुलांस कांहीं वाईट करितांना पाहतात, तेव्हां ते त्यांस शासन न करितां धमकावीतहि नाहींत, त्याचें कारण तीं असें सांगतात कीं, लहान मुलांस मारण्याचें भय दाखविलें म्हणजे तीं पुष्ट होत नाहींत, म्हणून जसें तीं करतील तसें त्यांला करूं द्यावें, आणि शिक्षा द्यावयाची ती मोठीं झालीं म्हणजे द्यावी, अशा अज्ञानाखालीं त्यांस हट्टी, दांडगीं आणि क्रूर, असूं देतात. मूल रडूं लागलें, किंवा कांहीं हट्ट करूं लागलें म्हणजे त्याची समजूत पाडायास त्याला भलभलत्या लबाड्या सांगतात. त्याच्या हातांत क्षणभर एकादा रुपया देतात, आणि कांहीं वेळानें त्याची गरज लागली म्हणजे बाजारांतून तुला खाऊ आणून देतों, असें सांगून त्याच्या हातांतून तो रुपया घेऊन त्याला कांहींच देत नाहींत. मूल जेवतेवेळीं कांहीं खोडी करीत असलें म्हणजे त्यानें लवकर जेवावें, याकरितां भलत्याच भुलथापी देतात, त्या अशा कीं, आज मामाचे घरीं लग्न आहे तेथें लाडू केले आहेत, आणि आम्हास जेवायास बोलाविलें आहे. आम्ही सर्व तिकडे जेवायास जाऊं. हें ऐकून तें आनंदानें लौकर जेवितें, आणि दिवसभर जेवायास जाण्याचे तयारींत असतें, परंतु जायाची वेळ येईना, असें पाहून तें खिन्न होऊन आईजवळ जाऊन पुसतें, तेव्हां त्याला आई भलतीच बयाद सांगती; तेव्हां तें मूल रडूं लागतें. मग ती त्याला "बावा आला" असें भय दाखवून रडण्याचें बंद करिती. याप्रमाणें मुलांस लाहानपणापासून लबाडी बोलणें, आणि दुसऱ्यास ठकविणें शिकवितात. तेणेंकरून त्या मुलांस लबाडी बोलणें, लोकांस ठकविणें, हेंहि एक आपलें काम आहे, आणि यामध्यें कांहीं वाईट नाहीं असें समजून त्याप्रमाणें तीं वागतात. मुलें नाना प्रकारचीं अभद्र भाषणें बोलतात, व लोकांस शिव्या देतात, तें ऐकून कोणी कोणी आईबाप खुशी होतात. दारांत भिकारी आला असतां, त्यास अपशब्द बोलून कदाचित् त्यास मारायासहि जातात. तें सर्व पाहून कोणीकोणी आईबापांस, व भाऊबंदांस संतोष वाटतो, मग त्या मुलांस असें वाटतें कीं, आह्मी करितों हें फार चांगलें आहे; आतां आह्मी असेंच करून आपल्या आईबापांस खुशी करूं. कित्येक स्त्रिया मुलांचे लाड इतके करितात कीं, त्यांस अगदीं घराबाहेर जाऊं देत नाहींत, व शाळेंतहि पाठवीत नाहींत, आणि त्या जें जें सांगतील तें तें मुलें करितात. मग त्या लोकांमध्यें आपलें महत्व सांगतात कीं, मी आपल्या मुलास एवढा मोठा झाला तरी शाळेंतसुद्धां अद्यापि जाऊं देत नाहीं. मुलांस बाळपणांत नाना प्रकारचे सोन्यारुप्याचे

अलंकार घालितात. मुलांस पांच सात वर्षें होत तोंपर्यंत शाळेंत पाठवीत नाहींत. याचें कारण विचारिलें तर असें सांगतात कीं, तो पंतोजीच्या भयानें वाळेल, किंवा शिकण्याचे धास्तीमुळें आजारी पडेल. मोठा झाला ह्मणजे जाईल असें सांगतात. लाहान मुलांचे लाड कोणत्या गोष्टीविषयीं करावे, आणि कोणत्या गोष्टीविषयीं न करावे हें या लोकांस समजत नाहीं. मूल कांहीं खोडी करूं लागलें आणि जर कोणी सूज्ञ पुरुष त्यास दूषण देऊं लागला, तर ते त्यास असें ह्मणतात कीं, तें अर्भक आहे. त्याला काय बोलावें ? या वयांत जर तें असें करणार नाहीं तर केव्हां करील ? तुह्मी लाहान होतेत, तेव्हांपासून साधूच होतां कीं काय ? "अहो ! असत्य भाषण बोलणें, मस्ती करणें, दुसऱ्या मुलां-बरोबर भांडणें, हट्ट करणें, दुसऱ्यास ठकविणें, शाळेंत जातों ह्मणून खेळायास जाणें, हे तर मुलांचे धर्म होत." आह्मी तर लाहानपणीं याहून अधिक ढंग करीत असों; आतां आह्मी मोठे झालों ह्मणून लाहान मुलांस कां बोलावें ? तीं आपल्या वयांत आलीं ह्मणजे सहजच त्यांस ज्ञान प्राप्त होईल, आणि वाईट आचरणें सोडून देतील. लाहानपणीं मुलांनीं कोणतेंहि वाईट कर्म केलें असतां त्याचा त्यांस दोष लागत नाहीं. एकदां संसारखटल्यामध्यें पडलीं, ह्मणजे मग त्यांला खेळ कोठून सुचेल ? आईबाप जीवंत आहेत तोपर्यंत त्यांला मौज करून सुख भोगूं द्या, अशा नाना प्रकारच्या कल्पना काढून मुलांचे दुर्गुण वाढवितात. हिंदु लोकांच्या मुलांस नीति ह्मणून काय आहे, व लबाडी बोलणें, दुसऱ्यास ठकविणें, चांगलें किंवा वाईट हें कांहींच समजत नाहीं.

गरीब, आणि नीच वर्णांतील मुलांचें आचरण तर फारच वाईट असतें. त्या मुलांस मोठेपणींहि शिक्षा मिळत नाहीं. तीं लाहानपणापासून साहजिक बोलण्यांत शिव्या देतात, व लबाडी बोलतात, त्यांला त्यांचे आईबाप स्वच्छ ठेवीत नाहींत. नेसावयास एक मळकट लंगोटी मात्र देतात; वरकड सर्व आंग उघडें असतें. आईबापांची तर त्यांला कांहींच भीड नसती. पांच साहा वर्षांपासून तंबाकू ओढायास शिकतात, त्यांस त्याविषयीं आईबाप कांहींच हरकत करीत नाहींत. तेणेंकरून तीं आपल्या मर्जीस वाटेल त्याप्रमाणें वागतात. सातआठ वर्षांच्या वयांचीं झालीं ह्मणजे त्यांस हेलमजुरीच्या कामास लावितात. त्यांला वाचावयास व लिहावयास शिकविण्याची काळजी स्वप्नींहि नसती. जर त्यांस पुसलें कीं, तुह्मी मुलांस शाळेंत कां पाठवीत नाहीं ? तर ते उत्तर देतात कीं, आह्मां कुळंब्यांस लिहिणेंवाचणें कशास पाहिजे ? हेलमजुरी करणें हेंच आमचें लिहिणें वाचणें. आह्माला शिकून कोठें जायाचें आहे ?

हे सूज्ञ लोक हो ! तुह्मी विचार करून पाहा ! लहान मुलांचें अंतःकरण किती कोमळ असतें बरें ! जर क्षणभर आई त्यांच्याजवळ नसली, तर तें किती विलाप करितें ? अशा वयांत जर त्याला चांगला बोध केला, तर तो किती उपयोगी पडेल ? आणि त्या मुलांचें किती कल्याण होईल बरें ? लाहानपणापासून भूतदया इत्यादि गुण त्यांच्या

मनांत ठसले असतां ते मोठेपणीं एकाएकीं जाणार नाहींत, आणि लाहानपणीं जर त्यांला तोंडांतून अपशब्द काढूं न दिल्हे तर ते शब्द मोठेपणीं उच्चारावयास त्यांस मोठें कठीण पडेल. पाहा! वृक्षाची डाहाळी कोमळ असतांना जसी लववीली तसी लवती; तीच जून झाली असतां किती प्रयत्न केले तरीहि लवणार नाहीं. त्याप्रमाणेंच मनुष्याच्या अंतःकरणाची अवस्था आहे. यास्तव मुलांस चांगले गुण लाहानपणापासूनच लावावयास परिश्रम करणें हें सूज्ञ लोकांचें काम होय. त्यांनीं मुलांस कधीं ठकवूं नये. ख्रिस्ती शास्त्रांत एक ज्ञानी पुरुष आईबापांस याप्रमाणें उपदेश करितो, "हे आईबापहो, जर तुम्हांस शांतींत मरायाचें असलें, तर आपल्या मुलांस प्रभूच्या भयांत वागवा. आणि त्यांच्या दृष्टीसमोर तुह्मी कांहीं वाईट कर्म करूं नका." यास्तव आपण लबाडी बोलूं नये, व कोणत्याहि दुराचरणांत पडूं नये. दारांत भिकारी आला तर त्यास धमकावूं नये व भिक्षा घालीत नाहीं असें ह्मणूं नये. सर्व काळ त्यांचे समक्ष जें चांगलें तेंच करीत असावें.

मुलांच्या आंगावर अलंकार घालण्यामुळें किती अनर्थ होतात ते पाहा! त्या मुलांची अलंकारावरच भक्ति बसती, आणि विद्येवर लक्ष लागत नाहीं. दुसरें मोठें भय असें आहे कीं, ज्या मुलांच्या आंगावर अलंकार असतात त्यांजवर चोर टपून त्यांचा घात करावयास पाहतात. पाहा! या देशांत अशा घातानें किती मुलें मेलीं असतील? व प्रतिवर्षीं असे अनर्थ किती घडतात! यास्तव मुलांच्या आंगावर अलंकार घालूं नयेत. कांहीं वर्षांमागें एके संभावित गृहस्थाचा सुमारें नऊ दाहा वर्षांचा मुलगा आंगावर अलंकार घालून वाड्यांत खेळत असतां एके चोरानें त्याला मिठाईची भुलथाप देऊन नेलें, आणि त्याच्या आंगावरचे सर्व अलंकार काढून घेऊन त्यास ठार मारून रस्त्याच्या एके बाजूस टाकलें. पाहा! या प्रकारचे अनर्थ वारंवार आमच्या पाहण्यांत; व ऐकण्यांतहि येतात. आणि हीं विघ्नें दूर करावयास आह्मांस फार श्रम व पैकाहि खर्च होणार नाहीं. असें असतांहि आह्मी याचा विचार करीत नाहीं—यास ह्मणावें तरी काय?

लहानपणीं मुलानें वाईट कर्म केलें तर त्याला दोष नाहीं, ह्मणून उगेंच राहूं नये. जेव्हांपासून त्यांस खावें काय न खावें काय, आपली वस्तू कोणती, दुसऱ्याची कोणती, मी हें केलें असतां मला लोक पाहतील; तर मी हें एकांतीं करीन, हें काम केलें असतां आईबाप रागें भरतील, असें समजूं लागतें, तेव्हांपासूनच त्यांला देवापासीं बऱ्यावाईटाचा हिशोब द्यावा लागतो. असें असून जर आईबापांनीं त्यांला सुधारलें नाहीं, तर ते ईश्वरापुढें दोषी ठरले जातील.

इंग्लिश लोकांची मुलें पाहा! तीं लाहानपणापासून किती शिक्षित असतात; आणि आपल्या आईबापांच्या, व देवाच्या भयांत कसीं वागतात? पक्षपात न धरितां तुह्मींच सांगा कीं, इंग्लिश लोकांचीं मुलें कोणास शिव्या देतांना तुह्मी

ऐकिलें आहे कीं काय ? आणि अभद्र भाषण कोणी करितांना ऐकिलें आहे काय ? तीं आईबापांच्या मर्यादेंत किती असतात! आणि त्याच्या रीती किती चांगल्या आहेत! हें सर्व आचरण तीं आपल्या वडिलांपासून शिकतात. त्यांच्या आईबापांस ह्या गोष्टी शिकवायास त्यांसाठीं अधिक श्रमहि पडत नाहींत. यास्तव मुलांस वाईट खोडी न लागाव्या, ह्मणून आईबापांनीं फार उद्युक्त असलें पाहिजे. जें आचरण घरांत मुलांचे दृष्टीस पडतें, तेंच तीं ग्रहण करितात, आणि मोठेपणीं त्याप्रमाणें वागतात; आणि मग असें ह्मणतात कीं, हें वडिलोपार्जित चालून आलें आहे, तस्मात् हेंच खरें, आह्मी दुसरे नेम, व शास्त्र हीं ओळखत नाहीं. म्या इंग्लिश लोकांच्या मुलांची प्रशंसा केली आहे ह्मणून कोणी असी कल्पना काढूं नये कीं, त्यांचीहि मुलें वाईट आहेत; त्यांमध्यें वाईट मुलें नाहींत असें माझें ह्मणणें नाहीं, परंतु चांगलीं अधिक मुलें कोणामध्यें आणि वाईट अधिक कोणामध्यें, किती आहेत ? आणि त्यांमध्यें विद्वान किती ? व आह्मामध्यें किती आहेत ? ह्याचाहि विचार करावा. इंग्लिशांचीं मुलें कितीहि वाईट असलीं, तरी तीं बिभत्स शब्द बोलणार नाहींत व शिव्याहि देणार नाहींत, हें तर काय ! परंतु बिभत्स शब्द इंग्लिश लोकांच्या कोशांतहि सांपडणार नाहीं.



## मुलांस शिकविण्याची रीति

उंच वर्णाचे हिंदुलोक आपलीं मुलें पांच साहा वर्षांच्या वयांत आलीं ह्मणजे त्यांस शाळेंत पाठवितात. मुलींस विद्या शिकविणें हें तर हिंदु लोकांच्या स्वप्नांतहि नसतें. मुलांस मात्र शिक्षा उपयोगी, असा त्यांचा समज आहे मुलांस वर सांगितलेल्या वयांत चांगला दिवस पाहून पंतोजीच्या स्वाधीन करितात. आणि जर मुलांचे आईबाप सधन असले तर ते त्यांस शाळेंत पाठवितेवेळीं मोठा समारंभ करून नाना प्रकारचीं वाद्यें आणितात; आणि आपल्या इष्टमैत्रांस आमंत्रण करून नारळ व साखर देतात. जर तो मुलगा शाळेंत दररोज स्वेच्छेनें येत नाहीं, तर त्याच्या घरीं पंतोजी जाऊन त्याला घेऊन येत असतो. आईबाप आपला मुलगा काय शिकतो ? आणि पंतोजी काय शिकवितो ? याचा तादृश शोध करीत नाहींत. मुलगा जर बुद्धिमान असला तर तो दोनतीन वर्षांनीं साधारण वाचायास, व लिहायास आणि कांहीं गुणाकार, व भागाकारपर्यंत हिशेब करायास शिकतो. आणि कांहीं श्लोक तोंडपाठ ह्मणतो. मुलांला व्याकरण, व इतिहास, भूगोल, खगोळविद्या, गणित, नीतिशास्त्र, पदार्थविज्ञान, धर्मोपदेश, इत्यादि सर्व विषय पंतोजी शिकवीत नाहींत, आणि आईबापहि हें विषय शिकवायास सांगत नाहींत. कारण, ते असें सांगतात कीं, आमच्या मुलास व्याकरण शिकून काय पंडित व्हावयाचें आहे ? इतिहास शिकून काय उपयोग ? शिवाजी अमुके वर्षीं सिंहासनावर बसला, त्यानंतर

पेशवे यांनीं अमुक वर्षें राज्य केलें; अमक्या राजानें अमुक राज्य केलें; या गोष्टींचें स्मरण ठेवून काय फळ आहे ? या सर्व गोष्टी माहीत झाल्या ह्मणून काय मोठे कारभार मिळतात! किंवा द्रव्य मिळतें ? असल्या काहाण्या शिकून कांहीं उपयोग नाहीं. खगोल विद्या शिकून जोशी व्हावयाचें आहे ? जोशी तर दारोदार भीक मागतात. भूगोलविद्या शिकून समुद्रामध्यें जाहाजें चालवावयाचीं आहेत कीं काय ? व पृथ्वीप्रदक्षणा करावयाची आहे ? सरकारी कामांत गणिताचा काय उपयोग ? त्रैराशिकपर्यंत हिशोब आले ह्मणजे चाकरीचें काम पार पडतें. आमच्या वडिलांनी लाखो रुपये मिळवून मोठमोठाल्या हवेल्या बांधिल्या, परंतु ते कुठें भूगोल खगोल विद्या शिकले होते ? गणित शिकून आमच्या मुलांस डोंगर मोजायास जाण्याचें प्रयोजन नाहीं. नीति शिकून न्यायाधिशपणा करावयाचा नाहीं. यांत वेळ मात्र व्यर्थ घालवावा. मोठेपणीं ह्या गोष्टी सहजच समजतील. पदार्थविज्ञान शिकून काय घड्याळें करावयाचीं आहेत ? अथवा आगीचीं तारवें बांधावयाचीं आहेत ? धर्माच उपदेश लाहानपणापासून केल्यानें मुलांचें मन संसारांत राहत नाहीं, आणि तीं सर्व काळ देवदेव करीत बसतील, आणि संसार सोडून देतील. तर या गोष्टी लाहानपणांत मुलांस शिकवूं नयेत. मोठेपणीं देवाची भक्ति सहजच करतील. पाहा! आलीकडे विद्या वाढूं लागल्यापासून द्रव्य नाहींसें झालें. आतांच्या विद्वानांनीं घरें कोठें बांधलीं आहेत, तीं दाखवा ? दुसऱ्या गोष्टी तर दूर राहिल्या; परंतु जुनीं आहेत, त्यांचीदेखील त्यांच्यानें दागदुजी होत नाहीं. पंतोजी मुलांस वाचावयास, लिहावयास आणि कांहीं हिशोब करावयास व मोठी परवड ह्मणावयास शिकवितो; परंतु त्यांचे दुर्गुण सुधारण्याकडे त्याचें लक्ष अगदीं नसतें. जर मुलगा आपला धडा चांगला शिकला नाहीं तर त्यास शिक्षा करावी, इतकेंमात्र त्याला माहित असतें. परंतु त्याला उपदेश करावा, व त्याजकडून वाईट रिती सोडवाव्या याविषयीं कांहींच पाहत नाहीं. थोडासा अपराध झाला असतां तो त्या मुलांस एकदम मारीत सुटतो. पंतोजीस पाहिलें ह्मणजे मुलें घाबरून जातात, आणि त्यांस असा भास होतो कीं, पंतोजी ह्मणून कोणी एक काळपुरुष मुलांस मारावयासच झाला आहे. असा विचार करून तीं मुलें पंतोजीचा द्वेष करितात, तेणेंकरून मुलांची त्याजवर प्रीति बसत नाहीं.

नीच वर्णाच्या मुलांस तर बहुतकरून शिक्षा मिळतच नाहीं. मग मुलींची गोष्ट तर लांब आहे! तीं सातआठ वर्षांचीं झालीं ह्मणजे हेलमजुरी करून पोट भरूं लागतात, तेणेंकरून तीं अगदीं अशिक्षित असतात. त्यांत जर कोणी सधन असला तर तो आपल्या मुलास शाळेंत पाठवितो. परंतु नीच वर्णाचा मुलगा ह्मणून पंतोजी आणि दुसरीं मुलें त्यांशीं भेद ठेवून, संस्कृत श्लोक व धर्माच्या गोष्टी आल्या, तर त्या त्यास शिकवीत नाहींत. बहुतकरून नीच वर्णाचीं मुलें मळीन असतात. त्यांला नेहमी अंघूळ घालीत नाहींत, ह्मणून त्यांचें आंग मळकट असतें. त्यांचे आईबापहि तसेच असतात.

मुलें चारपांच वर्षांच्या उमेरीत आलीं ह्मणजे तीं शाळेंत घालावीं. केवळ पंतोजीची विद्या पाहूनच मुलास त्याच्या स्वाधीन करूं नये. तो विद्वान असून जर दुराचरणी असला, तर त्याजपाशीं मुलांस कधीं पाठवूं नये. कारण, त्याचे कांहीं तरी अवगुण त्या मुलांस लागून मुलें बिघडतील, यांत संशय नाहीं. यास्तव पंतोजी सद्गुणी आहे, किंवा नाहीं ? असा पक्का शोध केल्यावांचून त्याजपाशीं मुलांस सोंपूं नयेत. त्याची विद्या कमी असली तरी चिंता नाहीं, परंतु तो दुराचरणी मात्र नसावा. मुलगा नित्य शाळेंत जातो किंवा नाहीं, याचा शोध नेहमी आईबापांनीं ठेविला पाहिजे. सायंकाळीं जशी फुरसत सांपडेल त्याप्रमाणें दोन घटिका तरी बापानें मुलास कांहीं तरी शिकवावें. तसेंच, पंतोजी काय शिकवितो ? याचाहि शोध नेहमी ठेवीत असावा.

जसें मुलांस शिकविण्याचे अगत्य आईबाप बाळगितात तसेंच मुलींसहि शिकविण्याचें अगत्य बाळगावें. मनांत भलत्याच खोट्या कल्पना आणूं नयेत. मुलास शाळेंत पाठवितेवेळीं व्यर्थ खर्च करून पैका नासूं नये. तो त्याच्या विद्याभ्यासासाठीं खर्चिला तर पुत्र विद्वान होऊन आईबापांस सुख देईल. कित्येक लोक असें ह्मणतात कीं, स्त्रियांस विद्या शिकविली असतां त्या विद्येचा उपयोग वाईट करून उन्मत्त होतील, आणि आईबापांची अवज्ञा करतील, आपल्या नवऱ्यांस मानणार नाहींत, व नाटकादि ग्रंथ वाचून दुराचरण करूं लागतील. तर असे जे विचार आहेत, ते मनांतून अगदीं काढून टाकावे. ही गोष्ट खरी आहे कीं, विद्येपासून दुर्गुण उत्पन्न होतात; परंतु कोणत्या प्रकारचे विद्येपासून होतात, याचा विचार करावा. जर नीति, उपदेश, व ईश्वरी गुणानुवादाचे ग्रंथ मुलास किंवा मुलीस शिकविले, तर त्या विद्येपासून कोणास कधींहि अपकार होणार नाहीं. त्यांला शिकायास जे चांगले ग्रंथ असतील तेच द्यावे. चांगले ग्रंथ वाचिल्यानें त्यांला कल्पांतींहि अपकार न होतां, त्यांच्या सद्गुणाची उत्तरोत्तर वृद्धि होत जाईल; आणि तेणेंकरून त्यांचें कल्याण होईल. आपल्या भाषेंत चांगले ग्रंथ नसून जर दुसऱ्या भाषेंत असले, तर त्यांचें भाषांतर करून ते ग्रंथ मुलांस, किंवा मुलींस शिकवावे. वाईट ग्रंथ वाचणें, आणि वाईट सोबत्यांबरोबर असणें, हें सारखेंच आहे. यास्तव भलताच ग्रंथ लाहान मुलांस न वाचूं देण्यास फार संभाळलें पाहिजे. जें मुलांस शिकविणें त्याचा अर्थ त्यांला सांगावा, ह्मणजे चांगला किंवा वाईट हें त्यांचा तींच विचार करून शुद्धाशुद्ध समजतील. मुली विद्या शिकून रोजगार करावयास जात नाहींत. तथापि त्यांच्या शिकण्यापासून पुरुषांस मोठा लाभ आहे. त्या आपल्या नवऱ्याच्या घरचा सर्व हिशोब ठेवितील. कदाचित् आपला नवरा परदेशीं गेला असला, तर आपल्याकडील सर्व हकिकत त्यास लिहून कळवीत जातील; व नवऱ्याचें पत्र आलें असतां तेंहि स्वतः वाचून पाहून त्याप्रमाणें वर्त्तणूक करितील. स्त्रियांस वाचतां लिहितां आलें म्हणजे त्यांचें सर्व गोष्टीविषयींचें अज्ञान नाहींसें होईल. आणि गृहसंबंधीं

अल्पकारणावरून नवऱ्यासीं कलह न करितां सर्व काळ आपल्या आईबापांच्या व पतीच्या, सेवेंत तत्पर असत जातील. पाहा! इंग्लिश लोकांच्या स्त्रिया किती विद्वान आणि सुज्ञ असतात! मोठमोठाले ग्रंथ करितात, ह्मणून त्या आपल्या आईबापांच्या, व भर्त्यांच्या सेवेंत कमी असतात कीं काय? आमच्या स्त्रियांपेक्षां त्या आपल्या भर्त्यांवर, आईबापांवर व कुटुंबांतील सर्व मनुष्यांवर अधिक प्रीति करितात. अशा लोकांच्या कुटुंबांतील मनुष्यांमध्यें स्वस्थता व सुख अधिक असतें.

विचार केला असतां मुलांस वाचणें, व लिहिणें याशिवाय दुसऱ्या विद्या शिकविण्याचें कारण, आणि अगत्य, आमच्या दृष्टीस असें दिसून येतें. पाहा! व्याकरण शिकल्याने मुलांस शुद्ध भाषा बोलावयास व लिहावयास येती. कोणत्या शब्दाची उत्पत्ति कोठून झाली, हें समजतें. ग्रंथ वाचायास येऊन शब्दाचा खरा अर्थ समजतो. ऱ्हस्व, दीर्घ, आणि विभक्ति, इत्यादि सर्व भेद समजतात. व्याकरण हें भाषा समजण्याविषयीं उपनेत्र ह्मणतात. मुलांस इतिहास माहित असले, ह्मणजे मागें कोण कोण राजे झाले? आणि त्यांचीं आचरणें कसकसीं होतीं, तें समजतें. आणि त्या वेळीं कोण कोण विद्वान झाले, आणि त्यांस त्या विद्येपासून किती योग्यता मिळाली, आणि ते कोणकोणत्या विद्येमध्यें प्रवीण होते, हें समजतें. आपले पूर्वज कसे होते, त्यांच्या प्रतिष्ठा कशा होत्या, आणि आतां आह्मामध्यें काय फेर झाला, हें सर्व माहित होतें. आणि तीं मुलें त्या सर्व गोष्टींचा विचार करून पाहतात. वाईट लोकांस ईश्वराकडून, व राजाकडून कसें शासन मिळतें, अथवा जे दुष्ट राजे होऊन गेले त्यांचा कसा परिणाम झाला, हें सर्व त्यांच्या लक्षांत येतें. भूगोलविद्या शिकल्यानें कोणतीं राज्यें कोठें आहेत, आणि त्यांचें, व स्वदेशाचें किती अंतर आहे; अमुक राजानें कोठें राज्य केलें, पृथ्वीचे भाग किती आहेत, व त्यांत जमीन किती, आणि पाणी किती आहे, हें समजतें. खगोळविद्येपासून, सूर्य, चंद्र, व तारे यांचें मान व ग्रहणाचें कारण, हीं समजतात. ग्रहांची संख्या, गति आणि अंतर यांची माहितगारी होऊन, ईश्वराच्या अनंत शक्तीविषयीं ज्ञान होतें. गणितविद्या शिकल्यानें कांहीं गोष्टींचा सिद्धांत चांगला करितां येतो. बुद्धीचा प्रसर होऊन तर्कशक्तीची वृद्धि होती पदार्थविज्ञानापासून सर्व पदार्थांची स्थिति समजती. नीतिशास्त्र शिकल्यावांचून मुलांच्या आंगीं प्रौढपणा न येतां, त्यांला सत्कर्म करण्याविषयीं धैर्य होत नाहीं. नीतिशास्त्र आपण आपल्या आईबापासीं, व भाऊबहिणीसीं, व मित्रासीं कसें वागावें हें सर्व शिकवितें. तसेंच आपण कोठून आलों, जातों कोठें, करावें काय, न करावें काय, सन्मार्ग कसे आहेत, कुमार्ग कसे आहेत, हें सर्व समजण्याकरितां ईश्वरप्रणित शास्त्र शिकलें पाहिजे. हें जर लाहानपणीं मुलांस न समजलें, तर मोठेपणीं कधीं समजणार नाहीं. पाहा! जर मुलगा लाहानपणीं विद्या शिकला नाहीं, आणि थोरपणीं शिकूं ह्मणून राहिला, तर ती प्राप्त होईल काय? नाहीं. जर मुलांस

बाळपणांत देव कसा आहे, आणि तो आह्मासाठीं काय करितो, हें समजलें नाहीं, तर मोठेपणीं ह्या गोष्टी लक्षांत येणें, फार कठीण आहे. जर हें मुलांस शिकविलें नाहीं, तर तीं उन्मत्त होऊन देवास, व आईबापांस, विसरतील. यास्तव ईश्वरप्रणित शास्त्रावांचून इतर विद्या शिकविणें व्यर्थ आहेत. जसी कोणत्याहि पदार्थांस मिठावांचून रुचि येत नाहीं, तद्वत् शास्त्रावांचून विद्येस भूषण येत नाहीं. अथवा पाया खणल्यावांचून जसें बांधलेलें घर कोसळून पडतें, तसी त्या विद्येपासून त्याची हानि होती. विद्या शिकल्यानें मूल प्रवीण होऊन दुर्व्यसनी, दुराचरणी झाला, तर त्याच्या विद्येचा उपयोग काय ? या प्रकारें या सर्व विद्या शिकणें हें फार अगत्याचें, आणि उपयोगी आहे. या सर्व विद्या शिकल्यावांचून विद्वान होत नाहीं. जसें, एखादि साधारण पेटी जरी करायाची असली तरी सुतारास सर्व आउतांची गरज लागती, तसें विद्वान होण्यास या सर्व विद्यांत थोडें तरी गम्य असलें पाहिजे. त्याशिवाय त्याचें ज्ञान न वाढून तो योग्यता पावत नाहीं. याविषयीं एक गोष्ट सांगतों, ऐका. अमेरिका देशांत बेंजामिन फ्रांकलिन् ह्मणून एक गरीब मेणबत्ती करणाऱ्याचा मुलगा होता, तो स्वतः फार उद्योगी, आणि त्याचें लक्ष विद्येवर होतें, परंतु तो गरीब असे ह्मणून त्याला काम करून उदरनिर्वाह करावा लागत असे. तो कामावर जाई, आणि अवकाशाप्रमाणें विद्याहि शिके. मग कांहीं काळानें तो मोठी योग्यता पावून राजलोकांसीं बसूं लागला आणि मोठेमोठे ग्रंथहि करूं लागला. तेव्हांपासून युरोपांत, आणि इतर देशामध्यें त्याची फार कीर्त्ति झाली.



## लग्न आणि त्यासंबंधी संस्कारांचें निरूपण

हिंदु लोकांमध्यें मुलाचें, किंवा मुलीचें लग्न लाहानपणीं करितात. सामान्यपक्ष मुलगी पांचसहा, आणि मुलगा दाहाबारा वर्षांच्या वयांत आला ह्मणजे झालें. आणि कोणी दोनअडीच वर्षांचे मुलीचेंहि लग्न करितात. मुलाचें, व मुलीचें लग्न करण्यांत मोठें पुण्य आहे, असें सांगतात. जवळ पैका नसला तरी शेंकडो रुपये कर्ज काढून हरप्रयत्न करून त्यांचें लग्न करून घेतात. दुसरें असें सांगतात कीं, लग्नांत असत्य बोललें तर त्यास दोष नाहीं. लग्न करण्याच्या पुण्याखालीं असत्याचा दोष राहत नाहीं. मुलीच्या, आणि मुलाच्या अनुमत्ताशिवाय आईबाप त्यांचें लग्न करून देतात. सोयरीक जमून देणारे मुलीच्या आईबापास त्याच्या गुणाविषयीं पुष्कळ लबाड्या सांगतात. जरी ती मुलगी दुर्गुणी, रोगी, हट्टी, असली तरी ती चांगली, शाहाणी, असें सांगतात. त्याचप्रमाणें मुलगा मूढ, व्यसनी, असला, तरी तो ज्ञानी, सद्गुणी, असें सांगतात. बहुतकरून आईबाप मुलाचे, किंवा मुलीचे गुणदोष शोधायाचे भरीस पडतच नाहींत,

मुलीचे व मुलाचे आईबाप सधन आहेत, किंवा निर्धन आहेत, याचा मात्र विचार करितात. लग्नाची गोष्ट आली ह्मणजे प्रथम हा प्रश्न करितात कीं, मुलीवर किती तोळे सोनें घालाल ? व मुलास काय वरदक्षणा द्याल ? मुलीच्या किंवा मुलाच्या लग्नाचा ठराव बहुतकरून अशा गोष्टींवरून घडून येतो. सद्गुणदुर्गुणाकडे कोणी पाहत नाहीं. लग्नासाठीं सवाईचें व्याज कबूल करून देखील शेंकडो रुपये कर्ज काढितात. लोकांनीं आपणास मातबर ह्मणावें ह्मणून पुष्कळ व्यर्थ खर्च करितात; मोठमोठाले मंडप घालितात. श्रीमंत लोकांच्या स्त्रियांचे अलंकार, व उंच वस्त्रें जायांचीं मागून आणून आपल्या घरच्या स्त्रियांवर घालतात. लोकांचे रथ, घोडे, पालख्या इत्यादि मागून आणितात; आणि त्याबद्दल व्यर्थ खर्च करितात, ताशेमर्फे इत्यादि वाद्यें आणून, दुसऱ्या नाना प्रकारच्या भलत्याच रीतीनें पैका उधळतात. कलावंतिणीचा नाच करितात. लग्नास नवरा जातेवेळीं वरातीबरोबर ती कलावंतीणहि जाती; ह्मणजे ती सर्वांत पुढें होती, तिच्या पाठीमागून जे प्रतिष्ठित ह्मणवितात ते जातात. आणि कदाचित् कलावंतिणीस जेवढा मान मिळतो तेवढा एकाद्या वास्तविक विद्वानासहि मिळणें कठिण असतें. हें तर काय! परंतु जें देवालय पवित्रस्थान असें मानितात, तेथेंहि तिचा नाच व बैठक करावयास कांहींच भय बाळगीत नाहींत. लग्नघरांत तिची बैठक करून तिला एके बैठकीस शेंपन्नास रुपये देतात. नवऱ्याचा बाप, किंवा नवरीचा बाप, तसाच सधन असला तर लग्नासंबंधीं पांचसात बैठकी करून चारपांचशें रुपये खर्च करितो. या प्रकारें मुलगीस मुलगा होईपर्यंत अणखी दुसरे दोनतीन वेळ निरर्थक खर्च करितात. लग्नाचे विधि आणि खर्च असे आहेत कीं, ते लिहिले असतां ग्रंथविस्तार फार होईल, ह्मणून लिहीत नाहीं.

पुढें मुलगीला जर मुलगा झाला तर त्याच्या आईबापांस, व कुटुंबांतील सर्व मनुष्यांस मोठा हर्ष होतो. याचें कारण असें आहे कीं, कुलांत पुत्र उत्पन्न झाला ह्मणजे त्याचे पूर्वज मुक्त होतात, आणि त्या आईबापांस स्वर्गलोकीं जायास मार्ग उघडा होतो; असा या लोकांचा समज आहे. बाप त्या मुलाचें पुत्रावण करून, लोकांस नारळ व साखर वांटितो, आणि तो सधन असला, तर कलावंतिणीचा नाचहि करतो; आणि त्या प्रसंगीं चारपांचशें रुपये खर्च करितो. जवळ पैका नसल्यास कित्येक कर्ज काढूनहि हा समारंभ करितात. परंतु मुलगी झाली असतां तादृश आनंद पावत नाहींत, व अधिक खर्चहि करीत नाहींत आणि ती झाल्यादिवसापासून तिच्या लग्नाची काळजी वाहातात मुलाचे तिसरे वर्षी चौल करितात, त्यासहि व्यर्थ खर्च होतो. ब्राह्मणादि करून दुसरे उंच वर्णांतील मुलाची सातापासून दाहा वर्षेंपर्यंत मुंज करितात. त्यांतहि लग्नासारिखाच अव्यवस्थित खर्च, बैठक, इत्यादि करितात.

तुह्मी क्षणभर विचार करून पाहा कीं, पांचापासून वीस वर्षें होत तोंपर्यंत मुलाचा किंवा मुलीचा विद्या आणि ज्ञान मिळवायाचा समय, असें असतां अल्पवयांत

जर आपण त्यांचें लग्न करून दिलें, तर त्यांला विद्या कशी प्राप्त होईल? लाहानपणापासून जर मुलें संसाराची काळजी वाहूं लागलीं, तर त्यांच्या ज्ञानाची वृद्धि कशी होईल बरें! तीं आपल्या देशाचें व सोयऱ्याधायऱ्यांचें हित कसें करतील! लग्न म्हणजे प्रपंच आणि परमार्थ याचें साधन आहे. सर्व प्रपंचांतील सुख स्त्रियांपासून होतें; यास्तव ज्याचें जिशीं लग्न करणार, त्या परस्परांची प्रीति असल्यावांचून लग्न करणें हें फारच वाईट. आईबाप, आपल्या मनास येईल त्याप्रमाणें त्यांची परस्पर प्रीति न पाहतां मुलाचें अथवा मुलीचें लग्न लावून देतात. कदाचित् पुढें त्या स्त्रीपुरुषांशीं कधीं असाहि प्रसंग येतो कीं, तीं एकमेकांस सोडून वेगळीं राहतात. कितीएकांचें भांडण होतें, आणि सर्वकाळ दुःखी असतात. पाहा बरें! ज्या वेळेस त्यांचें लग्न लागतें त्यावेळीं उभयतां स्त्रीपुरुषांपासून काय करार करून घेतात? नवरा असें बोलतो कीं, "आजपासून ही माझी बायको, इजवर मी प्रीति करीन, आणि इजवांचून दुसरीवर प्रीति करणार नाहीं. जें जें कर्म करणें तें मी इजसंगें करीन. इला कोणत्याहि वाईट अवस्थेंत टाकणार नाहीं." याप्रमाणें उभयतांचें लग्न लावितात. तर तुह्मी पाहा! तीनचार किंवा आठ वर्षांच्या मुलांस याचा काय अर्थ समजतो? मोठेपणींहि बहुतेकांस याचा अर्थ ठाऊक नसतो तस्मात् लाहानपणीं लग्न करूं नये, मोठेपणीं करावें हें फार चांगलें. मुलीचें लाहानपणीं लग्न केलें, आणि दैववशात जर कांहीं अपाय घडला तर पाहा बरें! त्या मुलीची काय दुर्दशा होती. पुनर्विवाहाची रूढी नसल्यामुळें तिला मरणपर्यंत वैधव्य भोगावें लागतें. स्वरूप पालटावें लागतें, आणि नाना प्रकारचीं दुःखें भोगावीं लागतात. तिला आपला जन्म आईबापांचे घरीं. केवळ बंदीप्रमाणें घालवावा लागतो, व त्यापासून कदाचित् दुसरे अनाचारहि होतात. यास्तव लहानपणीं मुलांचें लग्न सहसा करूं नये.

आपणापाशीं जर लग्न करायास पैका नसला, तर अविचारानें कर्ज काढून लग्न करणें हें मोठें मूर्खत्व आहे. कर्जामुळें लोकांची दुर्दशा होती, चक्रवाढीच्या व्याजांत बुडून कर्जबाजारी होऊन जातात, त्यामुळें नापत होती. शेवटीं बंदिखानाहि भोगावा लागतो, आणि ते कुटुंबसुखास अंतरतात. तस्मात्, घरांत उपासीं राहून लोकांकडून श्रीमंत ह्मणून घेण्यांत काय सुख आहे? दुसरे लोक आपलें कर्ज फेडायास येणार नाहींत; उलटी आपली बचेरी मात्र करितील. लोकांकडून श्रीमंत ह्मणवून कुटुंबाचा घात करणें यांत केवढा वाईटपणा आहे, हें पाहा बरें! जो पैका लग्नास भलतेच ठिकाणीं खर्चितों, तो जर कुटुंबाच्या संरक्षणार्थ व्याजास लावून ठेविला, तर त्यापासून कुटुंबाचें, आणि मुलांचें, व मुलींचें किती कल्याण होईल बरें! लग्न मुंज, पुत्रावण इत्यादि शुभकार्यांचे ठिकाणीं वेश्यांचा नाच, गाणें करणें यांत आपणांस किती पाप लागतें, तें पाहा! जेव्हां त्यांस लोकांपासून एवढे मान मिळून त्यांचें पोषण होतें तेव्हां त्यांस आपला धंदा

चांगला वाटून त्या आपल्या मुलींसहि तोच शिकवितात, तेणेंकरून त्यांची अधिकच वृद्धि होती. जर त्याचें साह्य आमचे लोकानी न केलें, तर त्या या कामांत प्रवृत्त होणार नाहींत. ज्या अर्थीं त्यांचें पोषण सर्व प्रकारें आह्मांकडून घडतें, त्याअर्थीं त्यांच्या सर्व कुकर्मांचे विभागी आपण होतों. लग्नास, व, दुसऱ्या कोणत्याहि कामास जो खर्च करणें तो विचार करून करावा. ज्या पैक्याचा आपण व्यय करितों, तो ईश्वराजवळ रुजु होईल किंवा नाहीं, हें मनांत आणावें. पैका मिळवण्यास आपणास बहुत श्रम पडतात–तर तो आपण व्यर्थ कां नासावा ! जेणेंकरून ईश्वरप्राप्ति होईल, तें साधन यथाशक्ति करावें. जे ईश्वरप्रणीत धर्म असतील, ते करावयास कधीं आलस्य करूं नये.

असत्य बोलणें हें किती पाप आहे ! याविषयीं असें प्रमाण आहे कीं, "नानृतात्पातकं परम् "–खोटें बोलण्याहून दुसरें मोठें पातक नाहीं. लग्न करणें हा किती पवित्र, आणि सुखदायक विधि आहे ! याचा विचार करून पाहा बरें ! उभयतां स्त्रीपुरुषांचें कल्याण, व प्रीति असली, तर सर्व यथास्थित चालतें. जर त्या एकमेकांत विपर्यास पडला, तर त्यासारिखी दुसरी फजिती कोणती ! मुलगा, व मुलगी, हीं रोगी, दुर्गुणी, द्वाड, कुरूप असून तीं सद्गुणी, सुशील, सुंदर, असें सांगणें, यांत किती दोष असेल तो पाहा ! आणि जेव्हां त्यांच्या आईबापांस तीं वाईट आहेत असें समजून येतें, तेव्हां त्यांला किती खेद होत असेल ! तें तर असो, परंतु पुढें त्या दोघांची काय अवस्था होती, तीजवर तरी कृपा करून दृष्टि द्या. पाहा ! या असल्या चालींमुळें किती दोष लागतो आणि अनर्थ होतात ! यामध्यें आपण पापाधिकारी होऊन दुसऱ्यास संकटांत पाडितों. असी जी लग्नांत असत्य बोलण्याची रीति, ती सोडून द्यावी, ह्मणजे त्यापासून सर्वांचें कल्याण होईल.

---

## स्त्रियांची स्थिति

हिंदु लोकांत मुलींकडून विद्याभ्यास करवीत नाहींत. आणि शिवण्याचें कामहि शिकवीत नाहींत, व गृहसंबंधीं शिक्षाहि तादृश लावीत नाहींत. जसें त्या आपले आईचें व दुसऱ्या स्त्रियांचें आचरण पाहतात, त्याप्रमाणेंच आपल्या बुद्धीनें वर्त्ततात. त्यांचें लाहानपणींच लग्न करितात. त्या प्रौढवयांत येत तोंपर्यंत बहुतकरून माहेरींच असतात. नवऱ्याचे घरीं गेल्या ह्मणजे त्यांला फार प्रतिबंध असतो. तो असा, सासुसासऱ्याबरोबर बोलूं नये व बसूं नये; ते जर गरीब असले तर त्यांना स्वयंपाक, दळण, आदिकरून सर्व कामें करावीं पडतात त्यांची करमणूक हीच कीं, अलंकाराच्या गोष्टी कराव्या, किंवा जुने अलंकार असतील ते मोडून नवे करावे. त्या आपल्या नवऱ्यासीं क्षणोक्षणीं डागिन्याविषयीं, व वस्त्राविषयीं गोष्टी करितात. आणि मनाप्रमाणें झालें नाहीं ह्मणजे त्याजवर

रुसून कधीं कज्जाहि करितात, आणि शेजारिणीचे संपत्तीचीं उदाहरणें देतात. "पाहा! तिचे नवऱ्यानें तिजवर पांच शेर सोनें घातलें आहे, तिला दोन शाली आहेत, तिच्या पायांत तोडे आहेत. ती नेहेमी नवे डागिने घडविती. तिला पांचशें रुपयांची नथ आहे." व दुसऱ्या गोष्टी अशा करिती कीं, मुलाचें लग्न केव्हां करावें? सुनेस किती शेर सोनें घालावें? व विहिणीस कसलें लुगडें द्यावें? परंतु आपल्या वर्तणुकीविषयीं, व मुलाचे शिक्षेविषयीं, किंवा सुधारण्याविषयीं कधींहि बोलत नाहींत. मग ईश्वराविषयीं बोलणें तर लांबच आहे! स्त्रियांस पुरुषांसमक्ष बोलण्याची बंदी आहे. त्यांनीं परकीय पुरुष आला असतां त्यासमोर राहूं नये, व सासुसासऱ्यादेखत बोलूं नये, आणि त्यांच्या-देखत आपल्या नवऱ्यासीं बोलूं नये. नवरा जेवला ह्मणजे त्याच्या पात्रावर तिनें जेवावें; त्याच्यापूर्वीं जेऊं नये, असी रूढी आहे. स्त्रियांनीं उंच आसनावर बसूं नये, त्यांनीं नवऱ्याचे सेवेंत असावें पति हाच त्यांचें दैवत असें ह्मणतात; त्यांनी आपल्या नवऱ्याची सेवा केली, ह्मणजे त्यांतच देव आहे असें स्पष्ट सांगतात!

हिंदु लोकांत स्त्रिया मूर्ख, अपवित्र, असत्य बोलणाऱ्या, निर्दय असें मानून त्यांज-पाशीं गुह्य गोष्ट बोलायास लोक भितात. याप्रमाणें त्यांची अवस्था; जर दैववशांत त्यांचे पति निधन पावले, तर त्या फारच दुःख पावतात. त्याला लग्नास व इतर शुभ कार्यास जाण्याची बंदी असती. त्यांहीं कोणाच्या दृष्टीस पडूं नये, व अलंकार घालूं नये, व उंची वस्त्रें नेसूं नयेत, पुनः लग्न नाहीं, दुसरे वेळीं तिनें जेवूं नये, सारांश, याप्रमाणें तिनें आचरण करून जन्मभर दुःखी असावें. पुरुषांस मात्र पाहिजे तें करण्याची मोकळीक असती. ते असें सांगतात कीं, स्त्रियांचा पुनर्विवाह करण्याविषयीं शास्त्राधार नाहीं, तेव्हां ही गोष्ट जर प्रवृत्तीस आणिली, तर मोठा अनर्थ होईल. बायका, नवरा मनास न आला, तर त्याला विष घालून मारितील आणि मनास येईल त्यासीं पुनः लग्न लावितील; ह्मणून जी पुरातनपासून रीति चालत आली, ती बरी आहे; त्यांत फेरफार करूं नये. आमचे ऋषि काय मूर्ख नव्हते कीं, त्यांनी अशा गोष्टीस अनुमोदन देऊन शास्त्राधार करून ठेविला नाहीं. जर आतां आह्मी नूतन चाल पाडूं लागलों तर भलत्याचें भलतेंच होईल. तर जें ऋषींहीं केलें आहे, तेंच ठीक आहे. त्यांतच आमचें कल्याण आहे.

स्त्री ही सर्व प्रपंचाचे सुखास कारण आहे. तीच जर अशिक्षित असली, तर त्या पुरुषास सुख कोठून प्राप्त होईल? आणि त्याचें घर कसें नांदेल? ती लोकामध्यें प्रतिष्ठा, आणि सुकीर्त्ति, कसी मिळवील? आपल्या मुलास सद्गुण कोठून शिकवील? सासुसासऱ्यासीं व सर्वांसीं यथायोग्य कसी वागेल? आपल्या नवऱ्याचें हित, व अनहीत कसें समजेल? नवऱ्यावर प्रीति ठेवून त्याची सेवा कसी करील? यास्तव स्त्रियांला चांगली शिक्षा असावी, नीतिग्रंथ वाचायास शिकवावे; तेणेंकरून त्या निरंतर अलंकाराचीच चिंता न वाहतां बहुधा ईश्वराकडे लक्ष लावितील.

स्त्रियांचें लग्न अगदीं लाहानपणीं करितात, तेणेंकरून त्यांची हानि होती, व लाहानपणापासून त्यांला घरखटल्याचें काम पडतें, तेणेंकरून त्यांला कांहीं सुख मिळत नाहीं, तर मुलींचें लग्न अगदीं लाहानपणीं करण्याच्या चाली, आणि पुनर्विवाह न करण्याच्या चालीविषयीं कांहीं विचार करावा, येणेंकरून स्त्रियांवर आमचे मोठे उपकार होतील. आह्मांसारिखी बुद्धि त्यांसहि असतां, त्यांसच वाचायाची, व लिहावयाची मनाई कां असावी ? तर ज्या रीतीनें पुरुषांस शिकवितात त्याप्रमाणेंच स्त्रियांसहि शिकण्यास मोकळीक असावी; तेणेंकरून घरामध्यें, मत्सर, कलह, अज्ञानत्व, आलस्य यांचा प्रवेश होणार नाहीं. त्या लोकामध्यें, प्रतिष्ठा व बहुमान मिळवितील, दुर्गुणाची प्रवृत्ति होणार नाहीं, आणि घरांतील सर्व मनुष्यें एकमेकांची प्रीति धरून वागतील.

## सण

इतर लोकांपेक्षां हिंदु लोकांमध्यें सण फारच आहेत, त्यांत होळी, आणि दिवाळी हे दोन मुख्य. होळीचा सण पंधरा दिवसपर्यंत चालतो, त्यांत पांच दिवस तर फारच भर असतो. प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत संध्याकाळचीं मुलें गळ्यांत ताशे बांधून दारोदार होळी पेटवायास लाकडें मागत फिरतात. रात्रीस होळी पेटवून होळीच्या आसमंतात बसून नाना प्रकारचे बिभत्स शब्द बोलतात. होळीच्या दिवसांत स्त्रियांस रस्त्यांतून फिरतां येत नाहीं. द्वादशीचे रात्रीस लहानथोर देवालयांत, किंवा दुसरे ठिकाणीं जाऊन आंगावर रंग घेऊन एकमेकांवर गुलाल टाकितात, कलावंतिणीचा नाच करितात. आणि नाना प्रकारचे अभद्र शब्द बोलतात; पूर्णिमेचे दिवशीं होळी पेटवून तिचें पूजन करून सर्व लोक बोंबा मारितात, प्रतिपदेचे दिवशीं तर फारच अनर्थ करितात; लोकांवर धूळ, चिखल, व शेण टाकितात.

या सणापासून किती हानि होती, याचा विचार करून पाहा बरें ! शिमग्याच्या सणांत पंध्रा दिवसपर्यंत सतत मुलें सर्व विद्याभ्यास सोडून या शिमग्याच्या मार्गे लागतात. लाहानथोर न पाहतां बोंबा मारून बिभत्स शब्द बोलतात. जवळ पैका नसला तरी नाचतमाशे करण्यासाठीं कर्ज काढितात. वडिलांचा मान ठेवीत नाहींत. पाहा ! एकाद्या मुलाची भीड एक वेळ चेपली तर तें मूल बिघडतें. जेथें सतत पंध्रा दिवस एकसारखें मूल मर्यादा सोडून वागूं लागलें, ह्मणजे मग तेथें वडिलांचा मान कोठून राहील ? कांहीं दिवस जर सदाचरणाची शिक्षा लागली असेल, तर ती सर्व या दिवसांत सुटली जाती. विद्या शिकण्याविषयीं श्रम केलेले व्यर्थ जातात. पाहा ! जेव्हां सण होऊन मुलें

परत शाळेंत येतात, तेव्हां तीं कसीं असतात कीं, जें तीं शिकलेलें तें विसरले असतात, आणि विद्येवरची भक्तीहि जाती. मुलांस एकदां वाईट छंद लागला, ह्मणजे तीं बिघडून जातात. त्याचप्रमाणें दिवाळींतहि जुगार खेळून पैका उधळितात. असे हे सण ज्यापासून आमची हानि होती, त्या सणाविषयीं कांहीं विचार केला पाहिजे. ज्या ईश्वरानें आह्मास उत्पन्न केलें, तो आह्मास असें ओंगळ आचरण करावयास सांगेल कीं काय ? कधींहि नाहीं.

## सारांश

लोकांच्या सुधारण्याविषयीं ज्या गोष्टी लिहिल्या आहेत, त्या लक्ष देऊन पक्षपात न धरितां आमच्या लोकांनीं वाचाव्या, एवढी माझी त्याजपासीं विनंती आहे. यांत कांहीं न्यूनाधिक असलें तर सुचवावें. इंग्लिश लोक सुधारण्यास आणि त्यांस एवढी प्रतिष्ठा मिळविण्यास, काय कारणें झालीं, यांचा विचार करावा. चांगले गुण कोणामध्येंहि असले तरी ते घ्यावयास कांहीं प्रत्यवाय नाहीं. तुह्मीच सांगतां कीं, ईश्वरापासीं कांहीं भेद नाहीं; तो पापपुण्याकडे मात्र पाहतो. तर जे सुमार्ग दुसऱ्यामध्यें आहेत, ते आपण घेतले ह्मणून तो आह्मावर कोप करील कीं काय ? नाहीं. जेव्हांपासून इंग्लिश स्त्रियांस विद्या शिकवूं लागले, आणि आपल्या धर्माचा विचार करूं लागले, तेव्हांपासून ते सुखी झाले. जसजशा त्यांच्या स्त्रिया विद्वान होऊं लागल्या, तसतशा त्यांच्या घरांतील खोट्या रिती जाऊं लागल्या. आणि वास्तविक पाहिलें असतां, आह्मामध्यें कित्येक वाईट रिती स्त्रियांच्या अज्ञानामुळें चालल्या आहेत. यास्तव प्रथम स्त्रियांचें अज्ञान दूर केल्यावांचून सुधारण्याचा प्रयत्न व्यर्थ. यास्तव याचा विचार सत्वर करणें हें आह्मास योग्य आहे. पाहा पाहा ! आमचें आयुष्य व्यर्थ जातें. काळाचें बोलावणें केव्हां येईल तें समजत नाहीं. जर या गोष्टीचा विचार लवकर न केला, तर आपला देश सर्व काळ अज्ञानांतच बुडलेला, असा राहील. हिंदुस्थानाची सुधारणूक करण्यास फार कठीण नाहीं. कारण, हा देश आफ्रिका खंडासारिखा, अथवा दुसऱ्या अशिक्षित, व रानटी देशांसारिखा नाहीं. या देशचे लोक पूर्वीं विद्वान् होते, आणि आतांहि त्यांत विद्वान् होत आहेत. ह्या सर्व गोष्टी एकदांच सिद्धीस नेणें कठीण आहे, आणि असी इच्छाहि कोणी धरूं नये. परंतु जसजशा त्या सुलभ पडतील, तसतशा सुधारीत जाव्या. देश सुधारणें ह्मणजे एका दोघांचें काम नव्हे, तर सर्वत्रांनीं अभिमान सोडून हें काम करावयास यत्न करावा, ह्मणजे ईश्वर कृपा करील.

## सुचना

हा निबंध एका हिंदु गृहस्थानें रचिला आहे. त्यांत तो स्वदेशीय हिंदु लोकांस मोठ्या हिताचे व अगत्याचे गोष्टीविषयीं सांगतो. त्यांत जो बोध केला आहे व जे विचार केले आहेत, ते बहुतेक सयुक्तिक व वास्तविक आहेत. आणि ज्या हिंदूस आपले किंवा आपले लोकांचे कुटुंबाचें सुख वृद्धिंगत करण्याची इच्छा असेल, त्याने तो लक्ष लावून वाचून पाहावा. हिंदु लोकांच्या कुटुंबांत मोठ्या दुःखप्रद अशा चाली व रिती पुष्कळ आहेत. त्या अवश्य सुधारिल्या पाहिजेत. हीं दुःखें जाण्याकरितां हिंदु लोक प्रयत्न कां करीत नाहींत ? पूर्वीं जे लोक यापेक्षां सुधारलेले नव्हते, ते आतां यांजपेक्षां श्रेष्ठ झाले आहेत. भरतखंडापेक्षां इंग्लंड देश एक वेळ नीचावस्थेंत होता, परंतु, आतां तेथील लोक हिंदूपेक्षां अधिक धार्मिक, मोठे पराक्रमी, आणि सुखी झाले आहेत, आणि एथील लोक अज्ञान, नीच, व विपत्ति भोगणारे, असे राहिले.

या लोकांस खरा धर्म व सुशिक्षा पाहिजे तर त्यांस खरा धर्म कोठें मिळेल ? वेद, शास्त्र व पुराणें यांत मिळणार नाहीं परंतु खिस्ती शास्त्रांच्या जुन्या व नव्या करारांत मिळेल. या पुस्तकांत कुटुंबांविषयीं काय लिहिलें आहे, तें पाहा आणि त्याच्या खरेपणाचा विचार करा. कलस्साइकरांस पाऊलसाचें पत्र अध्याय ३ ओवी १८ या प्रकरणीं असें लिहिलें आहे, अहो स्त्रियानो, तुम्ही जसें प्रभूपाशीं उचित आहे, तसें आपल्या नवऱ्यांस मान्य असा. अहो नवरे, तुह्मी आपल्या बायकांवर प्रीति करा, आणि त्यांशीं कडू होऊं नका. अहो लेंकरानों, तुह्मी अवघ्यांविषयीं आपल्या आईबापांस माना; कां तर हें प्रभुला फार आवडतें. अहो बापानो, तुह्मी आपल्या लेंकरांस चिडवूं नका, यासाठीं कीं, त्यानी उदास न व्हावें. एफेससकारांस पाऊलसाचें पत्र अध्याय ६ ओवी १ यांत याविषयीं असा उपदेश केला आहे. अहो लेकरानो, तुह्मी प्रभुमुळें आपल्या आईबापांस माना, कारण कीं, हें नीट आहे. हीच वचनयुक्त पहिली आज्ञा आहे कीं, तूं आपला बाप व आई यांची मर्यादा राख. तुझें बरें व्हावें आणि त्वां पृथ्वीवर दीर्घायु व्हावें ह्मणून, आणि बापानो, तुह्मी आपल्या लेंकरास चिडवूं नका, परंतु प्रभुसंबंधी शिक्षा व बोध ह्यांकडून त्यांचा प्रतिपाळ करा. अहो चाकरानो, तुह्मी आपल्या अंतःकरणाच्या साळसुदपणाने जसें खिस्ताला तसे आपल्या शरीरांच्या धन्याला भयाने व कांपण्याने माना, मनुष्यांस संतोषविणाऱ्यासारिखें तोंडदेखल्या चाकरीने नका, परंतु खीस्ताचे चाकर असे मनापासून देवाची इच्छा पाळितां; माणसांची नव्हे, परंतु प्रभूची चाकरी सुबुद्धीने करा, आणि हें जाणा कीं, प्रत्येक माणूस जें कांहीं बरें करितो, त्याप्रमाणेंच, तो प्रभूपासून पावेल, तो चाकर असो किंवा स्वतंत्र असो. आणि अहो धनी,

तुह्मी त्याचप्रकारें त्यापाशीं करा, धमकावणें सोडा, कारण तुह्मी जाणतां कीं, स्वतः तुमचाहि धनी आकाशामध्यें आहे, आणि त्यासीं पक्षपात नाहीं.

वर लिहिलेलीं ख्रिस्ती शास्त्रांतील वाक्यें सर्व हिंदु लोकांच्या मनांत ज्या दिवसीं वागूं लागतील, तो हिंदुस्थानांत सुदिन होईल.

ख्रिस्ती देशामध्यें सुरळितपणे चाललेल्या कुटुंबास पाहण्यासारिखें दुसरें कांहीं संतोषकारक नाहीं. तेथें मुलांस परमेश्वराचें भजन करायास शिकवितात; तसेंच त्यांस ईश्वराची, आपल्या आईबापांची, परस्परांची प्रीति करायास शिकवितात; आणि लबाडी, चोरी, व शिव्या देणें इत्यादि कृत्यांचा द्वेष करायास शिकवितात. त्यांस ईश्वराचें शास्त्र वाचायास आणि त्याचा अनुग्रह व आशीर्वाद आपणावर असावा, ह्मणून त्याची प्रार्थना करायास शिकवितात. अशा प्रकारचे कुटुंबांत कज्जाभांडण राहत नाहीं, जिकडे तिकडे प्रीति, शांती व एकोपा असतो. ते सर्व एकमेकांस साह्य करितात. आणि तेणेंकरून त्यांस ईश्वराची कृपा प्राप्त होती. हे हिंदु लोकहो ! हें सत्यशास्त्र तुह्मी घ्या आणि अशा प्रकारचें कुटुंब तुह्मामध्यें होण्याचा प्रयत्न करा.

समाप्त

——xx——

# THE OBSERVANCE OF TRUTH

WITH

SPECIAL REFERENCE TO THE ADMINISTRATION OF JUSTICE AND THE ADVANCEMENT OF THE BEST INTERESTS OF SOCIETY.

A WILLOUGHBY PRIZE ESSAY.



BY GOVIND NÁRÁYAN,

TEACHER IN THE FREE GENERAL ASSEMBLY'S INSTITUTION.

SECOND EDITION.



BOMBAY:

PRINTED AT GUNPUT KRISHNAJI'S PRESS

1856.

# सत्यनिरूपण

न्यायप्रकरणांत व लोकांच्या कल्याणवृद्धींत
सत्यतेचें रक्षण करण्याने किती लाभ होतात
याविषयीं

गोविंद नारायण यांनीं केलें.



दुसरी आवृत्ति.



मुंबईमध्यें
गणपत कृष्णाजी यांचे छापखान्यांत छापिलें.
सन १८५६.

७

## अनुक्रमणिका



*

# प्रस्तावना

सांप्रत हें भरतखंड इंग्रज लोकांच्या स्वाधीन झालें आहे; आणि उत्तरोत्तर त्यांची सत्ता सर्व राज्यांवर होत चालली. यास्तव बहुतकरून सार्वभौम पदवी त्यांसच; असें ह्मटलें असतां साजेल. आतां, ज्या लोकांची आपण रयत झालों, त्यांजकडून अधिकार मिळवून घेण्यास व त्यांची प्रीति संपादन करून घेण्यास आपल्या अंगीं कोणकोणतीं साधनें असावीं, व आपलें आचरण कसें असावें, याचा कांहीं तरी नियम असला पाहिजे.

या भरतखंडाच्या राज्याचा उपभोग मराठे मुसलमान आदिकरून बहुतेकांनीं घेतला; परंतु कोणत्याच सरकारानें लोकांच्या सुधारणुककीडे व विद्यावृद्धीकडे व रयतेच्या कल्याणाकडे तादृश लक्ष दिल्हेच नाहीं. आतां ईश्वरकृपेनें हें राज्य इंग्रजसरकाराच्या हस्तगत झाल्यापासून सर्वत्र विद्येचा प्रसर होऊन व्यापाराची वृद्धि झाली; आणि लोकांमध्यें स्वतंत्रता, व सुखाचीं साधनें वाढून अज्ञानाचाहि लोप होत चालला आहे.

रयतेवर सरकाराची प्रीति बसावयास मुख्य दोन साधनें आहेत. सत्यता आणि विद्वत्ता; हे दोन गुण ज्याच्या अंगीं आहेत, तो कोठेंहि गेला तरीं पार पडेल. यास्तव सद्गुणांची वृद्धि होण्यास नीति व विद्येचा उद्देश, यांवर ग्रंथ रचून ते सर्वत्र प्रवृत्तींत आणण्यासाठीं सर्वांचे परिश्रम असले पाहिजेत.

दुर्गुण व दुर्व्यसने यांच्या स्वाधीन झाल्यामुळें असत्याची वृद्धि होती; तेणेंकरून परस्परांवरची प्रीति व विश्वास नाहींसा होऊन राज्यामध्यें नाना प्रकारचे दंगे, बंडें, हीं उत्पन्न होतात. मग अर्थातच सरकारचा रयतेवरील विश्वास उडून तें मोठालीं हुद्यांचीं कामें देण्यास दिक्कत करितें.

हल्लीं इंग्रेज सरकार एतद्देशीय लोकांस विश्वासु हुद्याचीं कामें देण्यास कांक्षा धरितें; याचें कारण बहुतकरून हेंच असावें कीं, ह्या लोकांच्या प्रमाणिकपणाविषयीं त्याची अजून पुरती खात्री झाली नाहीं. यास्तव जसी सर्वत्र विद्येची वृद्धि होऊं लागली आहे, तसीच सत्याची आणि प्रमाणिकपणाची वृद्धि होऊं लागली, ह्मणजे सरकाराची खात्री होईल; मग तीं कामें आपणांस श्रम न करितां सहजच प्राप्त होतील. सत्य हें केवळ प्रापंचिक सुख प्राप्त होण्यासच उपयोगी आहे, असें केवळ नाहीं; तर पारमार्थिक सुखाचें साधन आहे.

हा ग्रंथ रचण्याचा आशय इतकाच, कीं चहूंकडे असत्याचा प्रसर झाला आहे, तो मोडून लोकांची मनें सत्याकडे लागावीं. सर्व लोक असत्य बोलणारे आहेत, असें

केवळ आमचें ह्मणणें नाहीं; परंतु बहुतांचीं मनें असत्याकडे वळत चाललीं, तीं सत्य मार्गांत आणायाकरितां हे प्रयत्न आहेत.

सत्य, ह्या विषयावर यथामति ग्रंथ रचून विद्वज्जनाच्या सेवेंत सादर करावा, असी पुष्कळ दिवस इच्छा होती; इतक्यांत लोकहितेच्छू नेक नामदार विलबीसाहेब मुंबईतील माजी कौन्सलेर यांजकडून या विषयावर कोणी चांगला ग्रंथ रचिला असतां त्यास इनाम मिळेल; असी जाहिरात सन १८५१ च्या अकटोबर महिन्याच्या ओरिएन्टल खिस्तीअन स्पेकटेटर पत्रावरून वाचण्यांत आली. त्यावरून मोठ्या उमेदीनें हा ग्रंथ रचिला. यांत कोठें व्यंगोक्ति अढळल्यास विद्वज्जनानीं क्षमा करून हा प्रयत्न मान्य करून घ्यावा.

*

# मनुष्यमात्राच्या सुखास सत्याच्या अवश्यकतेचा विचार

ईश्वराने हें जग उत्पन्न करून त्यांत मनुष्यांस इतर सर्व प्राण्यांत श्रेष्ठ केलें आहे. त्यास ज्ञान, बुद्धि, विवेकसंपन्न करून त्याच्या अंगीं शांति, क्षमा, दया, इत्यादि गुणहि ठेविले आहेत; आणि तो आपल्या ज्ञानादिकांचा कसकसा उपयोग करितो, हें कौतुक पाहावें, ह्मणून त्याला अवश्यक नेम लावून दिल्हे. ते असे कीं, सर्वकाळ सत्यच बोलावें; कोणाचा द्वेष करूं नये; चोरी करूं नये; आईबापांची आज्ञा मोडूं नये, इत्यादि. सर्व काळ मनुष्याने आपणासच शरण यावें, ह्मणून ईश्वराने असी व्यवस्था करून ठेविली आहे. आणि जे गुण त्याजमध्यें ठेविले व जे नेम त्याला लावून दिल्हे, ते चालविण्यास सामर्थ्यहि दिल्हें आहे. तसेंच जें आपण करितों, तें योग्य किंवा अयोग्य हें समजावें, ह्मणून अंतःकरणांत सुप्रेरकशक्ति ठेविली, कीं जेणेंकरून मनुष्य आपल्या पापाचा आपणच अधिकारी होऊन त्याचा बाध ईश्वराकडे लागू करीत नाहीं.

मनुष्यास जे दुसरे गुण व नेम लावून दिल्हे, त्यांत सत्य ह्मणून जो अप्रतिम नेम तो सर्वांस प्रिय असून कल्याणकारक व त्यांच्या सर्व सुखास उपयोगी आहे. त्यावांचून ह्या सृष्टींतील कोणताहि व्यवहार चालणार नाहीं. सत्याच्या साह्यावांचून प्रपंचसंबंधीं एकहि कर्म सुरळीत व्हावयाचें नाहीं जर आज ह्या पृथ्वीवरून सत्य अगदीं नाहींसें झालें, तर मोठा अनर्थ होईल. त्यामुळें कोणी कोणावर विश्वास ठेवणार नाहीं. आईबाप व मुलें यांचा परस्परांवरील भरंवसा नाहींसा होईल; भाऊबहिणींचा एकमेकांवर विश्वास राहणार नाहीं; तसाच बायकोस नवऱ्याच्या बोलण्याचा खरेपणा वाटणार नाहीं; व धनी, चाकर यांचाहि परस्परांवरील प्रमाणिकपणा राहणार नाहीं. याप्रमाणें सर्व प्रकारचा अव्यवस्थितपणा माजला जाईल. यास्तव परम दयाळू भगवंताने आह्मास सत्य हा मोठा सुखदायक नेम लावून दिल्हा; त्याचा जर आह्मी धिःकार केला, तर मग आमचा नाश होईल, यांत अगदीं संशय नाहीं.

हा कल्याणकारक सत्यरूप सद्गुण आमच्या अंतःकरणांत आहे, त्याचें सेवन करण्याकरितां द्रव्य किंवा मोठे श्रम केले पाहिजेत, असें नाहीं. सत्य बोलणें फार सुलभ खरें, परंतु त्याविषयीं नेम धरून चालणें हेंच दुर्घट आहे. सत्य ह्मणजे जें कांहीं आपण पाहतों, व ऐकतों, त्यांत कांहीं फेरफार व कृत्रिम न करितां जसें असेल, तसेंच सांगावें. आणि दुसऱ्यास कोणत्याहि गोष्टीविषयीं वचन दिल्हें असतां तें पालन करून कोणाचाच विश्वासघात करूं नये. त्यामुळें आपलें अनहित होऊन जरीं नाश होत असला, तरी सत्याचा कधींहि त्याग करूं नये. "तूं आपला जीव रक्षण करण्यासाठीं-देखील असत्याचा स्वीकार करूं नको," असें ईश्वरी वचन आहे. आपला उत्पन्नकर्त्ता

जो भगवान त्याला ओळखून त्याजपासीं जाण्यास सत्य ही एक पहिली पायरी आहे. जे लोक सत्याकडे दुर्लक्ष करून वागतात, त्यांजपासून कोणतेंहि सत्कर्म घडलें, तरीं तें ईश्वरापासीं रुजू होतच नाहीं. "सत्यं ब्रवीमि परलोकहितार्थम्" —परलोक प्राप्त व्हावा, ह्मणून मी सत्य बोलतों, असें एक साधू ह्मणतो.

सत्य आहे, ह्मणून सर्व कामें नीट चालतात; नाहीं तर कोणताहि व्यवहार सरळ चालणार नाहीं. मोठीं कामें तर असोत; परंतु आपल्या घरांतील हलकीं कामेंदेखील सत्यावांचून बंद पडतील. पाहा! एखाद्या वेळेस आपण कुटुंबांतील मनुष्यांवर व इतर लोकांवर विश्वास बसल्यामुळें मोठमोठालीं नाजूक कामें सोंपितों; याचें कारण हेंच, कीं आपला त्यांच्या प्रमाणिकपणावर विश्वास बसलेला असतो. आतां असत्यवादी दुसऱ्यास ठकवितात, याचें कारण असें कीं, त्यांच्या बोलण्यावर विश्वास ठेविल्यामुळें सत्यवादी फसले जातात ते जें बोलतात, तें सत्य आहे, असी समजूत पाडण्यास खोट्याचें खरें करून वेषधारी लांडग्याप्रमाणें वागत असतात. खोटें बोलणें हें महापातक आहे; याविषयीं असें वचन आहे; कीं "नानृतात्पातकं परं" पृथ्वीवर कांहीं तरी सत्य आहे. ह्मणूनच मोठमोठाल्या पेढ्या व लाखों रुपयांचा व्यापार चालला आहे. कारण सत्याच्या योगानें लोकांचा एकमेकांवर विश्वास बसतो. जर एखादा व्यापारी लबाड, असें ठरलें, तर त्याचा व्यापार अगदीं चालत नाहीं. कित्येक लोकांचा असा समज आहे, कीं द्रव्यसंपादन करण्यास व व्यापार चालविण्यास असत्य बोलावें लागतें, तर ही या लोकांची मोठी चूक आहे. असत्याचा आश्रय केला असतां एखाद्यास तूर्त लाभ होतो खरा; परंतु परिणामीं तें उघडकीस आलें, ह्मणजे त्याचा कोणी विश्वास धरीत नाहींत. मग अर्थातच त्याचा व्यापार लवकर बुडून जातो. जर ह्या जगांत सर्व लोक प्रमाणिकपणानें वागतील, तर पृथ्वीवर खून, चोरी, चहाडी, ऋण इत्यादि कुकर्मैं फार थोडीं होतील. असें झालें असतां लोकांचीं मनेंहि बहुतकरून परमार्थाकडे लागतील. तर असा जो हा अपूर्व गुण, त्याचें अवलंबन करून सुख प्राप्त करून घेण्याचें सोडून विनाकारण दुःखांत कां पडावें बरें?

एका गृहस्थानें आपल्या मुलीचा विश्वास आपणावर बसून तिला सत्याचा भेद समजत नसे, तो समजवावा, ह्मणून असी युक्ति केली, कीं त्यानें एका दिवशीं बाहेर जाते वेळेस आपल्या मुलीस सांगितलें कीं, मी बाहेर जातों. आतां ह्या घड्याळांत एक तास झाला आहे, मी तीन तासांत परत येईन; परंतु मुलीचा त्या सांगण्यावर विश्वास बसेना. मग त्यानें तिला फिरून सांगितलें, कीं मी लबाडी बोलत नाहीं; तर तूं मजवर विश्वास ठेवून मी सांगितलेल्या वेळांत परत येतों, किंवा नाहीं हें पाहा. असें सांगून तो बाहेर गेला; आणि जरीं त्याला सांगितलेल्या वेळेपेक्षां अर्ध घटिका अधिक वेळेचें काम होतें, तरीं उशीर न करितां नेमलेल्या वेळीं घरीं येऊन मुलीस बोलला, कीं पहा!

सांगितल्याप्रमाणें मी आलों कीं नाहीं? असी त्याने बहुत वेळां तिला सत्याचीं उदाहरणें दाखविलीं. मग त्या मुलीची खात्री झाली, कीं आपला बाप असत्य बोलत नाहीं, याप्रमाणें त्या गृहस्थाने सत्योत्पादक गोष्टींकडून त्या मुलीचा विश्वास आपल्यावर बसवून तिला लहानसहान कारणांवरून देखील ठकविलें नाहीं. यावरून ती मुलगी सत्याचा आणि असत्याचा भेद समजूं लागून मोठी सद्गुणी झाली. यास्तव लाहान मुलांस आपण कधींहि ठकवूं नये.

हिरोडोटस् नामें एका पुरातन इतिहासकर्त्यांने इराण लोकांचा वृत्तांत लिहिला आहे; त्यांत तो असें ह्मणतो, कीं इराणी लोक आपल्या मुलांस ह्या तीन गोष्टी शिकवा-यास फार श्रम घेत असत. एक, घोड्यावर बसणें; दुसरें, तीर मारणें; तिसरें, सत्य बोलणें. यावरून स्पष्ट दिसतें कीं, ते सत्यावर फारच लक्ष देत, व सत्य हा मोठा सद्गुण आहे, असें मानीत असत.

सत्यावर लोकांची भक्ति असती खरी; परंतु प्रापंचिक हिताकडे लक्ष गेलें, ह्मणजे ते केवळ अंध होऊन सत्याकडे दुर्लक्ष करितात. सत्याच्या गोष्टी ऐकून कित्येक फार संतोष पावतात; आणि सत्यवक्ता पाहून त्याची स्तुतीहि करितात; परंतु त्याप्रमाणें वर्तणूक करण्यास धजत नाहींत, कारण त्यांच्या अंगीं पारमार्थिक धैर्य कमी असतें.

पाहा! एखाद्या लाहान मुलास, तूं लबाड आहेस; असें सहज ह्मटलें, तर तें त्यास वाईट वाटून मोठी शिक्षा केल्यासारिखें रडत असतें; परंतु मोठेपणी दुराचरणांत पडल्यामुळें त्यास सत्यासत्याचा भेद समजत नाहींसा होतो.

कोणी अहंकारानें असी प्रतिज्ञा करूं नये, कीं मी सर्वकाळ सत्यानेंच वागेन. कारण ह्या प्रपंचांत आपला एकमेकांसीं संबंध जडल्यामुळें एखाद्या वेळेस आपल्या किंवा आप्तांच्या ऐहिक कल्याणाकडे लक्ष गेल्यानें तो नेम मोडला जातो. याप्रमाणें सत्याच्या नेमाचें संरक्षण करण्यांत अनेक विघ्नें येतात. तर अशा प्रसंगीं आपल्याकडून सत्याचें रक्षण व्हावें, ह्मणून सर्व काळ ईश्वरासच शरण जावें, ह्मणजे तो धैर्य देईल तेणें-करून कोणत्याच गोष्टीविषयीं अडचण पडणार नाहीं.

---

## सत्याविषयीं प्रमाणें

नह्यसत्यात्परोऽधर्म इतिहोवाच भूरियम् ॥
सर्वं सोढुमलंमन्ये ऋतेऽलीकपरं नरम् ॥

अर्थ—पृथ्वी असें ह्मणती, कीं असत्यापेक्षां दुसरा मोठा अधर्म नाहीं. मी सर्व सहन करीन; परंतु असत्य भाषण करणाऱ्याचा भार मला साहत नाहीं.

दुराचरणांत पडतो, ह्मणून ईश्वरानें असा नियम केला आहे कीं, कोणी आळशी होऊं नये.

दी०—व्यापार अनीतीवांचून होत नाहीं, असें कित्येक लोक सांगतात, तर व्यापार करणें हें वाईट आहे असें मला वाटतें. कारण, पाह, बाजारांत भाट्ये, मारवाडी, वाणी, किती तऱ्हेच्या लबाड्या करितात, आणि दुसऱ्यापासून पैका ठकवून घेतात. आणि ते तेणेंकरून मोठे मातबर झाले आहेत.

रा०—दीना, ऐक. कोणताच धंदा मुळचा वाईट नाहीं. व्यापारांत व सर्व प्रकारच्या व्यवहारांत नीतीनेंच वागलें पाहिजे. नीतीवांचून गत्यंतर नाहीं. मोठमोठाल्या पेढ्या व हुंड्या चिठ्या यांचा व्यापार नीतीवांचून कांहींच चालणार नाहीं. पाह, मुंबईंत व इतर देशांत कित्येक नामांकित व्यापाऱ्यांच्या पेढ्या व दुकानें नीति आहे म्हणूनच चाललीं आहेत. नाहीं तर व्यापार अगदींच बुडाला असता. मनुष्य आपल्या कुवासनांनीं कोणत्याहि धंद्यास बट्टा आणितो. अनीतीनें वागणारास लोकांमध्यें मान नसून परलोकींहि त्याचे हाल होतात. एकादा व्यापारी लबाड असें समजल्यावर फिरून त्याच्या दुकानावर कोणी जात नाहीं. मग अर्थातच त्याचा व्यापार बुडतो. फ्रेंच लोक अमेरिकेंत जाऊन व्यापार करून पुष्कळ द्रव्य कमावीत असत, परंतु एक वेळ एका व्यापाऱ्यानें तेथील कित्येक भोळ्या व्यापाऱ्यांस असें सांगितलें कीं, बंदुकेच्या दारूचें बीं आपणापाशीं आहे, तें जर तुह्मी खरीद करून घ्याल, तर तुम्हास फार नफा होईल. ह्या त्याच्या सांगण्यावरून त्या निष्कृत्रिम लोकांनीं दारवेच्या पेट्या खरीद केल्या, आणि पावसाळ्यांत जमीन चांगली नांगरून तींत तें दारुरूप बीं पेरिलें, आणि पिकाची आस्था धरून प्रतिदिवशीं रोप कसें येतें, तें पाहायास मोठ्या उत्कंठेनें शेतांत जात असत; परंतु जमिनींत पेरितांच ती दारू नासून गेली, आणि त्यांचा सर्व पैका मातींत गेला. तेणेंकरून ते गरीब लोक अगदीं बुडाले. तेव्हांपासून त्या व्यापाऱ्यांनीं असा निश्चय केला कीं, त्यांबरोबर फिरून कधीं व्यापार करूं नये. तेणेंकरून त्या फ्रेंच व्यापाऱ्यांची फार नासाडी झाली. अनीतीनें संपादन केलेलें द्रव्य कसें लयास जातें याविषयीं.

## श्लोक

अन्यायोपार्जितं द्रव्यं दशवर्षाणि तिष्ठति ।
प्राप्ते एकादशे वर्षे समूलं च विनश्यति ॥ १ ॥

आतां व्यापारांत नीतीनें वागलें असतां किती लाभ होतात ते पाहा. काशींत एक तूप विकणारा वाणी आहे ह्मणून सांगतात, तो एवढा प्रामाणिक आहे कीं, लोक तुपाचीं भांडीं व पैसे चाकरापाशीं देऊन त्याच्या दुकानावर पाठवून देतात, मग तो

जसा दर असेल, त्याचप्रमाणें बराबर वजन करून त्यांस उत्तम प्रतीचें तूप पाठवून देतो. असें सांगतात कीं, याच्या दुकानावर नेहमी शेंपन्नास तुपाची भांडीं पडलेलींच असतात. जर याचें दुकान बंद झालें तर त्याचें गिराईक, तुपावांचून राहतें, परंतु दुसऱ्याच्या दुकानावर जात नाहीं. याप्रमाणें गिराईक आपणापाशीं आणण्यास व्यापाऱ्यास नीतीची आवश्यकता आहे.

इंग्लांड देशांत एक नीतिमान् व्यापारी असे. तो सदसद्विवेकी असून लक्षावधि रुपये धर्मकृत्यास लावी. कधीं कधीं तो असें अलौकिक कृत्य करीत असे कीं, जर त्याणें एखाद्या व्यापाऱ्याकडून स्वस्त दरानें माल घेतलेला असला आणि त्याचा भाव फारच वाढून आपणास पुष्कळ नफा झाला, तर त्यांतून कांहीं द्रव्य ज्या धन्याकडून माल घेतलेला असेल त्यास देत असे. पाहा, हा केवढा उदारपणा आणि प्रमाणिकपणा! असें करीत असे, ह्मणून त्यास पैका कमी मिळाला होता असें नाहीं. उलटा त्याचा व्यापार वाढून त्यास अतोनात पैका मिळाला. त्याणें लक्षावधि रुपये धर्मकृत्यास लावले व अद्यापहि याचा धर्मादाय चालला आहे. यास्तव सर्व व्यवहारांत मनुष्यास नीतीसच अवलंबून असले पाहिजे.

दी०—जे अनीतीनें चालतात त्यांस मेल्यानंतर देव शासन करितो, मला वाटतें कीं, जिवंत असतां त्यास कांहीं शासन होत नाहीं.

रा०—जे लोक अनीतीनें चालणारे आहेत, त्यांस देव जिवंतपणींच बहुधा थोडें बहुत शासन करितो; आणि मेल्यानंतर त्यांस जसें असावें तसें पूर्ण शासन होतें. चोर, खुनी, जुगारी, लुच्चे हे सांपडले असतां त्यांस सरकारांतून कांहीं तरी शासन होतें. जे दुर्गुणी, व्यसनी, अघाशी, मद्यपी, व कैफी असतात, त्यांस अनेक तऱ्हेचे रोग होऊन ते दुःख भोगून अल्पायुषि होऊन मरतात. हेंच त्यांला या लोकीं शासन. एकाद्या मुलानें तारुण्य आळसांत घालविलें, आणि उधळेपणानें वागला, तर अर्थातच पुढें त्याचे खाण्यापिण्याचे सर्व प्रकारें हाल होतात. त्या दिवशीं एक मनुष्य आमचे घरीं येऊन बांकेवर बसला होता, आणि काकाजवळ एक दिडकी मागत होता त्याची तुला आठवण आहे? तो मनुष्य एका सधन गृहस्थाचा मोठा लाडका मुलगा होता, ह्मणून बापानें त्याचें लहानपणींच लग्न केलें होतें. परंतु ज्या वेळीं बाप त्याला शाळेंत पाठवी, त्या वेळीं त्याणें खेळायास जावें. ख्यालीखुशाली व अनेक तऱ्हेचे कैफ करावे. शेवटीं तो चोऱ्यादेखील करूं लागला. जेव्हां बापास त्यापासून फारच उपद्रव होऊं लागला, तेव्हां त्यास घरांतून हांकून लाविला. आतां त्यास दारांतदेखील कोणी उभा करीत नाहींत. त्याच्या अंगावर फाटकी चिंधीदेखील सांपडायाची मुष्कील पडली आहे. याप्रमाणें दुराचरणी लोकांचें एथें हाल होतात. यापलीकडे दुसरें शासन कोणते राहिलें आहे! कित्येक

व्यसनी लोकांचे पाय धरतात, नाकें जातात, घाटीस छिद्रें पडतात, अशी त्यांस शिक्षा होत्ये. कित्येकांस शरीरदुःख न झालें तरी अंतःकरणाचें दुःख होत असतें.

**दी०**—मला असें वाटतें कीं, बहुतकरून अनीति रागापासून होती. यास्तव आपण रागास मारून टाकून नाहींसा करावा, म्हणजे आपलें अंतःकरण निर्मळ होईल.

**रा०**—वाहवा! बरें सांगतोस. मनुष्यानें शत्रूपासून आणि पापापासून आपलें रक्षण करावें ह्मणून ईश्वरानें त्यास राग आणि भय हीं दोन मुख्य आयुधें दिलीं आहेत. तींच जर त्याजकडून नष्ट झालीं तर मग आपलें रक्षण करायास त्याजकडे काय हत्यार राहिलें? जसें सत्य बोलणें अवश्य आहे, तसेंच जर कोणी दुराचरण केलें तर त्याजवर रागें भरणें, त्यास धमकाविणें, व त्याच्या दुराचरणाचा तिरस्कार करून त्यास सन्मार्गांत आणणें, आवश्यक आहे. पापाची भीति बाळगून त्यापासून दूर राहणें, अनाचारी लोकांस ईश्वर शासन करितो, हें लक्षांत आणून त्याच्या दंडाची दहशत बाळगून आपलीं कर्में निर्मळ ठेवणें, हें मनुष्यमात्राचें कर्तव्यकर्म आहे, तें या दोन तत्त्वें करून साध्य होतें. तूंच पाहा, राग आणि भय हीं मनुष्यास किती उपयोगी आहेत. आपल्या कुटुंबांतील मनुष्यें अनीतीनें वागत असलीं आणि जर आपण त्यांजकडे लक्ष न देतां त्यांच्या दुराचरणाकडे पाहून थंडेथंड बसलों आणि पापाची भीति त्यांस न दाखविली तर कुटुंबांत किती अनाचार होईल? मुलें चोरी, चहाडी, कैफ, असे अनाचार करूं लागतील आणि घरांत सर्वप्रकारें अव्यवस्था होऊन पृथ्वीवर अनाचार माजेल. सारांश, राग आणि भय हीं मनुष्याचीं हत्यारें आहेत. त्यांचा त्याणें सांभाळ करून कारणपरत्वें उपयोग केला पाहिजे. जसी तरवार शिकिल करून म्यान्यांत घालून ठेवितात, त्याप्रमाणें ह्या दोन्ही तत्वांचें रक्षण केलें पाहिजे. केवळ रागाच्याच स्वाधीन होऊं नये. त्यास तरवारीप्रमाणें आपल्या स्वाधीन ठेवून गरज लागेल, तेव्हां त्याजकडून काम करून घ्यावें. अल्पस्वल्प कारणांवरून ज्यावर त्यावर विनाकारण रागें भरणें हें महा दोषी आहे. तसेंच ज्यास अनाचार पाहून तिरस्कार येत नाहीं, तोहि दोषी आहे, अशा पुरुषांची प्रतिमा केवळ दगडासारिखी असें समजावें.

---

## संभाषण ३.

**दीना**—दादा, अनीतीचे भयंकर परिणाम आणि नीतीचीं कल्याणकारक फळें पाहून मला तर असें वाटतें कीं, सर्व काळ नीतीनेंच वागावें, जेणेंकरून मला लोकांमध्यें मान मिळून मजवर देवाची कृपा होईल. बरें; हल्लीं आपल्या लोकांत नीतीची वृद्धि होऊन अनीतीचा नाश व्हावा ह्मणून कोणी प्रयत्न चालविले आहेत काय?

**रामचंद्र**—अनीतीचा नाश व्हावा, म्हणून अलीकडे बहुतेक सुज्ञ व परोपकारी विद्वान लोकांनीं प्रयत्न चालविले आहेत. सरकारदेखील या कामाचा कळवळा बाळगितें.

**दी०**—अनीतीचा नाश होऊन नीतीचा प्रसर होण्यास त्यांणीं कोणकोणते प्रयत्न चालविले आहेत, ते मला सांग.

**रा०**—सांगतों ऐक. सरकारनें व दुसऱ्या लोकांनीं शाळा घातल्या आहेत. आणखी मुलींसहि विद्या शिकविण्याचा क्रम चालविला आहे. आमच्या कित्येक विद्वान लोकांनीं पुस्तकालयें स्थापिलीं आहेत. कित्येक सभा स्थापिल्या आहेत. त्यांचीं नांवें उपयुक्तज्ञानप्रसारकसभा, ज्ञानवर्धकसभा, सद्गुणवर्धक सभा, परोपकारप्रसारकसभा, इत्यादि. ह्या ठिकाणीं आठवड्यांत एकदोन वेळ व पंधरवड्यांत एक वेळ जसजसे त्यांचे नियम असतील, त्यांप्रमाणें विद्वान् लोक जमून एकेक चांगल्या विषयावर संभाषण करितो, व निबंध लिहून ते तेथें वाचितात. याप्रमाणें लोकांची मनें सुमार्गाकडे लावायास अनेक उपाय करितात. सरकार व परोपकारी श्रीमंत लोक आपापल्या पदरचा पैका खर्चून नूतन नीतिपर निबंध करवून छापवून प्रसिद्ध करितात.

**दी०**—वाः हें त्यांचें काम मोठें स्तुतीस योग्य आहे, परंतु शाळा ह्या केवळ विद्या शिकविण्याकरितां घातलेल्या आहेत, त्यांत नीतीचा संबंध काय आहे ?

**रा०**—विद्या शिकविण्याचा मुख्य उद्देश ह्याच कीं, लोकांस ज्ञान प्राप्त होऊन ते सद्गुणी व सुशील व्हावे. विद्या शिकून जर मनुष्य सद्गुणी झाला नाहीं, तर विद्या कांहीं कामाची नाहीं. मोठा विद्वान् असून तो मद्यपी, दुराचरणी, दुर्व्यसनी, असला, तर त्याच्या विद्येस काय आग लावावी ? तुला ठाऊकच आहे कीं, विद्या शिकवायास प्रारंभ करतेवेळीं प्रथम पंतोजीचे सद्गुण पाहून त्याचे स्वाधीन मुलगा करितात. मग जीं चांगलीं पुस्तकें असतील, तींच मुलांस वाचायास देतात मुलांस शिकवायाचीं पुस्तकें तपासायासाठीं सरकारानें वेगळेच पंच नेमले आहेत. ते जीं पुस्तकें पसंत करितील, तींच पुस्तकें सरकारी शाळांत शिकवितात. मोठमोठाल्या हुद्याच्या जागा केवळ विद्याच पाहून देत नाहींत. बहुधा विद्येपेक्षां त्यांच्या सदाचरणाकडे अधिक पाहतात. मनुष्याच्या अंगीं विद्येपेक्षां किमानपक्ष दुपटीनें सद्गुण असले पाहिजेत, तरच त्यास विद्येचें भूषण होतें.

**दी०**—मुलींस विद्या शिकवून काय उपयोग ? पुरुषांनीं शिकली ह्मणजे झालें. बायकांस विद्या शिकून काय कारभार करावयाचा आहे ?

**रा०**—बायकांस सरकारी कारभार करायाचा नाहीं, ही गोष्ट खरी आहे. परंतु त्यांस याहूनहि मोठा कारभार चालवावा पडतो. मनुष्याचें कुटुंब हें एक लाहानसें शहर आहे.

त्याचा कारभार स्त्रियांस करावा पडतो. कुटुंबामध्यें नायको ही राणी आहे. आणि तिची जसी वर्तणूक असेल, त्याप्रमाणें घरांतील इतर मनुष्यें वागतात. स्त्री ही नवऱ्याचा परम सखा असें मानलें आहे. तीच जर अनाडी असली तर मग घरांत स्वस्थपणा कोठून राहील? घरांत निरंतर कज्जे, तंटे होऊन संसाराची नासाडी होईल. मुलांस सुशिक्षा न लागल्यामुळें तीं दुर्गुणी होतील. यास्तव मुलींस शिकवायाचा प्रयत्न मांडिला आहे. अतां ह्या लहान मुली आहेत खऱ्या, परंतु पुढें कांहीं वर्षांनीं त्या मोठ्या होऊन त्यांच्या हातांत कुटुंबाचा कारभार येईल, त्या वेळीं विद्या शिकल्यानें काय लाभ झाले आहेत, हें ध्यानांत येईल. वाचायास व लिहायास आल्यावांचून चांगली नीति समजणें कठीण.

दी०—नीतीची वृद्धि होण्यास याशिवाय कोणते उपाय त्यांणीं योजिले आहेत?

रा०—नीतीवर अनेक तऱ्हेचे ग्रंथ करवून छापिले आहेत. दारू व इतर मादक पदार्थ ज्यांपासून अनीतीची वृद्धि होती, ते विकायास प्रतिबंध असावा, ह्मणून सरकारांत कित्येक सुज्ञ लोकांनीं अर्ज्या केल्या आहेत. कोणी लांच घेतला, जुगार खेळला व कुकर्म केलें तर सरकार त्यास योग्य शिक्षा करितें. याचें कारण नीतीची वृद्धि होऊन अनीतीचा क्षय व्हावा. होळीच्या सणांत अभद्र भाषण होतें, तेणेंकरून लोकांचीं मनें बिघडतात, ह्मणून रस्त्यांत अपशब्द काढण्याची मनाई केली आहे. तसेंच बीभत्स चित्रें विकूं नयेत व अवाच्य पुस्तकें छापून प्रसिद्ध करूं नयेत, असा सरकारनें अलीकडे कायदा केला आहे.

दी०—आमच्या लोकांचीं मनें अलीकडे तर बरींच चांगल्या कृत्याकडेस लागलीं आहेत; परंतु हीं त्यांचीं सर्व कामें सिद्धीस जातील?

रा०—होय, जातील, यांत संशय नाहीं. परंतु अशीं कामें ह्मटलीं म्हणजे एका दोघांचीं किंवा पांचदहा मनुष्यांचीं नाहींत. यांस पुष्कळांनीं मदत केली पाहिजे, व त्यांजकडे सर्वांनीं झटलें पाहिजे. जर अविचारी लोक भलत्याच कल्पना काढून सुधारणुकीच्या व नीतीच्या कामांत अडचणी आणून बिघड पाडूं लागले, तर मग आपल्या देशाचें कल्याण होणें कठीण. यास्तव सुज्ञ लोकांनीं पारमार्थिक धैर्याच्या बळानें अल्पज्ञानी व वितंडवादी लोकांचें भय न बाळगतां ज्या कामास आपण एकदां मन घातलें आहे, तें सहनशीलतेनें सिद्धीस न्यावें, ह्मणजे कोणत्या गोष्टीस अडचण पडणार नाहीं. असें काम धीटपणानें एकदां सुरू केलें, ह्मणजे कांहीं दिवसांनीं तेंच लोकांस मान्य होऊन मग कुतर्क काढणाऱ्या लोकांचीं तोंडें सहज बंद होतात.



## संभाषण ४.

**दीना**—हल्लीं सुज्ञ लोकांनीं नीतीचा प्रसर होण्यास जे जे उपाय चालविले आहेत, ते चांगले आहेत, परंतु याशिवाय दुसरे कांहीं उपाय तुला सुचतात कीं काय ?

**रामचंद्र**—नीतीची वृद्धी होण्याचे दुसरे कांहीं उपाय माझ्या ध्यानांत येतात, ते मी तुला सांगतों. प्रथम आमच्या लोकांनीं आपणामध्यें एकी स्थापन करावी, ह्मणजे मत्सर, द्वेष, हेवा, निंदा, कपट हीं जीं आमच्या लोकांच्या अंतःकरणाचें स्वामित्व घेऊन बसलीं आहेत, त्यांचा मोड होईल. आणि परोपकारबुद्धि, देशाभिमान, भूतदया, शांति, क्षमा, औदार्य, सहनशीलता यांची वृद्धि होईल. आमच्या लोकांच्या जातींत ज्या क्षुल्लक कारणांवरून दुफळया, तंटेबखेडे होतात, त्यामुळें नीतीचे कोंब आंतच्या आंत चेंगरडून मरतात, ह्मणून नीतीचा विस्तार होत नाहीं. यास्तव असे बखेडे होऊं देऊं नये. अशा खटल्यांत पडलेला मनुष्य कितीहि नीतिमान् असला तरी त्यास आपल्या पक्षास भिऊन राहावें पडतें. यांत त्यांच्या निःपक्षपातीपणास बट्टा येतो. यास्तव मनुष्याच्या अंतःकरणाच्या सद्भावाचे यथासांग व्यापार होण्यास सर्व मनुष्यमात्र सारिख्या न्यायास योग्य आहे, असें मानिलें पाहिजे. नीतीचें काम आलें ह्मणजे मग तो श्रीमंत असो किंवा गरीब असो, शत्रू असो किंवा मित्र असो, सर्वांस समदृष्टीनें पाहिलें पाहिजे. दुफळया पडलेल्या असल्या ह्मणजे मनुष्याच्या करण्यांत धरबंध न राहिल्यामुळें तो अनीतीचा दोषी होतो.

**दी०**—दादा, तूं वर सांगितलेंस कीं, आपल्या आचरणांत धरबंध असावा, तर या वाक्याचा अर्थ मी कांहीं समजलों नाहीं.

**रा०**—धरबंध ह्मणजे बोलण्याचे व कांहीं काम करण्याचे नियम बांधणें. जर आपण ह्मटलें कीं, ही गोष्ट करीन तर ती अवश्यमेव करावी, आणि जो पुरुष ह्मणतो एक, आणि करतो एक, त्याच्या शब्दास धरबंध नाहीं असें ह्मणतात. अशा मनुष्याचें लोकांत वजन नसतें, आणि तो ह्मणतो तें कांहींच सिद्धीस जात नाहीं. अशी उदाहरणें अलीकडे आपल्या दृष्टीस किती पडतात ? कित्येक लोक अनेक तऱ्हेच्या सुधारणुकेविषयीं बोलतात, परंतु त्याप्रमाणें करणारे कोणी अढळत नाहींत, त्यामुळें लोकांत त्यांचें वजन न पडतां त्यांच्या अंगीं अनीतीचा दोष लागतो. कारण जसें बोलावें तसें करावें, हा धर्म आहे. यावर ही चमत्कारिक गोष्ट कसी आहे, पाहा ! बोरी लोकांत अशी चाल आहे कीं, ज्ञातीमध्यें जो सुशिक्षित आणि विद्वान् असेल, त्यासच आपला मुल्ला करून भजावें. एखादा मोठा विद्वान् असला आणि त्याचें आचरण निर्मळ नसलें, तर त्यास मुल्लाची पदवी कधीं देत नाहींत. एके समयीं त्या लोकांचा मुल्ला मरण पावला असतां त्याच्या जागेवर कोण स्थापावा, याचा निर्णय करायास सभा भरली, त्या वेळीं पांचसात तरुण विद्वानांनीं

ती पदवी आपणास मिळावी, ह्मणून आपापले मनोदय दर्शविले. त्यांत एक मोठा विद्वान् असून त्याणें नीति व लोकांची सुधारणूक कशी व्हावी, याजवर लहानसा ग्रंथ लिहिला होता. तो पाहून बहुतेक लोकांचीं मनें त्याकडे लागलीं. परंतु कित्येक ह्मणाले कीं, त्याचें आचरण पाहिल्यावांचून त्यास आमच्या गुरुस्थानीं बसविणें योग्य नाहीं. हें त्यांचें बोलणें सर्वांनीं मान्य करून त्याची वर्त्तणूक कशी आहे, ती पाहायास लागले. कांहीं दिवसांनीं त्याणीं असें पाहिलें कीं, त्याची वर्त्तणूक केवळ जें त्याणें लिहिलें होतें त्याविरुद्ध आहे. नंतर त्यास सभेंत बोलावून आणून सांगितलें कीं, जें तूं लिहिलें आहेस तें फार चांगले आहे. परंतु तुझें आचरण त्याविरुद्ध आहे, यास्तव तूं कांहीं उपयोगी मनुष्य नाहींस. तूं जें पुस्तक केलें आहेस तेंहि कांहीं कामाचें नाहीं; कारण, जर तें कदाचित् लोक वाचतील तर त्यांस असें वाटेल कीं, चांगल्या गोष्टी ह्या सर्व लिहायास मात्र केल्या आहेत. परंतु करायास नव्हत. यास्तव हें जें पुस्तक तूं केलें आहे, तें जाळायाच्या मात्र उपयोगी; असें ह्मणून तें त्याचें पुस्तक जाळून टाकिलें. आणखी त्यास बजावून सांगितलें कीं, तूं असें पुस्तक कधीं लिहूं नको. लिहिलें असतां तुला जातीकडून दंड होईल.

पाहा, कोणी सांगतात कीं, पुनर्विवाह करावा; कोणी ह्मणतो कीं, लहान मुलांचें लग्न करूं नये; कोणी ह्मणतो कीं, लग्नांत व इतर शुभकार्यांत कलावंतिणीचा नाच करूं नये; कोणी ह्मणतो कीं, उधळेपणानें लग्नांत वावगा खर्च करूं नये; परंतु आपल्यावर गोष्ट बिथरली ह्मणजे आपण बोललेलें तें एकाच ठिकाणीं ठेवून भलतेंच करितो. असें केल्यानें लोकांचीं मनें विशकलित होऊन लोकांस कोणावरच विश्वास ठेवायास आधार नाहींसा होतो. आणि त्याचें अचरण निर्मळ राहत नाहीं. मनुष्यानें आपलें वचन पाळावें याविषयीं तुकाराम असें ह्मणतो कीं,

बोले तैसा चाले
त्याचीं वंदावीं पाउलें.

या वाक्याचा भावार्थ इतकाच कीं, बोलतो त्याप्रमाणें करितो तो नीतिमान् असें समजावें. दुसरा एक कवी असें ह्मणतों कीं, बोलण्याप्रमाणें चालणें हें सद्‌गुणी मनुष्याचें काम. आणि ज्याच्या बोलण्यास व करण्यास ताळ नाहीं, तो ढोंगी व अनीतिमान् असें समजावें.

दी०—आपल्या कमाईपेक्षां अधिक खर्च करणें हेंहि नीतीच्या मार्गास विरुद्ध आहे काय ?

रा०—नीतिमार्ग मोठे सूक्ष्म आहेत, ते तुला सांगायास मला अवकाश नाहीं; परंतु तुला एवढेंच सांगतों कीं जो मनुष्य कोणतेंहि काम आपल्या शक्तीच्या बहरो

करितो, तो अनीतीस पात्र होतो. आपल्या कमाईपेक्षां अधिक खर्च ठेवणें, आपल्या योग्यतेपेक्षां अधिक सन्मान इच्छिणें व आपल्यास समजतें त्यापेक्षां कोणत्याहि गोष्टींत वितंडवाद घालणें, इत्यादि गोष्टी अयोग्य आहेत. दुसऱ्याचें कर्ज काढून धर्म करणें हेंही दोषास कारण होय. याविषयीं तुकाराम असें ह्मणतो.

कर्ज काढुनी ब्राह्मणाचें,
श्राद्ध वाढिलें पित्याचें,
यांत सार्थक बा तूं काय केलें ?

आपल्या लोकांत नीतीचा प्रसर होण्याचे जे उपाय ते तुला सांगावयाचा माझा हाच हेतु कीं, लोकांनीं आपापली स्थिति ओळखून चालायास शिकावें ह्मणजे वावगें कर्ज होणार नाहीं; असत्य बोलावें पडणार नाहीं; लोकांस ठकवायाची सवय लागणार नाहीं; ईश्वराच्या आज्ञेचें उल्लंघन करणें पडणार नाहीं; दुसऱ्याचा हेवा, मत्सर, व द्वेष होणार नाहीं. आणि मनाची शांति होईल.

दी०—दादा, नीतीचे बहुतेक मार्ग व तिची वृद्धि करण्याचे जे उपाय तूं सांगितलेस, ते माझ्या मनांत ठसले. आतां माझी खात्री झाली कीं, नीतीचे मार्ग सुगम असून कल्याणकारक आहेत. अज्ञानी लोक असे सरळ मार्ग सोडून आडमार्गानें जाऊन आपला नाश करून घेतात, हें मला फार वाईट वाटतें. बरें, मी मोठा झाल्यावर माझ्यानें जितकें होईल तितकें करून नीतीचा प्रसर करीन. ही माझी इच्छा सिद्धीस नेणार देव आहे असें लक्षांत आणून मी त्याची अशी प्रार्थना करितों कीं, हे जगदोद्धारका, माझे सर्व चांगले मनोरथ तूं सिद्धीस ने.

दा०—या विषयावर अणखी मी तुला पुष्कळ सांगितलें असतें, परंतु काय करूं आतां अवकाश राहिला नाहीं, सबब तुला इतकेंच सांगतों कीं, आपलीं सर्व कर्में ईश्वर पाहतो हें लक्षांत आणून वर्तणूक ठेव, त्यास शरण जा, आणि खालीं जो मी श्लोक लिहिला आहे, त्याचा भावार्थ ध्यानांत आणून वाग, ह्मणजे तुझें जन्म सफळ होईल.

नीतिमंतो महामान्या भवंति सधना अपि ।
तद्विरुद्धं तदन्यानां तस्मान्नीतिर्महत्तमा ॥ १ ॥

यांतील सारांश, जे नीतीनें वागतात, त्यांस प्रतिष्ठा आणि संपत्ति प्राप्त होतात; परंतु जे तिच्याविरुद्ध चालतात, त्यांस अप्रतिष्ठा आणि दुःख हीं प्राप्त होतात.

समाप्त



# PRIZE ESSAY ON INTEMPERANCE
## No. 3

# दारूपासून अनर्थ

यावर्षीं

हा ग्रंथ गोविंद नारायण यानी केला.

मुंबईमध्यें अमेरिकन मिशन छापखान्यांत छापिलें.

सन १८५५

---

T. GRAHAM, PRINTER
1855

११

# विष्णुपंत आणि त्याचा मुलगा रामचंद्र या दोघांमध्यें दारू प्याल्याने व दुसरे अम्मल केल्याने काय काय अनर्थ होतात, याविषयीं संवाद

## संभाषण १ लें

रामचंद्र—बाबा, अलिकडे दारूविषयीं लोकांमध्यें फार गवगवा चालला आहे, व कित्येक इंग्रज लोकांचें मत तर असें आहे कीं, दारू अगदींच पिऊं नये; तसेंच, गांजा, अफू, चंडोल, भांग इत्यादि दुसरे पुष्कळ मादक पदार्थ आहेत, त्यांचेंहि सेवन करूं नये असें ह्मणतात; परंतु दारूच ह्या सर्व मादक पदार्थांत अति निंद्य धरली आहे याचें कारण काय असावें बरें?

विष्णुपंत—मुला, अलिकडे दारूचा प्रसार सर्व भरतखंडांत झाल्यामुळें लोकांची फारच हानि होऊं लागली, त्यामुळें कित्येक परोपकारी गृहस्थांस, तिचा प्रतिबंध करण्यास कांहीं उपाय योजणें अगत्य पडलें आहे. मादक पदार्थ ह्मणजे ज्यापासून मनुष्यास कैफ चढून बुद्धिभ्रंश होतो ते सर्व पदार्थ सेवन करण्यास शास्त्रांत निषेध केला आहे; परंतु बाकीच्या अमली पदार्थांपेक्षां अलिकडे बहुतेक लोक हरएक निमित्ताने दारू पिऊन आपली नासाडी करून घेऊं लागले, ह्मणून तिजविषयीं एवढा गवगवा चालला आहे. दारू प्याल्याने मनुष्याची बुद्धि, ज्ञान यांचा विध्वंस होऊन शरीर व्याधिग्रस्त होतें, द्रव्य लयास जातें, आणि घरांत दरिद्र शिरून निरंतर वास करितें. एकदां दारूची संवय लागली ह्मणजे ती सहसा सुटत नाहीं. त्यामुळें दुसरे नाना प्रकारचे दुर्गुण अंगीं जडतात. चोरी, व्यभिचार, विश्वासघात, स्त्रीहिंसा, बालहत्या, आणि वारंवार आत्महत्यादेखील या व्यसनापासून घडती म्हणूनच सुरा (दारू) ही हिंदुशास्त्रांत निषेधिली आहे. दारू प्याल्याने मनुष्याची बुद्धि जाती, त्याला आपलें देहभान राहत नाहीं. परम दयाळू परमेश्वरास तो अगदीं विसरून जातो. आणि आपणास पशूपेक्षांहि नीचत्व आणितो. तर या पलिकडे दुसरी हानि कोठें राहिली आहे?

रा०—बरें बाबा, दारू पिण्यास अशी ही मनाई हिंदुशास्त्रांतच केली आहे कीं, दुसरे अनेक धर्मांचे लोक आहेत, त्यामध्येंदेखील मनाई आहे?

वि०—दारू पिण्यास व दुसरा कोणत्याहि प्रकारचा अम्मल करून आपल्या ज्ञानादिकांचा नाश करण्यास बहुतकरून सर्व पृथ्वीवरील धर्मांत मनाई केली आहे. मुसलमान लोकांच्या धर्मांत दारू पिण्याविषयीं इतकी मनाई केली आहे कीं, तिचें (दारूचें) दर्शनदेखील करूं नये. जैन लोकांच्या धर्मांतहि दारू पिऊं नये, असें सांगितलें आहे. ख्रिस्ती शास्त्रांत जरी, दारूस स्पर्श करण्यास व ती चाखण्यास मनाई नाहीं, तरी ती पिऊन मस्त होणारा मोठा दोषी, असें सांगितलें आहे.

रा०—दारू प्याल्याने मनुष्याच्या तोंडास वास मारतो आणि बेशुद्ध होतो ह्मणून काय तिचा एवढा निषेध केला आहे ?

वि०—केवळ दारूपासून तोंडास घाण येती, आणि बेशुद्ध होतो, इतकेंच नाहीं; परंतु ती प्याल्याने मनुष्य इहपरलोकीय सर्व सुखांस सर्वस्वी मुकतो. ह्या पृथ्वीवर त्याचे किती हाल होतात, ते पाहा. मुंबई मुकामीं एक सधन गृहस्थ राहत होता. त्यास इंग्रजीहि बरेंच येत असे; परंतु त्याला दुष्ट सोबत्यांच्या संगतीने दारू पिण्याचें व्यसन लागलें. हरहर ! त्यामुळें त्याचे जे हाल झाले, ते सांगण्यास मला फार दुःख वाटतें. तो दिवसभर दारू पिऊन छाकटा होत असे, आणि त्याला आपल्या वस्त्रप्रावरणाचीदेखील शुद्धि नसे. त्याला क्षणोक्षणीं दारू पिल्याशिवाय चैन पडत नसे. शेवटीं त्याने आपल्या घरादाराची वाट लाविली, व बायकोच्या गळ्यांतील मंगळसूत्र व मुलांचे आंगरखे व टोप्यादेखील विकून तो दारू पिऊन मस्त होई, आणि मग आपल्या बायकोस व मुलांस दुःख देत असे. त्यापासून शेजारच्या लोकांसदेखील मोठा त्रास होऊं लागला. जेव्हां त्याच्या घरांत दमडीचीदेखील वस्तु मिळेनाशी झाली, तेव्हां लोकांच्या दारोदार भिक्षा मागूं लागला. पाहा, त्याच्या अंगावर वस्त्र नसे. तो रस्त्यांतील चिंध्या गोळा करून थोडासा शुद्धीवर येई, तेव्हां आपली काया झांकीत असे. असे त्याचे मोठे हाल झाले. याप्रमाणें दारूपासून अनर्थ होतात, ह्मणून ती निषेधिली आहे. कैफाच्या स्वाधीन झाल्यामुळें राज्यांचीं राज्यें धुळीस मिळालीं आहेत. तसींच कित्येक कुटुंबाचीं कुटुंबेंदेखील लयास गेलीं आहेत.

रा०—परंतु, बाबा, कोणी कोणी असें सांगतात कीं, दारू ही शरीरास फार चांगली, तिजपासून पोटास चांगली भूक लागून अन्न पचन होतें. हे तरी तिचे गुण खरे ना ?

वि०—दारूपासून जठराग्नि प्रदीप्त होतो असें ह्मणतात, तें खोटें आहे. दारू पिणारा जेव्हां दारू पितो, त्या वेळीं त्याची क्षुधा प्रदीप्त होती खरी; परंतु तिचा अम्मल येऊन गेला, ह्मणजे ती मंद होती आणि तेणेंकरून त्या मनुष्यास फार उपद्रव होतो. त्याची मुळची प्रकृति शिथिल होऊन जाती. जठराग्नीचा जोर उत्तरोत्तर कमी होऊन पोटांत नाना प्रकारचे रोग उत्पन्न होतात, असें कित्येक वैद्यांचें मत आहे.

---

## संभाषण २ रें

रा०—दारूपासून जे अनर्थ होतात, त्याविषयीं आपल्याकडून ऐकल्यावरून मला आमच्या लोकांविषयीं फार काळजी वाटती. त्या बिचाऱ्यांची स्थिति दिवसान-

दिवस वाईट होत चालली आहे, तर ते तींतून कोणत्या उपायाने सुधारून मोकळे होतील?

वि०—होय, दारूपासून जे अनर्थ होतात, ते दूर होण्यास कांहीं उपाय मला सुचतात, ते मी तुला सांगतों, ऐक. प्रथम ह्या दारूचा प्रसार न होण्यास सरकारने बंदोबस्त ठेविला पाहिजे. माडापासून, शिंदीपासून, मोह्यापासून व अनेक तऱ्हेच्या रसांपासून जो अर्क काढितात, त्याची मनाई सरकारनें करावी. किंवा औषधास व अवश्य कामास जितकी दारू पाहिजे तितकीच करण्यापुरते कारखाने ठेवावे; आणि बाकीचे सर्व काढून टाकावे. दुसरें, इंग्लंड, पोर्तुगाल, इत्यादि देशांतून जी हजारों रुपयांची दारू या देशांत येती, तिजविषयीं बंदोबस्त ठेवावा. तिसरें, गांवोंगांवीं शाळा घालून विद्येचा प्रसार करावा; ह्मणजे अविद्येचा नाश होईल. चवथें, आह्मा लोकांत जे प्रतिष्ठित सरकारी कामगार, द्रव्यवान व विद्वान असतील, त्यांनी या कामास झटून दारू पिल्यानें काय अनर्थ होतात, ते स्पष्ट करून कुळंबी, कोळी, माळी, भंडारी इत्यादि लोकांस सांगावे. या कामास जेव्हां आमचे बडे लोक हात घालतील, तेव्हांच याचा प्रतिबंध होईल. सरदार, जाहागीरदार, आमीन, मुनसफ इत्यादि सत्ताधारी लोकांच्या हातून असलीं कामें सहज होतील. पांचवें, ही अवदसा आपल्या देशांत शिरली आहे, तिचा समूळ नाश व्हावा, ह्मणून परम दयाळू जो परमेश्वर, त्यास अनन्यभावेंकरून शरण जावें. त्याची कृपा संपादन केल्याशिवाय आपण कितीहि बाह्यात्कारी उपाय केले, तरी ते व्यर्थ.

रा०—आपण जे उपाय सांगितले त्यांत विद्या वाढवावी, व गांवोंगांवीं शाळा घालाव्या ह्मणून सांगितलें, तर विद्येशीं आणि दारू पिण्याशीं संबंध काय? मी असें ऐकतों कीं, अलिकडे कित्येक ब्राह्मण, शास्त्री, चांगले विद्वान असून वाममार्गांच्या आधाराने दारू पीत असतात. व कित्येक शिकलेले इंग्रेज लोकहि तिचें यथेच्छ सेवन करितात. तर एथें त्यांच्या विद्येपासून त्यांस दारू न पिण्याविषयीं काय बरें बोध झाला?

वि०—ठीक, बरा प्रश्न केलास. अलिकडे कित्येक विद्वान लोक शक्ति-उपासनेच्या मिशाने दारू पितात, असें माझ्याहि ऐकण्यांत आहे. आणि ही गोष्ट खरी आहे कीं, ते शिकलेले, पढलेले लोक आहेत; परंतु केवळ वाचतां लिहितां आलें, न्याय, ज्योतिष इत्यादि शास्त्रांचें अध्ययन केलें, ह्मणजे सद्गुण अंगीं येतात असें नाहीं. कितीहि विद्या शिकला आणि सत्मार्ग कोणता असत्मार्ग कोणता हें ज्यास समजलें नाहीं, तो अज्ञानी, नीच असें समजावें. ज्याला आपलीं कर्त्तव्यकर्में समजलीं आणि ईश्वराच्या आज्ञांचें पालन करणें समजलें; त्यासच ज्ञानी, शाहाणा, विद्वान ह्मणावें. आतां शाळा घालाव्या ह्मणून मी सांगितलें, तें अशासाठीं कीं, ज्या लोकांस ह्या दारूपासून अनर्थ होतात ते माहित नाहींत, त्यांस विद्याद्वारें समजावें, आणि त्यांस ईश्वरी ज्ञान होई असें करावें, ह्मणजे ते दारू पिणें वगैरे वाईट मार्ग सोडून देतील. मुलांस लहानपणापासून नीति,

ईश्वरभीति, इहींकरून विद्या शिकविली, तरच तीं पुढें बहुधा सद्गुणी होतील. जे इंग्रज लोक दारू पिऊन मस्त होतात, ते ईश्वरास न भिणारे व नीतीने न चालणारे असे असतात.

रा०—बरें, मराठे राजे, व पेशवे यांच्या कारकीर्दींत दारूचीं दुकानें आतांच्या इतकीं नव्हतीं व तेव्हां लोक फारसी दारू पीत नव्हते, असें ह्मणतात, तें खरें कीं काय ?

वि०—मराठी राजांच्या कारकीर्दींत दारू करीत असत व त्या वेळीं कित्येक ठिकाणीं दारूचीं पिठींहि ( दुकानें ) होतीं; परंतु त्यांचा फार बंदोबस्त असे; आतां इंग्रेजी राज्य झाल्यापासून जसीं रस्तोरस्तीं व गल्लोगल्लीं चार चार हातांवर एक एक कलालाचें दुकान आहे, तसीं नव्हतीं. गांवांत कामापुरतें एक दुसरें पिठें असे; परंतु तें बहुधा शहराच्या बाहेर वेगळेंच असे. कोणी दारू पिऊन मस्त झालेला रस्त्यांत किंवा आपल्या वाड्यांत जरी पाहिला, तरी त्यास सरकार मोठें शासन करीत असे. परंतु आतां लोकांस तेवढी कदर नाहीं, ह्मणून ते स्वच्छंदपणीं वागतात. वास्तविक ह्मटलें असतां दारू पिण्यापासून कोणताहि अपराध घडला असतां त्यास दुप्पट शासन होत असे, ह्मणून त्या वेळेस दारूचा इतका फैलाव होत नसे.

रा०—मराठे राजे हे ह्मटले असतां जातीचे शूद्र होते. त्यानीं ह्या दारूविषयीं इतका प्रतिबंध ठेविला होता, हें मोठें आश्चर्य आहे !

वि०—यांत मोठें नवल आहे असें नाहीं. तूं पाहा कीं, शिवाजी राजापासून जे मराठे राजे झाले, त्यांचे अष्टप्रधान बहुधा चांगले विद्वान ब्राह्मण असत, त्यांनी कैफ न करण्याविषयीं मोठा बंदोबस्त ठेविला होता. थोरले माधवराव पेशवे यांच्या कारकिर्दींत रामशास्त्री ह्मणून होते, ते फार योग्य पुरुष असून, त्यांनी राज्यांत दारूविषयीं फार चांगले नियम करून ठेविले होते. त्यांचा असा एक कायदा होता कीं, जीं राज्यें पेशव्यांच्या ताब्यांत येतील त्या राजांकडून ते असा तह करवीत कीं, शहरांत दारू विकूं नये. कित्येक मुसलमान राजांच्या पदरीं ब्राह्मण कामदार असल्यामुळें तेहि दारूचें प्राबल्य होऊं देत नसत.

---

## संभाषण ३ रें

रा०—एखाद्या मनुष्यास दारूचें व्यसन लागलें असलें तर सोडण्यासाठीं त्यानें अफू, गांजा, वगैरे दुसरे अम्मल केले, तर कसें ?

वि०—कोणत्याहि प्रकारचा कैफ करणें हें दोषकारकच आहे. गांजा, अफू, चंडोल, भांग, इत्यादि अमली आणि मादक पदार्थांपासून मनुष्याच्या शरीराची खराबी होती.

बुद्धि व ज्ञान यांची नासाडी होती. जेव्हां ते कैफाच्या भरांत असतात, तेव्हां ते वेड्यासारिखे चाळे करितात. मग तो कैफी राजा असो किंवा रंक असो, विद्वान असो किंवा अविद्वान असो, सरदार असो किंवा शिपाई असो, सर्वत्रांचे एकसारिखेच हाल होतात. अलिकडे या मुंबई मुकामीं कित्येक भल्या गृहस्थांचीं मुलें अफू, चंडोल, भांग, कुसुंबा, आणि गांजा पिऊं लागल्यामुळें त्यांची किती दुर्दशा झाली आहे, ती सांगवत नाहीं ! कित्येक आपल्या बायका व मुलें टाकून रस्तोरस्तीं दिडकीदुगाणी मागत फिरतात, हें तर तूं नेहमी पाहातोस. अणखी याविषयीं मला अधिक काय विचारतोस ? अलिकडे अफिणीचा व्यापार करणारे व विकणारे व घेणारे किती दोषी आहेत, हें दाखविण्याविषयीं गुजराथी भाषेंत सुज्ञ लोकांनी दोनचार ग्रंथ केले आहेत, ते जर तूं पाहसील तर त्याविषयीं तुझा संशय फिटेल.

रा०—आपण सांगतां त्यावरून माझी बहुतेक प्रकारें खात्री झाली; परंतु त्या दिवशीं धोंडोपंत याविषयीं असें बोलले कीं, ईश्वराने या सृष्टींत जे जे पदार्थ उत्पन्न केले आहेत, ते मनुष्यासाठीं केले आहेत. तेव्हां अमली पदार्थांचें सेवन केलें असतां त्यांत काय दोष आहे ?

वि०—ईश्वराने मनुष्यासाठीं सर्व पदार्थ उत्पन्न केले आहेत ही गोष्ट खरी आहे; परंतु त्यांचा जसा उपयोग करणें योग्य आहे, तसा केला पाहिजे. नारळ, खजूर, द्राक्षें, ऊंस इत्यादि पदार्थ मनुष्यांस खाण्यासाठींच ईश्वरानें केले आहेत. त्यांपासून दारू काढण्यासाठीं केले नाहींत. दुसऱ्या कित्येक पदार्थांची दारू औषधास मात्र उपयोगी आहे. आतां, द्राक्षारस शक्त्युत्पादक असें वैद्य लोक सांगतात व तो किती घ्यावा, हेंदेखील त्यांसच माहित असतें. अर्की दारू देवाने केली नाही. ती मनुष्यांनी केली आहे. दारू तर काय, परंतु सोमल, बचनाग इत्यादि विषयुक्त पदार्थदेखील मनुष्यास उपयोगी आहेत; परंतु त्यांचा उपयोग समजला मात्र पाहिजे. सृष्टींतील सर्व पदार्थांचा उपयोग अजून कोणास समजला आहे !

रा०—बाबा, बरीच आठवण झाली; कित्येक मजूर लोक व कारागीर लोक असें सांगतात कीं, “ आह्मी सर्व दिवस श्रम करून थकलेलों असतों. आणि जेव्हां सायंकाळीं दारू पितों व दुसरा कैफ करितों, तेव्हां आमचा शिणभाग उतरतो व दुसरे दिवशीं काम करायास हुशारी येती. ” तर हें त्यांचें ह्मणणें कसें काय आहे ?

वि०—ते लोक सांगतात, त्याचें कारण असें आहे कीं, दारूच्या कैफांत ते आपले श्रम कांहीं वेळ विसरतात, परंतु कैफ उतरला, ह्मणजे ते शक्तिहीन व निस्तेज होतात. असें होतां होतां त्यांच्याने दररोज कैफ केल्यावांचून राहवत नाहींसें होतें. मग अर्थातच आपली मिळकत जिनगानी या दारूरूप राक्षसीच्या भरीस घालून आपण

कवडीस माहाग होतात. असें होतें, तेव्हां त्यांचे हाल काय पुसायाचे आहेत! त्याला धड वस्त्रदेखील मिळत नाहीं. त्यांच्या बायका व मुलें विलाप करीत विपत्ति भोगूं लागतात. विशेष काय सांगावें, त्यांच्या सर्व संसाराची धूळधाणी होऊन जाती. अलिकडे अमेरिका व युरोप या खंडांतील कित्येक वैद्यलोकांनी पुष्कळ शोध केल्यावरून असा निर्णय केला कीं, या प्रकारें दारू पिल्याने मजूर लोकांस फायदा होण्याबद्दल त्यांची नासाडी मात्र होती. ती असी कीं, कैफामुळें त्यांची उत्तरोत्तर क्षुधा मंद होती, शरीर अशक्त होतें, आणि त्यांच्या पोटांत अनेक तऱ्हेचे रोग उत्पन्न होतात. जे सर्व दिवस श्रम करितात, त्यांस खाणेंपिणें मात्र चांगल्या प्रतीचें असलें पाहिजे. श्रमास दारूची बिलकूल गरज नाहीं. दारूच्या ठिकाणीं ते पाणी जर पितील, तर त्यापासून अधिक फायदा होईल. तर यावरून पाहा कीं, कित्येक मजूरदार व कारागीर लोक खोट्या समजुतीने जर या कैफाच्या स्वाधीन झाले नसते, तर ते आज किती सुखी झाले असते बरें ?

**रा०**—तुम्ही दारूपासून जे अनर्थ होतात, ते दाखविल्यावरून माझी बहुतेक खात्री झाली; परंतु एक संशय राहिला, तो हा कीं, कित्येक लोक असें सांगतात कीं, दारू पिल्याने शरीर बळकट होऊन मनुष्य फार वर्षे वांचतो, तर हें खरें कीं काय ?

**वि०**—दारू पिल्याने व कैफ केल्याने शरीर बळकट होण्याबद्दल व्याधिग्रस्त होऊन तो मनुष्य अल्पायुषी होतो, हें मात्र खरें. परंतु तूं जें ऐकलेंस ते सांगणारे मूर्खांच्या माळिकेंतले असावे. दारू पिऊन जे मस्त होतात ते खून, आत्महत्या, व चोरी करितात, याशिवाय त्यांच्या कुटुंबांत नेहेमी कलह, असे नाना प्रकारचे भयंकर अनर्थ होतात, हें वारंवार तूं पाहतोस व नुकतेंच मीहि तुला याविषयीं सांगितलें आहे; तथापि तुझा संशय फिटत नाहीं, हें पाहून मला मोठें आश्चर्य वाटतें. जे लोक पुष्कळ दारू पितात, त्यांस जलोदर, अतिसार, कांपरें असे अनेक जातीचे रोग उत्पन्न होतात. त्यामुळें ते फार विपत्ति भोगून लवकरच मरण पावतात. अलिकडे कित्येक विद्वान लोकांनी प्रत्येक देशाची वस्ती व प्रतिवर्षीं निरनिराळ्या देशांत किती लोक मरतात, त्यांची संख्या काढून पाहिली, त्यावरून असा निश्चय झाला कीं, ज्या देशांत दारू पितात, त्या देशाचे लोक, दारू न पिणाऱ्या देशांतील लोकांपेक्षां दुप्पट मरण पावतात. कित्येक कैफ करणारे लोक कैफ अधिक झाल्यामुळें जिकडच्या तिकडेच मरण पावतात. कित्येक रस्त्यांत पडून प्राणास मुकले जातात. रामचंद्रा, त्या दिवशीं आपण फिरायास गेलों होतों, तेव्हां त्या वेळीं एक मराठा झिंगून गटारांत लोळत होता, त्याची तुला आठवण आहे ना ? अणखी मी तुला याविषयीं अधिक काय सांगूं. या दारूपासून मोठे मोठे श्रीमंतांचेदेखील असेच हाल होतात. शिकंदर बादशाहाविषयीं ग्रीस देशाच्या इतिहासामध्यें त्वां वाचलें असेलच. तो सार्वभौम होता; परंतु त्याला

दारूची चट लागल्यामुळें इतका बिघडून गेला कीं, त्याने कैफाच्या अमलांत असतां विनाकारण आपल्या एका वृद्ध, प्रमाणिक आणि भल्या सरदारास ठार मारून टाकिलें; आणि शेवटीं कैफाच्या अमलांतच आपला नाश करून घेतला. असा या कैफाचा अति घोर परिणाम आहे. कैफापासून जे दुःखकारक परिणाम होतात, ते जर तुला मी एथें सांगत बसेन, तर महिन्याचे महिने लोटतील; ह्मणून मी इतक्यानेच पुरें करितों आणि तुला अवकाश सांपडेल तेव्हां ज्ञानोदय, प्रभाकर, धूमकेतु, वर्त्तमानदीपिका, व ज्ञानप्रकाश वगैरे वर्त्तमानपत्रांचे मागील अंक वाचून पाहा, ह्मणजे कैफांच्या दोषांविषयीं तुझी पक्की खात्री होईल. अणखी हल्लीं या विषयावर कित्येक निराळेच ग्रंथ तयार होत आहेत. ईश्वरकृपेंकरून ते तुझ्या वाचण्यांत लवकरच येतील.

## संभाषण ४ थें

रा०—बाबा, तुह्मी कैफापासून जे अनर्थकारक परिणाम होतात, ते सांगितल्यावरून माझी आतां निशा झाली कीं, जसे आह्मी एखाद्या महारोगास अथवा पटकीच्या वाख्यास भिऊन त्यापासून दूर राहतों, त्याप्रमाणें कैफासहि भिऊन त्यापासून पळून जाणें आह्मास अवश्य आहे. असें असतां हे लोक नाना प्रकारचे कैफ करून आपला नाश करून घेतात. याचें मला मोठें आश्चर्य वाटतें. या लोकांस आपलें हित–अनहित काहींच समजत नाहीं, कसें ? हे आपणास शाहाणे ह्मणवीत असून जनावराप्रमाणें आपली वर्त्तणूक कां करितात बरें ?

वि०—बरें बोललास, कैफाचा शेवट दुःखरूप असतां लोक त्यांत निमग्न होऊन त्यांतच आपलें सुख मानितात, याचें कारण असें आहे कीं, मनुष्याच्या अंतःकरणाचा कल स्वभावतः दुराचरणाकडे लागलेला असतो, त्यामुळें त्याला आपल्या वास्तविक कल्याणाचा मार्ग दिसत नाहींसा होऊन नाच, तमाशे, ख्याली, खुशाली, दारू, भांग, गांज्या, गोळी, अफू, कुसुंबा, चंडोल, इत्यादि अनेक प्रकारच्या दुर्व्यसनांत लंपट होऊन उत्तरोत्तर त्याच्या पापवासना वाढत जातात; स्वहितबुद्धि नाहींसी होती; सन्मार्गाचा तिरस्कार येतो; ईश्वरभक्तीचा कंटाळा येतो. आणि असें झालें असतां अर्थातच तो मनुष्य डोळस असून आंधळा असें समजावें. पृथ्वीमध्यें दुर्व्यसनाची प्रवृत्ति बहुधा वाईट संगतीमुळें होती, यास्तव दुराचरणी मनुष्याचा सहवास कधीं करूं नये. तसींच वाईट पुस्तकेंहि वाचूं नयेत. कारण त्यामुळें बुद्धि व अंतःकरण, हीं बिघडून जातात, व कुवासनांचीं वृद्धि होती. याविषयीं मोरोपंत असें ह्मणतो :—

॥ सुसंगति सदा घडो, सुजनवाक्य कानीं पडो ॥
॥ कलंक मतिचा झडो, विषय सर्वथा नावडो ॥

मनुष्याचें अंतःकरण जात्या दुर्वासनायुक्त आहे ह्मणूनच सुज्ञ लोक आपल्या मुलांस लाहानपणापासून नीतिशास्त्रबोध, पापाचा तिरस्कार, आणि ईश्वराची भक्ति, हीं करण्यास शिकीवतात. मुलांस लाहानपणापासून जर ह्या गोष्टी शिकविल्या नाहींत, तर मोठेपणीं त्यांचीं अंतःकरणें दगडासारिखीं कठोर होऊन तीं मुलें स्वच्छंदाने वागतात. आणि कैफ, चोरी, जुगार आणि इष्कबाजी, असे अनाचार करून आपल्या अंगीं पशूची योग्यता आणितात. अशा प्रतीच्या लोकांस एक कवी "जीवनमृत्" असी उपमा देतो. ह्मणजे ते जीवंत असून मेलेले असें जाणावें. आणि ही गोष्ट उघडच आहे. रामचंद्रा, तूं पाहा बरें ! जे दारू पिऊन मस्त होतात, ते किती बेशुद्ध असतात. त्यांला आपल्या नेसण्याचीदेखील शुद्धि नसती. त्यांला आपलें देहभान नसून ओंगळ आणि निर्मळ, यांचा भेद समजत नाहींसा होतो. सुगंध आणि दुर्गंध यांचे ज्ञान नसतें. आईबाप व बायकोमुलें यांची दुःखस्थिति पाहून कळवळा येत नाहीं. बायकोमुलांचे शोककारक शब्द त्या कैफी मनुष्यास ऐकूं येत नाहींत. त्यांचें दारिद्र आणि लाचारी त्याला दिसत नाहीं. त्याला मिष्टान्नाचा स्वाददेखील नसतो. हरहर ! काय ही दशा ! हे जगदुद्धारका, अशा लोकांची अंतःकरणें उघडून ह्या अनर्थकारक दुर्व्यसनाची आपल्या देशांत वृद्धि न होई असें कर, असी मी तुजपाशीं वारंवार प्रार्थना करितों. कित्येकांची असी समजूत आहे कीं, अल्पस्वल्प कैफ केला असतां दोष नाहीं; परंतु अधिक कैफ मात्र करूं नये. तर ही त्यांची समजूत अगदीं खोटी आहे. कारण थोडा कैफ करितां करितां लोक मोठमोठाले कैफ करून आपली सर्वस्वी हानि करून घेतात. कोणतेंहि काम आरंभीं मोठें नसतें; परंतु पुढें वाढत जातें. तसेंच लाहान चोरी करितां करितां मनुष्य मोठमोठाले दरोडे घालूं लागतो. याविषयीं असी एक ह्मण आहे कीं, "काडी चोर तो पाडी चोर." याप्रमाणें थोडी दारू पिण्याची एकदां संवय लागली असतां ती उत्तरोत्तर वाढून शेवटीं तो शिशांचे शिशे झोंकीत असतो. मग दारू कितीही प्याली, तरी त्याची इच्छा पूर्ण होत नाहीं. याविषयीं एक ग्रंथकर्त्ता असें म्हणतो कीं, "हे मनुष्या, जर तुला आपली ताहान कधींच भागूं नये असी इच्छा असली, तर दारू पिण्याची संवयी कर, ह्मणजे तुझी ताहान कधींच भागणार नाहीं." जे दारू पितात, त्यांच्या पोटांत एक तऱ्हेचा रोग उत्पन्न होऊन त्यांला नेहमी शोष लागतो. असे या कैफापासून मनुष्याचे मोठे नाश होतात, ह्मणून त्यांपासून मनुष्यानें दूर असावें. मनुष्याला मुख्य ईश्वराची प्रीति आणि लोकलज्जा व स्वहिताची इच्छा हीं असलीं पाहिजेत, ह्मणजे तो कोणत्याहि प्रकारच्या दुर्व्यसनांत पडणार नाहीं. तो सर्व काल देवाच्या आज्ञा पाळून जें उचित तेंच करील, आणि जो मनुष्य याप्रमाणें वर्त्तणूक ठेवील, तोच इहपरलोकीय सुख भोगील, यांत संशय नाहीं. तथास्तु.



# DRAMA ON A PRACTICAL SUBJECT



# व्यवहारोपयोगी नाटक

हा निबंध

गोविंद नारायण

यांणीं

ज्ञानप्रसारक सभेकरितां रचिला.

तिसरी आवृत्ति

मुंबईमध्यें

ओरिएन्टल छापखान्यांत छापिलें.



सन १८६४

# प्रस्तावना

यो गच्छत्यविचारेण स याति विपदां पदम् ।
तस्माद्विचारः कर्तव्यो दुस्तरे प्राणसंकटे ॥

अर्थ—जो अविचारानें चालतो तो विपत्तींत पडतो, यास्तव प्राणसंकट जरी पडलें, तरी विचारानेंच चालावें.

मनुष्य अविचारानें वागला असतां त्यास कोणकोणत्या अडचणी येतात, व त्यांपासून तो प्रापंचिक आणि पारमार्थिक सुखास कसा अंतरतो, हें दाखविण्याकरितां हा लहानसा व्यवहारोपयोगी नाटकरूप निबंध लिहिला आहे. यांत ज्या कित्येक गोष्टी लिहिल्या आहेत त्या अनुभविक असून वारंवार लोकांच्या आढळण्यांत येतात. मुलांचें लहानपणीं लग्न करण्यांत व लग्नांत बडेजावीनें वावगे खर्च करण्यांत आमचे लोक किती उत्सुक असतात, आणि तें साधून घेतांना कसे तापत्रयांत पडतात, हें सर्व निरनिराळ्या पात्रांच्या द्वारें येथें दर्शविलें आहे. अविचारानें चाललें असतां आपली नासाडी होती, हें लक्षांत आणून आमच्या लोकांनीं सावध व्हावें, हाच ग्रंथकर्त्याचा मुख्य उद्देश आहे.



# पात्रें

**त्रिंबकजी**, एक गृहस्थ
**चिमाबाई**, त्याची स्त्री
**बाळा**, त्याचा मुलगा
**ताई**, त्याची मुलगी
**रामभट**, उपाध्या
**शामराव**, ताईचा सासरा
**बाजीराव**, बाळाचा सासरा
**सोकर**, त्रिंबकजीचा पुतण्या
**नाथा**, मारवाडी
**विठबशेट**, सोनार
**सदू**, माळी
**गुलाबी**, नायकीण
**भिंवा**, वाजंत्री
**उद्धवजी**, नारळवाला
**हरजीवन**, तूपवाला
**आनंदजी**, कापडवाला.

चिंतोबा, आनंदराव, दामोदरजी, सदूभट, बापूजी, कासिम, तात्याशेट, रामदास, रामचंद्रजी, शिवराम, येसूबाई, माध्या, सोन्या, तासेवाले, ब्यांडवाले, हिलालवाले, गलासवाले, वगैरे.



# प्रवेश १

( एके दिवशीं त्रिंबकजी चाकरीवरून घरीं येऊन सायंकाळचा फराळ केल्यावर खुर्चीवर बसून पानसुपारी खात बसला होता. त्या वेळीं त्याचा मुलगा आणि मुलगी हीं जवळ येऊन बापापाशीं कांहीं गोष्टी करितात. इतक्यांत चिमाबाई त्यांस 'उगी राहा' असें ह्मणून मोठ्या निकरानें नवऱ्यास ह्मणत्ये, 'तुह्मांला संसाराची कांहीच काळजी नाहीं हें काय बरें ? चाकरीवर जाऊन पांच रुपये घरांत आणून टाकले ह्मणजे झालें ? दुसऱ्या सर्व गोष्टींकडे लक्ष दिलें पाहिजे. पाहा, नवसाचीं येऊन जाऊन काय तीं आह्मांस दोन लेंकरें आहेत, त्यांजविषयीं कांहीं काळजी वागविली पाहिजे. मुलांच्या अंगावर कांहीं दागिने नाहींत, त्याचा कांहीं विचार करा. बरें, त्यांच्या लग्नाविषयीं आजपर्यंत तुह्मी कधीं कांहीं तरी गोष्ट काढिली आहे काय ? बरें, तें कांहीं असो. यंदा आमच्या बाळाचें आणि ताईचें एकदां लग्न करून टाकावें, ह्मणजे आपण काळजींतून सुटूं. लहानपणीं जशीं नवरानवरी शोभतात, तशीं मोठेपणीं शोभत नाहींत. यास्तव एकदां कांहीं तरी करून आपली हौस पुरी करूं.' )

**त्रिंबकजी**—घरीं बसल्या बसल्या तुला एक एक बऱ्याच गोष्टी सुचतात. आपला बाळा नुकताच फर्स्ट रीडिंग बुक शिकत आहे. त्याच्या शिकण्याचा कांहींच बंदोबस्त झाला नाहीं. त्यास कोणी रात्रीचा घरीं शिकवायास ठेवावा ह्मणून मी पाहात आहें, तर त्याची अजून कांहीं तरतूद आमच्याकडून होत नाहीं, त्याविषयीं तुझ्या ध्यानींमनीं कांहींच नाहीं, आणि लग्नाची मात्र तयारी करायास सिद्ध झाली आहेस, हें पाहून मला मोठें आश्चर्य वाटतें. तुझ्या मनांत त्याणें शहाणा होऊन आपला संसार सुखानें चालवावा असें आहे कीं नाहीं ? गाईपाड्याचें लग्न लावून देतात, त्याप्रमाणें त्याचें एकदां लग्न लावून देऊन सोडावें, ह्मणजे झालें ना ? पाह, आमचा संसार काय, मला सगळे पंधरा रुपये मिळतात. त्यांत आह्मी चार माणसें; याशिवाय एक चाकर, तर ह्या पंधरा रुपड्यांनीं महिन्याचा खर्च पुरा पडण्यास मोठी मुश्कील पडत्ये. असें असतां या लहान मुलांचें लग्न करूं या, ह्मणतीस तर तुला काय ह्मणावें ? आमच्या ताईचें नुकतेंच पांचवें वर्ष संपलें आहे. आपल्याच शास्त्राप्रमाणें ह्मटलें असतां तिच्या लग्नाचा काळ येण्यास अजून दोनअडीच वर्षें आहेत. यास्तव लोकांचें पाहून आपण भलतेंच करूं नये. आपली मिळकत, आपली योग्यता, व आपली स्थिति पाहून वर्त्तणूक करावी, हें बरें. एकानें गळ्यांत गोप घातलेला पाहून आपण दोरखंड बांधलें तर कसें होईल ? धीर धर. बाळास व ताईस चांगली विद्या शिकूं दे, मग तो सतराअठरा वर्षांचा झाला, ह्मणजे त्याचें लग्न करूं. आणि ताईचें अकराव्याबाराव्या वर्षी केलें ह्मणून चिंता नाहीं. चांगला

वर पाहून तिलाहि एकाद्या चांगल्या कुटुंबांत गुंतवून टाकूं, तोंपर्यंत ईश्वर कृपा करील तर मलाहि कांहीं चांगला रोजगार सांपडला, तर कांहीं पैसा सांठवून ठेवूं. मुलें वयावर आल्याशिवाय त्यांच्या बुद्धीचें प्रमाण सांपडत नाहीं. आणि अगदीं लहानपणीं लग्न केलें असतां कदाचित् मुलीस नवरा चांगला सांपडत नाहीं. किंवा मुलास चांगली बायको सांपडत नाहीं, याखेरीज अगदीं लहानपणीं लग्न केलें असतां एकाद्या अडचणींत येऊन तो मनुष्य मोठ्या तापत्रयांत पडतो. हें सर्व लक्षांत आण. असे भलतेच चाळे करूं नको.

**चिमाबाई**—तुह्मी सांगतां हें सर्व खरें, परंतु ईश्वरानें आपणास दोन मुलें दिलीं, त्यांची जर आह्मी हौस पुरविली नाहीं, तर दुसरें आमच्या हातून त्यांचें कल्याण काय होणार आहे? दुसरीं आह्मांला काय दहापांच मुलें आहेत? येऊन–जाऊन हे दोन डोळे. आपल्या डोळयांसमोर एकदां त्यांला घर जोडून दिलें ह्मणजे झालें. पुढलें कोणी पाहिलें आहे? पाहा, चिंतोबा, आनंदराव, यांच्या मुलांचें लग्न केवढ्या लहानपणीं झालें? ते कांहीं इंग्रजी शिकलेले नाहींत. आनंदरावाच्या मुलास तर नुकतेंच दहावें वर्ष लागलें आहे आणि त्याची सून तीन वर्षांची आहे. लोक कांहीं तुमच्यासारिखे सर्व गोष्टींत भित्रे नसतात. गतवर्षीं दामोदरजीनें आपल्या नातवाचें लग्न केलें तो केवढा आहे, तें तुह्मांला ठाऊक आहे ना? आपल्या शेजारीं सदूभट राहत होता, त्याणें आपल्या मुलीचें गांवीं जाऊन लग्न केलें, ती दीड किंवा दोन वर्षांची होती. हे लोक काय वेडे होते ह्मणून त्यांणीं लग्नें केलीं? तुह्मीं हें आज एकदां मनावर घ्याच. (इतक्यांत उपाध्या येतो.) या, रामभटजी आले. (यजमानीन बाई बोलती:) यंदां आपल्या ताईचें आणि बाळाचें लग्न करावें असें मनांत आहे. तुह्मांला कसें वाटतें?

**रामभट**—ठीक! फार उत्तम! आईबापांचा धर्म हाच कीं आपल्या मुलांचें एकदां लवकर लग्न करून टाकावें. त्याशिवाय तीं त्यांच्या ऋणांतून मुक्त होत नाहींत. माझ्याहि मनांत एकदोन वेळां ही गोष्ट आली होती; परंतु तुह्मी कोणीच कांहीं बोललां नाहीं, ह्मणून याजवर मी कांहीं बोललों नाहीं. एकदां जांवई आणि सून आणा. काय त्रिंबकजी, यंदां तुह्मी सूनमुख पाहाच परतें. तुह्मी मनावर घेतलें तर सगळें होईल.

**त्रिं०**—रामभटजी, तुह्मी सांगतां हें सर्व खरें आहे; परंतु कोणतेंहि काम करत्येवेळीं दूरवर दृष्टि दिली पाहिजे. लग्नाशिवाय दुसऱ्या चांगल्या गोष्टी आहेत, त्यांजकडे अगोदर लक्ष दिलें पाहिजे. लग्न करून टाकलें ह्मणजे झालें? पुढें त्यांचें कसें चालेल, याचा विचार केला पाहिजे. लहानपणीं लग्न केल्यानें अनेक अडचणी प्राप्त होतात, याविषयीं मी तुह्मांकडे पुष्कळ वेळ आजपर्यंत बोलत आलों, हें तुह्माला ठाऊकच आहे आणि तुह्मी दुसऱ्यास ही भर देतां याचें मला मोठें आश्चर्य वाटतें. पाहा, आह्मांस सर्व

गोष्टींची प्रतिकूलता आहे. अशांत लग्नाच्या खटपटींत पडणें हें मला ठीक वाटत नाहीं. तुह्मी तर आमचे उपाध्येच आहां. आमची कसी काय अवस्था आहे, ती तुह्मांला ठाऊकच आहे. आणखी मी तुह्मांस काय सांगूं ?

रा०—त्रिंबकजी, तुह्मी सांगतां हें सर्व खरें आहे; परंतु ह्या बायकांच्या समजुती आहेत. त्यांजकडे लक्ष दिलें पाहिजे. कांहीं गोष्टी त्यांच्या खऱ्या आहेत. तुह्मी गृहस्थ आहां. तुमच्या वडिलांचा मोठा नांवलौकिक आहे आणि तुमची मुलगी आठनऊ वर्षांची वाढावी, हें ठीक नव्हे, असें तर माझ्या बुद्धीस वाटतें.

चि०—ठीक बोललेत, रामभटजी; मी एवढेंच सांगत्यें. परंतु यांच्या मनांत ती गोष्ट भरत नाहीं. पाहा बरें. लग्न झालें ह्मणजे चार गृहस्थ आपल्या घरीं येतील, व नाचतमासे होतील, तेव्हां आह्मांला चौघांमध्यें लोक विचारतील. नाहीं तर कोणास कोण विचारतो ?

रा०—तुमचें म्हणणें सगळें खरें आहे, आणि यजमानांचेंही ह्मणणें खरें आहे; परंतु त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें आतां चालून उपयोग नाहीं. (त्रिंबकजीस) त्रिंबकजी ! कां विचारांत पडलां ? ध्याच परतें मनावर. आतां मुलगा मोठा झाला ह्मणजे तुह्मांला पुढें लग्न करणें कठीण पडेल. आज तुमच्या नांवावर कोणी सहज त्याला मुलगी देईल, असें माझ्या बुद्धीस येतें, याउपर तुमची मर्जी. मला तर असें वाटतें कीं, चिमाबाई जें सांगतात, तें वास्तविक आहे.

त्रिं०—रामभटजी, तुह्मी पाहा, दोन लग्नें झटलीं ह्मणजे किमानपक्ष दोन हजार रुपये पाहिजेत, तर आज एवढी रकम कोठून आणावी ? जर एखाद्यापासून कर्ज काढिलें, तर तें फिटेल तरी कसें ? हीं काय खायाचीं कामें आहेत ? लग्नास आज प्रारंभ केला, तर मी मोठ्याच घोरांत पडेन, असें मला वाटतें.

रा०—कोणतेंहि कार्य करावयास उभें राहिलें, ह्मणजे हजारों अडचणी आहेतच. परंतु अडचणी आल्या म्हणून धैर्य सोडतां कामा नये. लग्नांत मुंजींत कर्ज काढलें असतां तें राहत नाहीं. कोठचें कोठेंच फिटून जातें, आणि आपलें कार्य होऊन जातें. तुह्मी पाद्रीच्या कल्पना काढून भित्रेपणानें भलतेंच केलें, तर तुमच्या मुलांचें कल्याण होणार नाहीं. अलीकडील परमहंस लोकांच्या मताप्रमाणें विचार करणें तुमच्यासारख्या सुज्ञ गृहस्थांस योग्य नाहीं.

चि०—रामभटजी, तुह्मीच हें एवढें मनावर ध्या आणि उद्यां सकाळीं या दोघांचीं यादवानें घेऊन जा, आणि शामरावाच्या मुलाचें यादवान आणून पाहा. त्याच्या मनांत आमची मुलगी करावयाची आहे, आणि बाजीरावाच्या घरीं जाऊन

त्याची मुलगी आमच्या बाळास देईल असें करा; ती चांगली आहे. तिला नुकतें सहावें वर्ष लागलें आहे. एवढें पार पाडाल, तर तुह्मांला पैठणी पागोटें बांधीन.

रा०—ठीक, ठीक. चांगली सोयरीक शोधून काढली. दोन्ही जोडीं चांगलीं शोभतील. तीं दोन्ही घराणीं चांगलीं साळसूद आहेत. तुह्मांसाठीं मेहनत करणें हें माझें काम. तुह्मी कार्य करायास मात्र उभे राहा, ह्मणजे झालें. (असें ह्मणून दोन्ही जन्मपत्रिका रामभटजी घेऊन जातो.)

चि०—(नवऱ्यास) तुह्मी उगाच विचारांत पडूं नका. एकदां कार्य करून घ्या. पैशाविषयीं कां काळजी करितां? आपला नाथा मारवाडी मी सांगितलें असतां दोन हजार रुपये सहज कर्जी देईल. बाळा, जा रे, त्या नाथास मी बोलाविलें, ह्मणून सांग.



## प्रवेश २

त्रिंबकजी—(नाथाजी येतात.) आवो नाथाजी, बेसो.

चिमाबाई—(पुढें सरसावून) काय रे नाथा, आमच्या ताईचें आणि बाळाचें लगन करावयाचें. तूं कांहीं मदत करशील ना?

नाथा—हूं तो तुमच्या च्याकरीस हजीर आहों. में तो तुमच्या पडोशी राहाते. में तो तुमच्या काम अगोदर करशेल.

त्रिं०—नाथाजी, अमुने तो बे हजार रुपयांनीं गरज छे.

ना०—ठीक छे, शेठ, बे हजार तो शुं, चार हजार लेवोनी, मारे पासेथी कंई नन्नो छे? पण एटलूंच के कई घेरेणुं सुन्नाना दागिना मुको, नहीं तो बापूजीनें जामीन आपो.

चि०—सूं रे नाथा, तूं आह्मांला ओळखत नाहींस रे? बापुजी तो मोठा माणूस, त्याशीं आमशीं काय लागतें? तो आमच्यासाठीं कसा जामीन राहील? दागिने असते तर मग तूंच कशास पाहिजेस? (असें बोलून थोडीशी खिन्न होऊन आपल्या पतीशीं कांहीं वेळ विचार करून बोलल्ये,) अरे नाथा; आमचा तुला विश्वास नाहीं? तुझे रुपये आह्मी खाऊन जाऊं कीं काय?

ना०—बाई, तमे मोठा लोक, माजे गरिबाचा पैसा ठकवूनशीं नई खाशेल, ये मनें पक्कूं खबर हाय. पण वखत है. रुप्यांचें काम, अने माझ्या घरांत काय रुप्ये पिकते? दुसऱ्याचे काढूनशीं तुमाला देवाचे. माजा पोटयाचा रुप्या होशेल, तो में तुमाला अशेच देशेल.

**चि०**—( आपल्या नवऱ्याजवळ जाऊन एकीकडेस ) नाथानें तर याप्रमाणें आपले हातपाय गाळून टाकिले. पुढें काय करावें ? आपल्यास तर यंदां हीं दोन्ही कार्यें करून घेतलींच पाहिजेत. काय होईल तें होवो.

**त्रिं०**—तूं सांगतेस तें सर्व खरें. पण तें करशील कसें ? मी आपले दांत पाडून देऊं कीं काय ? तुला सांगतों कीं, यंदांच्या वर्षांत तूं धर्मास स्वस्थ बैस. पुढें पाहतां येईल. परमेश्वर करील तर सर्व होईल. ईश्वराच्या मनांत आह्मांस सुखी करायाचें कारण असलें, तर तो कोठूनहि करील. परंतु दुसरा दूध पितो, ह्मणून आपण चुन्याचें पाणी पिलें, तर कसें होईल ? माझें एवढें तूं ऐक आणि यंदां ह्या भरीस पडूं नको. यांतच आमची अब्रू आहे.

**चि०**—खरें, एकदां लोकांस समजलें आणि आतां तें बंद पाडणें हें बरें नाहीं. सर्व गोष्टींत तुमचा भित्रेपणा, यामुळेंच तुह्मी आपल्या संसाराची नासाडी करून घेतली. तुह्मी उगीच राहा. पाहा, मी हीं दोन्ही कार्यें कशीं करून घेत्यें. ( नाथाकडेस तोंड फिरवून ) नाथा, हें आमचें घर गहाण ठेवून दोन हजार रुपये देशील काय ?

**ना०**—ठीक, ठीक. ये तो सुन्नामोर जेवी वात. बाईनो ध्यान बराबर पोतूं. पछी तो मारी कां ना छे ? तेवा तो दोन छोडूनसी तीन हजार रुपया मे देशेल. पण तुमच्या तीन जणांची रसीबपर सई दिला पाइजे.

**त्रिं०**—पण नाथा, तूं व्याज सूं लेसे ?

**नाथा**—में तुमच्या च्याकर. तमारी पासेथी काई वधारे लईस ? हमारे शिरस्तापरमाणें सवाईनो तमारी पासेथी लेवूं. येथी वधारे लेवूं ते अमुने हराम शे. तमारी गळानी सोगन.

**त्रिं०**—अरे, पण सवाईनुं व्याज एटले सूं थयूं ? एटलूं भारी व्याज ? आठ आणानूं तो तो घणुं थयूं. ये अमुने केम पालवे ?

**ना०**—शेट, तमारी मर्जी होय तो लेवो हूं कई तमारी उपर जुलूम करूं छूं ? मारी दुकानपर रुप्याना झाड नथी. ये तो सूं, सुन्नाना दागिनापर तो अमे सवाईनो व्याज लईयें. तमारी मोबतने लीधे तो मे तमुने वधारे कह्यूं नहीं.

**चि०**—( थोडीसी नवऱ्यावर वक्र होऊन ) पुरे. आतां व्याजाची फार चौकशी करूं नये. एवढा खर्च होणार, त्यामध्यें मेले शेंपन्नास रुपये जास्ती. मारवाड्यासारखें पैशाचें तोंड पाहून काय होतें ? नाथा, तूं आपले व्याजाचे रुपये काढून घेऊन दोन हजार रुपये दे. घराचें खत तुझ्या स्वाधीन करित्यें.

**ना०**—बाईनो धंदो घणो चोखो छे. त्रिंबकजी, तमे एमां कई समजता नथी. तमारी घणीयाणी घणीज खबरदार छे. ( असें ह्मणून तो निघून जातो. )



## प्रवेश ३

( दुसऱ्या दिवशीं रामभट येतो. )

**रामभट**—काय यजमानदादा, यंदां तुमचे ग्रह चांगले आहेत. आमचें पागोटें तयार झालें. ताईचें आणि बाळाचें लग्न यंदा चांगलें सजतें. ज्या गृहस्थांपाशीं तुह्मी मला पाठविलें होतें, तेही तुमच्याशीं सोयरीक करण्यास फार खुशी आहेत. यास विलंब अथवा अडथळा झाला, तर तुह्मांकडून मात्र व्हावा, त्यांजकडून कांहीं होणार नाहीं, एवढी खातरी असूं द्या. तुह्मी कां चिंतेंत पडलेत? कार्य कोठूनही होऊन जाईल. आलेला दिवस काय राहतो? तुह्मी उगीच घाबरतां.

**त्रिं०**—खरें, जेव्हां तुह्मी हें माझ्या गळयांतच घातलें, तेव्हां माझा बेइलाज; परंतु माझ्या मनांत आहे कीं, हीं दोन्ही कार्यें गरिबपणांत अगदीं साधीं करावीं. कांहीं वावगा खर्च करूं नये.

**रा०**—ठीक आहे; परंतु ही गोष्ट तुह्मी बाईकडेस काढा. आह्मा पुरुषांस कसेंहि चालतें. परंतु बायकांची हौस विशेष आहे. त्यांच्या मर्जीप्रमाणें कांहींतरी केलें पाहिजे.

**चि०**—काय ह्मणतां? लग्नाचें कृत्य, यांत वावगा खर्च तो काय? चार दागिने तर सुनेस आणि मुलीस केलेच पाहिजेत. साड्या चोळ्यांशिवाय लग्न व्हावयाचें नाहींच. नवऱ्यास पितांबर, रुप्याचें वाटें व तांब्या दिलाच पाहिजे. दुसरें काय? चांगला मांडव घालावा, चारपांच ताशांचे जोड असले आणि चांगलीशी एक नायकीण मांडवांत नाचायास व नवऱ्याबरोबर जायास असली ह्मणजे झालें, आणि जातीस दोनचार जेवणावळी द्याव्या, यांत वावगा खर्च तो कोणता? यांत कमी तें काय कराल? लोकांस जेवायास बोलावणार नाहीं? किंवा नारळ वांटणार नाहीं? लग्नांत अधिक खर्च तो काय? पैसे जमवून काय उरावर घेऊन जायाचें आहे?

**त्रिं०**—परंतु एवढा खर्च करायास तरी आपणाजवळ काय आहे? येऊनजाऊन सगळी इमारत घरावरतीं ना? तें गेलें ह्मणजे झालें. मग दाही दिशा मोकळ्या. माझ्या मनांत असें आहे कीं, थोडक्या लोकांस आमंत्रण करून नाचबीच कांहींच करूं नये. एक चौघडा आणावा व एक हवा असला, तर ताशांचा जोड असला

ह्मणजे झालें. उगीच बडेजाव कशास पाहिजे? कलावंतिणीचा नाच करणें व बराबर रस्त्यांतून तिला मिरवीत नेणें हेंहि मला योग्य दिसत नाहीं. आणि तशांत आपली गरिबी आहे. त्यांत शेंपन्नास रुपये व्यर्थ कां खर्चावे? आह्मी दिवसभर हेलकऱ्याप्रमाणें महिनाभर खपतों, तेव्हां कोठें पंधरा रुपडे दृष्टीस पडतात. आणि एकदोन तासासाठीं तीसचाळीस रुपये कां घालवावे?

चि०—ही चाल काय आजच चालू झाली आहे, कीं तुह्मी बंद कराल? लोकांप्रमाणें चालणें भाग आहे. नाच तर अवश्य केलाच पाहिजे. त्याशिवाय लग्नास शोभा येतच नाहीं. याविषयीं तुह्मी आपल्या व्याह्यांचें मत घ्या. त्याशिवाय कसें होईल? ते नवऱ्याच्याकडचे. जर त्यांनीं अड घेतली कीं, नाच पाहिजेच, तर तुमचें चालणार नाहीं. मग तुह्मांला करणें भागच आहे. तुह्मी उगीच राहा आणि आजपर्यंत चाललें आहे तसें करा. चाल मोडून कसें होईल?

("गतनुगतिको लोको न लोकः पारमार्थिकः")

---

## प्रवेश ४

चि०—(बाळाकडे तोंड फिरवून) जा रे, नाथाला बोलावून आण.

(बाळा जाऊन नाथास बोलावून आणितो आणि ह्मणतो,)

बाळा—हा नाथा आला.

चि०—कां रे नाथा, मग तूं काय केलें? तुझ्या भरंवशावर लग्नाची तयारी चालली आहे. ऐन वेळावर तूं आमची फजिती करणार काय?

ना०—माज्या तयारी हाय. में तुमला एकदां वचन दिला, तो काय खोटा कराच्या हाय? शेटचाच खोटी. तुमच्या घणी तो अशा कामला लय भिते. तुमच्या काम मला चांगला भावते.

चि०—(आपल्या मुलीशीं) ताई, जा गो, त्यांस मी बोलावतें ह्मणून सांग.

(ताई जाऊन बापास बोलाविते.)

त्रिं०—(खुर्चीवर बसतो. त्याजवळ बाळा आणि ताई उभीं आहेत आणि चिमाबाई मारवाड्याजवळ बोलते. इतक्यांत रामभट येतो.)

त्रिं०—या उपाध्येबावा, कसें काय?

रा०—ठीक आहे; आमच्या मुलाच्या मुंजीची तयारी झाली. लग्नास मुहूर्त

फाल्गुन वद्यांत दोनच आहेत, एक पंचमीचा व एक षष्ठीचा; या दोन्ही मुहूर्तांत तुह्मास कार्यें साधून घेतलीं पाहिजेत. पुढें होणार नाहींत. दुसरें, तुमच्या दोघां व्याह्यांचें मतही असेंच आहे. आतां आळस करूं नका. हिंमत धरा. 'हिंमत मर्दा, तो मदत खुदा' अशी एक ह्मण आहे.

(इतकें बोलून पलीकडे एका बाजूस जातो.)

त्रिं०--दिवस फार थोडे राहिले. नाथा, पछी ते दाडानूं सूं थयूं ?

ना०—सेठ, मारी तयारी छे. तमारी वास्ते तो आजे आठ दाडा थया, रक्कम तयार करीने राखेली छे. अने व्याज पण भरूं छूं. तमारूं खत लावो, चिठी लखी आपो, अने तेनीउपर तमारी अने तमारा धणीयाणीनी अने बाळजीनी सय आपो, एटले थयूं. पंधरसो रुपिया आपूं छूं, अने बे हजारनी चिठी लखी आपो. तेमा एक वरसनी मुदत अने बार आणानूं व्याज लखो.

त्रिं०—अरे, सवाईनुं व्याज कापीने लीधूंच, अने फरीथी चिठीमां बार आणानुं व्याज लखी आपूं ? ये शूं जुलूम छे ?

ना०—सेठ, तमे समजता नथी. सरकारनो शिरस्तो छे के व्याज लख्यावगर रसीब लखाय नहीं. ये अमस्तुं लखवानेवास्ते छे. हूं तमारे पासेथी कां लेऊं ? अने तमे कां आपवाना छो ? तमे ए वातनो कई सख राखसो मा.

चि०—(आपल्या नवऱ्याकडे तोंड फिरवून) तुह्मी नाथा सांगतो त्याप्रमाणें ऐकून, घ्या, आणि त्याला रशीब लिहून द्या आणि रुपये आजच्या आज पदरांत घ्या पाहूं. (नाथास) जा रे, रुपये घेऊनशीं ये. ते रसीब लिहून देतील.

(चिमाबाई खोलींत जाऊन घराचें खत आणि दुसरे कागद आणून आपल्या नवऱ्यापाशीं देत्ये. तो त्यांजकडे पाहून श्वास टाकितो. ती त्यास धीर देऊन ह्मणत्ये, 'असा काय तुमचा भित्रा स्वभाव ? रसीब लिहा.' मग तो रसीब लिहून तयार करितो.)

ना०—केम तमारी रसीब अने घेरनुं खत मने वचावा दे. (असें ह्मणून तो खत आणि रसीब घेऊन शेजारी वाचून घेण्यास जातो आणि अर्ध घटिकेंत रुपये घेऊन परत येतो, आणि त्रिंबकजींच्या स्वाधीन १,४०० रुपये करून चालता होतो.)

चि०—(रुपये पाहून आनंदभरित होत्साती नवऱ्यापाशीं हंसत हंसत बोलत्ये,) त्यांतून ३० तोळे सोनें सुनेस केलें पाहिजे, आणि २२ तोळे ताईस; १२ तोळ्यांचा

गोप बाळास तर हवाच. मला तुमचें कांहीं नको. एक २०० रुपयांची वाळी, आणि एक शाल घेऊन द्या, ह्मणजे झालें.

त्रिं०—(सद्गदित होऊन) झालें तर, इतक्यांतच सगळे रुपये संपतील. पुढें खर्चाचें कसें होईल? कापडचोपड, नारळ, वाजंत्री, दाणादुणा, शाकभाजी, इत्यादि किती खर्च आहे, तो कोठून होईल?

चि०—बाजारांतून चार दिवसांच्या मुदतीनें उधार आणावें. लोक असेंच करितात, तेव्हांच तीं कार्यें डौलानें होतात. तुमच्यासारिखे चिंता करीत बसतात काय? माध्या, जा रे, विठबशेटीस बोलावून आण, आतांच्या आतांच त्याला तुझ्याबरोबर घेऊन ये.

(माध्या विठबशेटीला घेऊन येतो. तो बाहेर बाकावर बसत आहे, इतक्यांत त्यास त्रिंबकराव बोलतो,)

त्रिं०—या विठबशेट, बसा, आमच्या बाळाच्या आणि ताईच्या लग्नाची तजवीज आहे, कांहीं दागिने केले पाहिजेत.

वि०—ठीक आहे. जे तुह्मांस पाहिजे असेल, तें करून देऊं. आह्मी चार असामी दुकानावर आहों.

चि०—विठबशेट, पाहा, ताईसाठीं १२ तोळयांच्या वांकी आणि १८ तोळयांची सरी करा. आणि बाळाचे बायकोस १२ तोळयांच्या बांगड्या, ८ तोळयांच्या पाटल्या आणि १० तोळयांचे वाळे; १२ तोळयांचा गोप बाळासाठीं केला पाहिजे. पाहा, चांगला घाट येऊं द्या हो. कुलीसाठीं दोन रुपये जाजती पडले तरी चिंता नाहीं. (असें ह्मणून १२०० रुपये सोनाराच्या स्वाधीन करित्ये. मग त्रिंबकराव आणि तो मिळून बाजारांत जाऊन सोनें खरेदी करून परत येतात.)

चि०—(सोनें पाहून हुशारी येऊन हंसत हंसत नवऱ्याशीं बोलत्ये,) मोठें काम तर पार पडलें, आतां पुढचें पुढें पाहतच आहों. आतां तुह्मी घरास तेल व चुना लावायास व मांडवाची तयारी करायास लागा. कासिम मांडव चांगला घालितो, पांच रुपये अधिक पडले तरी पडूं मेले. तात्याशेटच्या इकडे ३०० रुपये खर्चून किती चांगला मांडव घातला होता! पण चांगली झालर व कलाबतूचे गोंडे लावूं सांगा हो. नाहीं तर तुह्मी आपली वेंठ करून घ्याल. करावें तर चौघे शाबास ह्मणतील, असें करावें. पैसे मेले येतील किती आणि जातील किती.

(असें भाषण होत आहे, इतक्यांत रामभट येतात.)

रा०—काय यजमान, आतां थोडे दिवस राहिले. तयारी चालली आहे ना?

तुमचे दोघेही व्याही आतां येथें येणार आहेत, त्यांजजवळ जें तुह्मांस बोलायाचें असेल, तें बोलून घ्या. ही घ्या आमची याद.

त्रिं०—काय रामभटजी, काय हो ? तुह्मी बरीच लांब याद केली आहे.

रा०—त्यांत कांहीं अधिक लिहिलें नाहीं. दोन्ही लग्नें मिळून सगळी साडेब्यायशीं रुपयांची याद आहे. भूयसी दक्षिणा मात्र लिहीली नाहीं. कारण कीं, ती तुह्मां दोघांकडून व्हावयाची. तुमच्या शक्तीप्रमाणेंच याद केली आहे बरें.

(इतक्यांत शामराव आणि बाजीराव, हे दोघे व्याही बोलत बोलत घरांत येतात.)

त्रिं०—या व्याही, या. महाराज, महाराज, कसी काय न्यूझ् (खबर) ?

शा०—(मुलीचा सासरा,) रामभटजी, पंचमीचा मुहूर्त्त ठरला ना ?

रा०—होय. दुसरा मुहूर्त्तच नाहीं. कसेंही करून या मुहूर्त्तामध्यें आटोपून घेतलें पाहिजे.

शा०—(त्रिंबकजीकडे तोंड फिरवून) काय व्याही, तुमची कशी काय मर्जी आहे ?

त्रिं०—आह्मांला एकदां तुमच्या पदरांत घ्या ह्मणजे झालें. यंदां आमचा हात जरा ओढघस्त आहे, तर माझ्या मनांत खर्च बातबेतानें थोडाच करावयाचा आहे. थोड्याच घरांस आमंत्रण करून नाचबीच करूं नये व बाकीचा खर्च सगळा थोडक्यांतच आटोपावा.

शा०—ठीक आहे. आह्मी तरी कोठें इतके श्रीमंत लागून गेलों आहों ? ज्याचें त्याला ठाऊक आहे. त्रिंबकजी, 'घरोघर मातीच्या चुली,' 'दुरून डोंगर साजरे;' दुसरें काय ? परंतु अगदींच संपुष्टांत आणलें तर कसें होईल ? आमचा चौघामध्यें लौकिक आहे त्याप्रमाणें कांहींतरी केलें पाहिजे ! 'नासून घ्यावे परंतु हांसून घेऊं नये.' नाच तर पहिल्यानें पाहिजे. आमचा जांवई व मोठी मुलगी तर हें कबूल करणारच नाहीं. त्याचे चौघे दोस्तदार लग्नास येतील, तर चांगला ताफा असल्याशिवाय लग्न तें कसचें कराल ? दुसरें, शेंपन्नास रुपयांचें तोंड पाहून थोडेच लोकांस नारळ वाटणें हेंही ठीक नाहीं. आमची घरकरीण तर हें अगदींच कबूल करणार नाहीं. पाहिजे असल्यास तुह्मी एकादें जेवण कमी करा. पण यांत कांहीं कसर काढूं नका.

बाजीराव०—(मुलाचा सासरा,) ठीक ठीक. त्रिंबकरावजी, तुह्मी भलत्याच नव्या चाली काढूं नका. चौघांच्या रीतीप्रमाणें तुह्माला चाललें पाहिजे. उगीच नवीन

इंग्रजी शिकलेल्या लोकांचीं मतें घेऊन चौघांमध्यें फजिती मात्र करून घ्याल. तुमचा हात ओढघस्त आहे हें आम्हांस ठाऊक आहे. परंतु त्यांतहि सारासार पाहून वडिलोपार्जित जी चाल चालत आली आहे ती चालविलीच पाहिजे. कां शामरावजी, असेंच ना ?

शा०—वा, चांगले बोललेत. त्रिंबकजी, तुह्मी तयारी ठेवा, आतां येतो. दहा वाजाला आले. बरें, आह्मी येतों. ( उठून जाऊं लागतात. )

त्रिं०—बरें तर, तुमच्यापुढें मी लाचार आहें. तुमच्यापुढें माझ्यानें कांहीं अधिक बोलवत नाहीं. माध्या, तंबाकू भरून आण रे.

( मग तंबाकू ओढून व्याही व उपाध्या हे निघून जातात आणि त्रिंबकजी घरांत येतात. )

चि०—काय ? व्याह्यांचें व तुमचें काय भाषण चाललें होतें ?

त्रिं०—भाषण काय ? ते सांगतील तें ऐकणें आह्मांस भाग आहे. त्यांचें ह्मणणें असें कीं, लोकरीतीप्रमाणें सगळें केलें पाहिजे. नाच तर प्रथम असलाच पाहिजे. त्यांचे-पुढें आमचें काय चालतें ?

चि०—ते सांगतात, तें ठीकच आहे. तुमचें काय भलतेंच. बरें, तुह्मी आतां बाजारांत जाऊन सामानसुमान उधार घेऊन या.

त्रिं०—बाजारांत जाऊन करूं तरी काय ? तुला सगळ्याची उतावळ. बरें, आतां पाहिजे तरी काय, तें सांग.

चि०—३००० नारळ, पैठणी ४ पागोटीं, चिरड्या ४, ८ जरीचे खण, मोठीं लुगडीं ५, मला एक ल्हाय, मुलीला एक जरीची साडी, जांवयजीला एक जरीचा पितांबर, २ धोतरजोडे, ८ मण तूप, ६ मण साकर, ४ फरे तांदूळ १ फरा गहूं, १॥ फरा चणे.

त्रिं०—हें तर पांचसहाशें रुपयांचे सामान झालें. एवढें मला कोण पिरेल ? हें पुढें कसें फिटेल ?

चि०—आतां पुढची काळजी धरून बसूं नका. परमेश्वर कसें तरी पार पाडील.

( त्रिंबकराव बाजारांत जाऊन व्यापारी लोकांचें आर्जव करून ते सांगतील, त्या दरानें सर्व सामान घेऊन येतो. मारवाड्याकडे बाकी १०० शंभर रुपये राहिले होते, त्यांतील ५० जुन्या बाकींत वजा करून त्यानें ५० रुपये दिले, ते मात्र घरांत शिलकी आहेत. पंचमीच्या दिवशीं मुलीचें लग्न झालें, तेव्हां त्या ५० रुपयांतून २० रुपये

नायकिणीस देऊन तिची रवानगी केली. ब्राह्मणांच्या दक्षिणेविषयीं उपाध्या थोडीशी कटकट करीत आहे, इतक्यांत १। रुपयाचा खुर्दा आणून भटांच्या स्वाधीन करून त्रिंबकराव उपाध्यास सांगतो कीं, 'एवढ्यांतच आटोपा, आतां मला त्रास देऊं नका.' मग उपाध्या दहापंधरा आसामींस दिडकी, दोन दिडक्या अशी दक्षिणा देऊन बाकी राहिलेले आपल्या पंचांत बांधून ठेवितो. मग वरातीची तयारी झाल्यावर वरात निघते.



## प्रवेश ५

(दुसऱ्या दिवशीं बाळाचें लग्न. ताशेवाले, इंग्रजी बाजा, नायकिणीची तयारी.)

**चि०**—(त्रिंबकरावास) आज पांच ताशांचे जोड आणि इंग्रजी बाजा आणला पाहिजे, हां! बाळाची फार हौस आहे कीं, इंग्रजी बाजा आणावा.

**त्रिं०**—तूं काय मांडलें आहेस, तें मला समजत नाहीं. बाजेवाले लोक तर इतके चढून बसले आहेत कीं, २० रुपयांखालीं बोलतच नाहींत. मला तर कांहींच सुचत नाहीं. तूं पाहिजे तें कर.

**चि०**—सोकर, जा रे, तूं माझें एवढें काम कर. बाजेवाला, ताफा, पंधरा गाड्या पांच साजाचे घोडे, आणि गलासवाला यांचा बंदोबस्त तुला राखला पाहिजे.

**सोकर०**—(बाहेरून येऊन त्रिंबकरावास सांगतो,) काका, आज तर नायकिणी आणि ग्यांडवाले एवढे चढले आहेत कीं, कांहीं बोलतां नये. मी तर आज पांचसहा रांडांचीं घरें फिरून दमलों. कोणी ६० रु. मागते, कोणी ५०, याखालीं बोलतच नाहीं. शेवटीं गुलाबीस मोठ्या शर्तीनें ४० रु. ठरवून तिला विडा देऊन आलों.

(त्रिंबकशेट आणि बाजीराव हे दोघेजण व्याह्याला घेऊन मोठ्या मोठ्या लोकांस 'बराबरोबर यावें' ह्मणून मोठ्या आर्जवानें विनंति करून घरीं येतात.)

**चि०**—बरें, सगळें झालें; परंतु वरावर घालायास दागिने व शेला अजून आणले नाहींत. त्याला तोडे, मोत्यांची कंठी हीं कोणाचीं तरी मागून आणलीं पाहिजेत. आतां माझे ओळखीचें घर तर एकहि राहिलें नाहीं. आज पंधरा दिवस लोकांच्या दारोदार फिरून फिरून मी माझ्या आंगावरचे सगळे दागिने आणिले. आतां तुमचे कोणी मोठे ओळखीचे लोक असतील, त्यांजकडून एवढे दागिने अगत्य आणले पाहिजेत.

त्रिं०—( थोडासा रागें भरून ) तूं एकूण सर्वस्वीं माझ्या पाठीस लागली आहेस. आतां दागिन्यांसाठीं कोणाचें आर्जव आणि खुशामत करूं! जळो हा संसार. मला तर कंटाळा आला.

चि०—शुभकार्यांत तोंडांतून भलतेंच बोलूं नका. एकदोन वस्तु आणायास तुह्मांस भारी पडलें? मी तर एका कापाच्या जोडीसाठीं पांचदहा घरें फिरून लोकांची मी किती काकळूत केली! शेवटीं त्या बिचाऱ्या येसूबाईनें माझा शब्द खालीं पडूं दिला नाहीं. आज मी घरांत दहा हजारांचे दागिने आणिले आहेत.

( शेवटीं त्रिंबकराव एकदोन गृहस्थांस बरोबर घेऊन रामदासाला त्या गृहस्थांची भिड घालून मोठें आर्जव करून मोत्यांची कंठी वगैरे दागिने घेऊन चिमाबाईच्या स्वाधीन करितो. ते पाहून चिमाबाई मोठ्या आनंदानें ज्या बायका जमलेल्या होत्या, त्यांस ते दागिने दाखवून आपल्या नवऱ्याच्या मोठमोठ्या ओळखीविषयीं बढाई सांगत्ये. इतक्यांत तेथें त्रिंबकराव येतो. )

त्रिं०—बरें बरें, आतां पुरे कर. दुसरें काम करायाचें, तें पाह. ह्या बायकांच्या नादीं लागून परिणाम नाहीं.

( पुण्याहवाचन, नवग्रहहोम आटपून जेवणें झालीं. लोक वरघोड्याबरोबर जायास येतात, इतक्यांत चिमाबाई दरवाजापाशीं येऊन बोलती. )

चि०—सोकर, अरे, अजून माळी कोणीच आला नाहीं काय रे? बायका तर जमल्या. आज पांचसहा रुपयांच्या तरी वेण्या पाहिजेत, नाहीं तर लोकांचा जन्मभर ठपका राहील. ( असें ह्मणून माध्यास आणि सोन्यास रस्त्यावर माळी आणायास पाठवित्ये. ते माळी घेऊन येतात. )

चि०—( माळ्यास ) काय रे सदू, कशा रे दिल्या वेण्या?

सदू०—काय सांगावें बाई, आज तर बोलवत नाहीं. आज बागांत फूलच मिळत नाहीं. पाहा, ह्या वेण्या साडेतीन आणे, आणि त्या चार आणे आणि कलाबतूच्या पाहिजे असल्यास साडेसहा आणे; तुह्मांस परवडेल तर घ्या, नाहीं तर मला जाऊं द्या. ( नंतर चिमाबाईनें मोठी खटपट करून त्यांतून आठ रुपयांच्या वेण्या घेऊन सर्व बायकांस दिल्या, आणि आपण दोन कलाबतूच्या सहा सहा आणे ठरवून माथ्यांत घातल्या. ) ( नवरा घोड्यावर बसायाची तयारी होते. इतक्यांत रामचंद्रशेट येऊन बाजीरावास बोलतो. )

**रामचंद्रशेट**—काय हो, वराची तयारी झाली, तुमच्या ताफ्यांचें अजून ठिकाण नाहीं.

**त्रिं०**—सोकर, जा बा, जा. त्या नायकिणी कोठें पोंचल्या पाहा. त्या रांडांचे असेच ढंग. ( सोकर धांवत धांवत जातो; तों गुलाबी तयार होऊन पानसुपारी खात बसली आहे. )

**गुलाबी**—( सोकरजीस ) या शेट, या पानसुपारी खा.

**सोकर**—या वेळीं पानसुपारी कसची ? आतां वखत राहिला नाहीं, गृहस्थ जमले आहेत. चाल चाल लवकर.

**गुलाबी**—पण पालखी आली नाहीं. मी कसें करूं ? तुह्मी लवकर पालखीची सोय कराल, तर बरें होईल.

( सोकर काळबादेवीच्या रस्त्यावर येऊन पालखी घेऊन जातो. मग गुलाबी तींत बसून येत्ये आणि मिरवत मिरवत वराबरोबर जात्ये. लग्न आटोपून वरात घरीं आल्यावर गुलाबीची बिदागी करायाचे वेळीं रुपयांची अडचण असल्यामुळें जिकडून तिकडून रुपये गोळा करून तिची बिदागी करून देतात. मग दोनचार दिवस जेवणसमारंभ होऊन लग्न संपलें. )

**चिं०**—( चिमाबाई दुसरे दिवशीं सकाळच्या प्रहरीं उठून लोकांचे दागिने जायांचे आणिले होते, ते पोहोंचविण्यासाठीं शालबील घेऊन एक एक डागिना बाहेर काढित्ये. तों आंत एक काप सांपडत नाहींसा झाला. तें पाहून ती मोठी घाबरी होऊन इकडेतिकडे शोधित्ये; व चाकरांवर रागें भरत्ये, व थोडीशी रडत्ये; आणि आपल्या नवऱ्यास हाक मारित्ये, ) ऐकिलें ? जरा इकडे येऊन जावें.

**त्रिं०**—( मोठ्या त्वरेनें ) काय ? काय झालें ?

**चिं०**—यांत एक काप नाहीं. मी सर्व शोधून चुकल्यें; आतां मोठा घात झाला. मी येसूबाईला तोंड कसें दाखवूं ? तिचे १,५०० रुपयांचे काप. आतां ती मला काय ह्मणेल, तें मला ठाऊक नाहीं. हे मारुति, हा काप सांपडला, तर येत्ये शनवारीं तुला मी दिडकीचा तेलशेंदूर वाहीन, आणि एका नारळाची शिरोणी वांटीन. या दुःखांतून मला सोडीव. ( असें ह्मणून डोळयांत आसवें आणून उगीच बसत्ये. )

**त्रिं०**—( ते बायकोचे शब्द ऐकून घाबरा होऊन ह्मणतो, ) ठीक, झालें तुझ्या मनासारिखें, केली माझ्या जिवाची होळी. बस आतां स्वस्थ. मी आपलें तोंड घेऊन कोठें तरी निघून जातों, ह्मणजे झालें.

(याप्रमाणें बारा वाजेपर्यंत घरांत लोकांची गर्दी व एकच घोळ होऊन गेला. चिमाबाई एका ठिकाणीं रडत बसली आहे. कोणी जाऊन पंचाक्षऱ्याला आणितात, कोणी भक्ताला बोलावितात, कोणी एक बाणकोटी आणून त्यावर देव आणितात. इतक्यांत ही बातमी ऐकून येसूबाई गाडींत बसून तेथें येत्ये.)

**येसूबाई०**—चिमाबाई; माझे काप कोठें आहेत?

**चि०**—(घाबरत घाबरत) काय सांगू बाई! जिकडून तिकडून आमचें दैव धांवतें. (असें ह्मणून झालेलें वर्तमान तिला सांगत्ये आणि तिचे पाय धरून ह्मणत्ये,) तुह्मी चार दिवस धीर धरा. मी तुमचा काप भरून देतें. मी आपला जीव विकीन, पण तुमचा काप देईन.

**ये०**—(तें ऐकून) मी हें तें कांहीं जाणत नाहीं. माझा काप मला पाहिजे. तसे मोत्यांचे दाणे आज मिळतात कोठें? माझे ते पूर्वीचे काप. कोठें रे मी इच्या नादीं लागलें! पाहिलें? कोणाचें बरें करावें, तर असें होतें.

(मग चारपांच सभ्य गृहस्थ जमून तिची समजूत पाडितात. त्रिंबकरावाकडून तिला दीड महिन्याची मुदत करितात, व कापाच्या किंमतीचें खत लिहून देववितात. तें घेऊन चुरमुरत चुरमुरत ती गाडींत बसून निघून जात्ये.)

**('आदापेक्षां खर्च मोठा। त्याला होई सदा तोटा.')**

---

## प्रवेश ६

(लग्न झाल्यावर पांचसहा दिवसांनीं आदितवारीं सकाळीं भिवा वांजत्री, ताशेवाले, सदू माळी, उद्धवजी नारळवाला, हरजीवन तूपवाला, आनंदजी कापडवाला, तुरेवाला, हिलालवाला, गलासवाला असे एकामागें एक येऊन जमतात. मग कांहीं वेळानें त्रिंबकजी तोंड धुवून खुर्चीवर येऊन बसतो. मग एकएकास रामराम करून 'पुढच्या मोस्तरावर या' ह्मणून वायदा करतो.)

**भिवावाजंत्री**—शेट, आमचा हिसाब तर करा.

**त्रिं०**—तुमचें काय झालें?

**भि०**—आमचे १० दिवस आणि ताशेवाल्यांचे ५ दिवस, मिळून सगळे साडेपंचेचाळीस रुपये झाले. आमचा आजचे आज निकाल करा. वाजंत्र्यांच्या पैशास कोठें वायदा आहे? एवढा तुह्मी खर्च केलात, तर आमचे पैसे कां ठेवितां? ह्या

ताशेवाल्यांनीं आज चार दिवस माझा जीव खाल्ला. शेट, तुह्मी कांहीं तरी करा आणि आज आमचा निकाल करून टाका. उगाच आह्मांस तसदी देऊं नका.

त्रिं०—बरें जा, आज जा. फार बोलूं नको. मी लवकरच तुझे रुपये देईन, ह्मणजे झालें ना ? जा, बडबड करूं नको.

भि०—मी आतां जातों. उद्यां सकाळीं येईन. रामराम.

उद्धवजी—( नारळवाला, ) त्रिंबकशेट, तमे हमारो निकाल जलदी करो, तो ठीक छे, नहीं तो हमारी अब्रू रहेवानी नहीं. अमे नाणूं लईने नार्यळ आपिये, पण तमारी मोबतने लिधे तमने आठ दाहाडांनी मुदत आपी, अने आज दस दाहडा थया, तो पण तमारा ध्यानमां आवतूं नथी. एक काम तमुने ठीक नथी, हवे तमे जाणजो.

त्रिं०—उद्धवजी, तमे फकर करसो मा. तमारा रुपया आवता मोस्तरपर खामों-खाम आपीस. ( त्याच्या दाढीस हात लावून ) हमणां जावो तमे. रुपयांनी कहीं फकर करता ना.

रामभट—( चिमाबाईस दुसरे दिवशीं संध्याकाळीं ) बाईसाहेब, तेवढे पागोटीची तजवीज कराल, तर बरें होईल. मुलाच्या मुंजीकरितां मी दोनचार दिवसांनीं गांवीं जायाचा बेत करितों. तेवढें श्रेय घ्याच परतें.

चि०—(थोडीशी रागानें) काय रामभटजी ? तुह्मांला घाय कसची लागली आहे ? वीसपंचवीस रुपड्यांचें पागोटें तें काय मेलें; आणि तुह्मी सर्व दिवसभर कर्जदारासारिखे मागत काय बसतां ? धीर धरा ! उद्यां बाळाला चाकरी लागूं द्या. नाहींतर त्याला मुलगा झाला ह्मणजे तुह्मांला एकदम एक हलवान ( शाल ) देईन, ह्मणजे तरी तुह्मी खुशी व्हाल ना ?

रा०—( असे यजमानीनबाईचे शब्द ऐकून रामभट कांहीं वेळ स्तब्ध राहिला, आणि जातेवेळीं खालीं तोंड घालून ह्मणाला. ) बरें बाई, तुमची मर्जी. आमचा गरिबांचा काय जोरा चालतो ? परंतु ‘ काम सरो आणि वैद्य मरो,’ असें मात्र होऊं नये ह्मणजे झालें.

( याप्रमाणें मागणारांनी पांचदहा खेपा घातल्या, परंतु त्यांचा कांहीं निकाल होत नाहीं, असें पाहून अनेक तऱ्हेच्या गाळीशिव्या देऊन जातात. त्रिंबकजी घरांत खोली-मध्यें बसून मुलांस व बायकोस सांगतो, “ मला कोणी विचारायास आलें असतां मी घरांत नाहीं ह्मणून सांगा. ” तथापि नेहमीं पाठीशीं तगादे येत चालले. शेवटीं बाळाच्या गळयांतील २०० रुपयांचा गोप १५० रुपयांस गहाण ठेऊन वाजंत्र्यांस आणि नारळवा-ल्यास रुपये दिले. )

आनंदजी—( चिमाबाईस ) केम बाई, शेट कां छे ?

चि०—( खोटें बोलत्ये, ) ते बाहेर गेले.

बाळा०—( हळूच आपल्या आईस सांगतो. ) बाबा घरांत आहे, तूं लबाडी कां सांगत्येस ?

चिं०—( त्याजवर रागें भरून ) उगा बस. फार शहाणा होऊं नको. रोज रोज खरें बोलून कोठें जायाचें आहे ?

( याप्रमाणें कांहीं दिवस गेल्यावर त्रिंबकरावाचा बेइलाज होऊन बायकोस सांगतो, ‘ आतां दुसरा इलाज नाहीं. ताईच्या हातांतील पाटल्या मागून घे. त्या मारवाड्यापाशीं ठेवून थोडे थोडे रुपये कर्जदारांस देऊं ह्मणजे तरी चार दिवस लोटतील.’ तेव्हां चिमाबाई घटका दोन घटका नाहीं होय करून, शेवटीं कबूल करत्ये. )

त्रिं०—( एक दोन दिवसांनीं आपल्या बायकोस ) पहा, ताईच्या पाटल्या चार दिवसांसाठीं मागून घे.

चि०—काय सांगतां ? मुलीच्या हातांतील पाटल्या देऊं ? आणि मग ती काय करील ? तुमचा डोळा येऊन जाऊन घरांत दृष्टीस पडेल, त्यावर आहे.

त्रिं०—तूं मला काय करायास सांगत्येस ? दुसरें तरी आतां घरांत काय राहिलें आहे ? कर्जदार मला दुःख देतात, त्यांला मी काय देऊं ? तुला सगळ्या गोष्टीची घाई. माझा एकदां जीव घे, ह्मणजे झालें. मला काय या गोष्टीचें सुख आहे ? परंतु दैवीं आलें त्यास काय करावें ?

चि०—तें कांहीं असो, मी तर घरांतला दागिना तुह्मांला देणार नाहीं. मुलीच्या आंगावरील दागिना देऊं आणि जन्मभर तिला जाचांत पाडूं ?

त्रिं०—आतां तूं मला फार छळूं नको, माझा बेइलाज आहे. कर्जदार माझी रस्त्यांत बेअब्रू करितील, यावर तूं कांहीं लक्ष दे. मी तिच्या पाटल्या फार दिवस ठेवणार नाहीं. मी एकदोन दोस्तदारांस सांगितलें आहे, त्यांणीं मला ६०, ७० रुपयांची नवी चाकरी देण्याचें कबूल केलें आहे. तें काम झालें, ह्मणजे शेंदीडशें रुपये भरून केव्हांच पाटल्या सोडून आणूं. तूं काळजी करूं नको.

चि०—बरें तर. पण पहा हो ! तिच्या पाटल्या फार दिवस ठेवूं नका.

त्रिं०—नाहीं ह्मटल्यावर—

( चिमाबाई ताईस हाक मारून एकीकडे नेऊन तिच्या पाटल्या मागत्ये. )

**ता०**—( जरा घाबरून ) कां, कां ?

**चि०**—तूं दे. घाबरतीस कां ? कोणाला दिल्ह्या पाहिजेत ? थोडक्या दिवसांत तो आणून देईल.

**ता०**—पण मला सासऱ्यां गेलें पाहिजे. तेव्हां सासू रागें भरेल.

**चि०**—तें आह्मांस ठाऊक नाहीं ? तुझे लेंकराचे आह्मी हाल करायास देऊं ?

( मग ताई आपले डोळे पुसीत पुसीत पाटल्या काढून देत्ये. चिमाबाई त्या आठ तोळ्यांच्या पाटल्या आणून आपल्या नवऱ्याच्या स्वाधीन करत्ये, तो त्या मारवाड्यापाशीं १०० रुपयांस गहाण ठेवून आनंदजीस व दुसऱ्या कर्जदारांस थोडे थोडे रुपये देऊन त्यांस थंड करितो. ताईस सासू बोलवायास पाठवित्ये. ती गेल्यावर तिच्या हातांत पाटल्या नाहींतशा पाहून तिला रागानें माहेरीं पाठवून देत्ये आणि सांगत्ये कीं, ‘ पाटल्या घातल्याशिवाय माझ्या घरीं येऊं नको. ’ असे कठोर शब्द ऐकून ताई रडत परत घरीं येत्ये. मग आई तिला ‘ चार दिवसांनीं तुझ्या पाटल्या देईन ’ ह्मणून समजावित्ये. दिवसें दिवस त्रिंबकरावास कर्जदारांचा फारच तगादा लागतो. नाथा मारवाडी तर नेहमी घरांत येऊन कटकट करितो. शेवटीं चिमाबाई आपल्या नवऱ्यास मसलत सांगत्ये कीं, ‘ तुह्मी ला ( नादारीचा हुकूम ) घ्या. ’ त्रिंबकजी मारवाड्यास कांहीं दिवसांचा वायदा करितो. मारवाड्यांच्या रुपयांशिवाय त्याचें कर्ज १३५० रुपये बाकी ! शेवटीं त्रिंबकराव नादारींत अर्ज देतो. इकडे हपिसांत फार दिवस गैरहजीर असल्यामुळें चाकरीवरून बरतर्फी मिळते. मग घरीं येऊन मोठ्या काळजीनें श्वासोश्वास टाकितो. शेवटीं मारवाडी नोकर पाठवितो कीं, ‘ घर खालीं करा. ’ मग त्रिंबकराव मोठा दुःखी होत्साता दुसरें भाड्याचें घर शोधीत शिमाच्या बेड्यांत १॥ रु. भाडें ठरवून जाऊन राहतो, आणि मारवाड्याचे स्वाधीन घर करितो. इकडे दोन महिन्यांची फी तुंबल्यामुळें बाळास सोसायटींतून काढलें. तेव्हां बाळा तोंड वांकडें करीत घरीं येतो. सर्व पाहून त्रिंबकरावास फार दुःख होतें. )

**त्रिं०**—( आपल्या बायकोस ) पाहिलेंस ? लग्नें झालीं, आतां तूं सुखी झालीसना ? घर गेलें, चाकरी गेली आणि बाळाचा विद्याभ्यासहि बुडाला. लोकांमध्यें पत नाहींशी झाली. ज्याह्यांच्या घरीं जावें. तर कोणी विचारीत देखील नाहीं. बाजारांत कोणी कवडीस धिरत नाहीं. एवढे हाल तुझें ऐकिल्यावरून झाले. )

**चि०**—बरें, झालें तें झालें. दैवापुढें कोणाचा उपाय ?

**त्रिं०**—ठीक. जाणून बुजून आगींत उडी मारावी आणि मग दवावर हवाला द्यावा ! मनुष्य सर्व दुःखें आपल्या अविचारानें भोगितो, हें तुला अजून समजत नाहीं ?

पहा, लग्नें होण्याचे पूर्वी आह्मी किती सुखी होतों ? आणि आतां आमचे हाल किती झाले ? बरें, आतां आपल्या बाळाचें शिकणें कसें होईल ?

चि०—आतां त्याला काय शिकायाचें आहे ? त्याचें थर्ड रीडिंग (तिसरें पुस्तक) झालें. आतां त्याला कोठें हपिसांत पाठवूं ह्मणजे झालें. सकाळीं त्याच्या सासऱ्यास जाऊन सांगा कीं, त्याला पहिल्या तारखेपासून आपल्या हपिसांत घेऊन जा, ह्मणजे तो कांहीं हुशार होईल. आणि दाहा रुपयांची चाकरी करील. मग आमचें नशीब उघडलें तर उघडलें.

त्रिं०—होय, आतां व्याह्याचें आर्जव करून खालीं मुंडी घालून पोट भरावें. (असा विचार करीत करीत व्याह्यांच्या घरीं जातो.)

बा०—(मुलाचा सासरा) त्रिंबकराव, या; कोठून आलां ? कशी काय खबर ?

त्रिं०—ठीक. सहज आपले भेटीस आलों होतों.

बा०—कांहीं बोलायाचें आहे काय ?

त्रिं०—कांहीं नाहीं. आमच्या बाळाची कांहीं तरी सोई कराल, तर बरें होईल.

बा०—काय ? आमचे जांवईजी ! ते सोसाइटींत जातात ना ? इस्पेलिंग, गुणाकार, भागाकार चांगला येतो त्यांला ? चार महिने चांगलें शिकूं द्या, मग पुढें कांहीं पाहूं. चाकऱ्या काय खायाचीं कामें आहेत ?

त्रिं०—तो काय शिकतो, तें मला ठाऊक नाहीं. पण तो थर्ड रीडिंग बुक वाचतो.

बा०—काय ? त्रिंबकजी, तुह्माला बोलावें तरी काय आतां ? थर्ड रीडिंग वाचतो काय आणि चाकरी लावा ती काय ? आतां काय मागचे दिवस आहेत ? चाकऱ्या काय वाटेवर पडल्या आहेत ? दहा रुपयांची जागा असली, तर तीवर किती उड्या पडतात. सोसाइटींत हुशार झालेले मुलगे किती रखडतात. कित्येक इतके हुशार आहेत कीं, सहासहा आंकड्यांचा गुणाकार तेव्हांच करितात. तुह्मी त्याला शाळेंतून कां काढिला ? वर्ष सहा महिने तरी त्याला शिकूं द्यायचा होता. तुह्माला दोन रुपये द्यायाचें भारी झालें होतें, तर मला तरी सांगावें होतें. मी भरले असते. तुह्मांला बोललें असतां वाईट वाटेल. असें तुमचें होतें, तर लग्न करायला कां पुढें झाले होतेत ? आतां पुढें त्या मुलीनें काय करावें ? नवऱ्यानें चार पैसे मिळविले, तर बायकोचा संसार.

त्रिं०—बाजीरावजी, जें नशिबांत होतें, तें झालें. आतां बोलून काय फळ ? आह्मांला दुःख मात्र होतें. पण तुह्मी एकदां त्याची कांहीं सोय करा. आज तुमचें चालतें आहे, कोठें घुशिवला तर तो घुसून जाईल.

बा०—बरें, आतां तुह्मी जा. संधी सांपडली असतां शिनोरला सांगून कांहीं करीन. पण त्याला घरीं बसल्या बसल्या चार दिवस अक्षर तर वळवूं द्या.

( व्याह्याचें असें भाषण ऐकून त्रिंबकराव उठून घरीं आला, आणि मोठा खिन्न होऊन ह्मणतो, ‘ परमेश्वरा, लोकांची खुशामत करून मोठेपणा मिरवणें व मिष्टान्न खाणें नको. मेहनत करून भाजीभाकरी खाऊन राहतात, ते आज किती सुखी ! अगदीं लहानपणीं मुलांचें लग्न करण्यांत किती त्रास आहे ! जे लोक कर्ज काढून बडेजावीनें लग्नें करितात, त्यांस धिःकार असो. )

असें ह्मणून हा पुढील श्लोक ह्मणतो :—

॥ यो गच्छत्यविचारेण स नरो विपदां पदम् ॥
॥ तस्माद्विचारः कर्तव्यो दुस्तरे प्राणसंकटे ॥

**समाप्त**



# DRAMATIC READINGS

# भोजनबंधु पानतंबाखू



हें

सुबोध नाटक

कै. गोविंद नारायण

ह्यांनीं रचिलें तें

त्यांचे चिरंजीव

नारायण गोविंद माडगांवकर

यांनीं

मुंबईमध्यें

"तत्त्वविवेचक" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें

आवृत्ति दुसरी



सन १८९१



किंमत ३ आणे

## सूचना

सुबोध व मनोरंजक असा एकाद्या उपयुक्त विषयावर लहानसा ग्रंथ रचून आमच्या देशबांधवांचीं मनें कशीं रिझवावीं, आणि त्यांमध्यें मराठी ग्रंथ वाचण्याची जिज्ञासा व विकत घेण्याची उमेद कशी उत्पन्न करावी, याचा विचार करीत मी एके दिवशीं सकाळच्या प्रहरीं ओटीवर बसलों होतों. इतक्यांत आमच्या घरामागून कित्येक गवळणी दूध विकायास निघाल्या. त्यांमागून त्यांचीं लहान लहान मुलें, अडीच वर्षांपासून पांच वर्षांच्या वयाचीं, खाऊ मागत रडत धांवत होतीं, असें माझ्या दृष्टीस पडलें. मग त्यांच्या आयांनीं एकएकाच्या हातावर एक एक पै ठेविली. ती हातावर पडतांच, तीं लागलींच रडायाचीं बंद झालीं. आणि तांबोळ्याच्या दुकानीं जाऊन त्यांतील दोघातिघांनीं पान-सुपारी घेतली; आणि आमच्या ओटीखालीं येऊन मोठ्या आनंदानें ती खात बसलीं. त्यांचा हा सर्व प्रकार मी त्यांस न कळतां पाहिला; परंतु शेवटीं जेव्हां त्यांनीं मला पाहिलें, तेव्हां तीं लाजून पळून गेलीं. त्यांस आपण कांहीं वाईट काम करितों, असें वाटलें असावें. असा त्या मुलांचा प्रकार मी दोनतीन वेळां पाहिला. परंतु एके दिवशीं तीं एकांत ठिकाणीं बसून खाऊं लागलीं. एके दिवशीं त्या मुलांनीं तांबोळ्याच्या दुकानीं जाऊन विडे खरेदी केले. आणि त्या प्रत्येक पोरानें आपआपला विडा मोठ्या जतनेनें मुठींत झाकून ठेविला होता. जसा काय एकाद्या जन्मदरिद्यास हिराच सांपडला. मला पाहतांच मुठी घट्ट आंवळून तीं धांवूं लागलीं. त्यांतील एक सुमारें तीन वर्षांच्या वयाचें मूल माझ्या संघट्टनांतलें होतें. त्यास मी मोठ्या आर्जवानें मुठींत काय आहे तें दाखवायास सांगितलें, तेव्हां त्यानें मूठ उघडून विडा दाखविला. तो पाहातों, तों त्यांतही मुलांस ठकविण्याची आपली अक्कल तांबोळ्यानें खर्चिली होती. मग हे विडे त्या मुलांनीं उत्तम प्रकारचा मेवा खातात, त्याप्रमाणें मोठ्या संतोषानें खाल्ले आणि उड्या मारून खेळूं लागलीं. हें पाहून मनुष्य अज्ञानदशेंत व्यसनासक्त कसा होतो, याचा सर्व प्रकार नदाच्या लोटासारखा माझ्या मनांत आला; आणि आजपर्यंत दुर्व्यसना-संबंधीं ज्या अनेक गोष्टी म्यां पाहिल्या होत्या, त्या माश्यांसारख्या फिरूं लागल्या. कोठेंकोठें पानसुपारीच्या व्यसनांत इतके लंपट झालेले लोक मी पाहिले आहेत कीं, घरांत मध्यान्हकाळाची भ्रांति असतांही प्रतिदिवशीं ते दोनअडीच आण्यांची पानसुपारी आणून खातात. मनुष्य अज्ञानदशेंत साधारण व्यसनें लावून घेतो, परंतु पुढें ज्ञानदशेंत आला, तरी तीं त्याला सुटत नाहींत; तीं वज्रलेपासारखीं त्याच्या अंगीं जडून जातात. मग त्याचा परिणाम बहुतकरून दुर्व्यसनांत होतो. तेणेंकरून तो परस्वाधीन होतो, इतकेंच नाहीं, परंतु गुणी जनांत अपमान पावतो. पानसुपारी, तंबाखू, विडी, गुडगुडी, हीं साधारण व्यसनें असल्यामुळें कोणाकोणास तीं प्रतिष्ठित अशीं वाटतात, परंतु व्यसन ह्मटलें ह्मणजे मुळींच खोटें आहे. ह्या ग्रंथांत

कोठें कोठें अतिशयोक्ति आहे खरी, परंतु नाटकास रस आणण्याकरितां अशा प्रकारच्या ग्रंथ रचनाऱ्यास ही मोकळीक आहे, असें मनांत आणून सुज्ञजनांनीं हें पुस्तक उदार दृष्टीनें वाचून पाहावें अशी प्रार्थना आहे. 'सत्कर्मयोगें वय घालवावें, सर्वांमुखीं मंगल बोलवावें', हें लक्षांत आणून मनुष्यानें आपली वर्तणूक ठेविली असतां तो सुखी होईल, यांत कांहीं भ्रांति नाहीं. गुणीजन आपलें आचरण पाहून समाधान पावतील असें करावें. मनुष्यांमध्यें अनेक तऱ्हेचीं व्यसनें व खोडी बहुतकरून गैरसमजुतीमुळें शिरतात, असें मनांत आणून त्याचें एथें उद्घाटन केलें आहे. साधारण कारणपरत्वें पानसुपारीचा उपयोग करणें निर्दोष आहे खरें, परंतु जे व्यसनासक्त होऊन आपली नासाडी करून घेतात, ते दोषी ठरतात.

'अयं निजः परो वेति गणना लघुचेतसाम् ।
उदारचरितानां तु वसुधैव कुटुंबकम् ॥'

---

## पात्रें.

रामराव—एक गृहस्थ.

भागीरथीबाई—त्याची बायको.

वारू—त्याची मुलगी.

बाळू—चाकर.

शोभाचार्य—शास्त्रीबावा.

शामरावतात्या—भागीरथीबाईचा भाऊ.

मोरू—रामरावाचा पुतण्या.

त्रिंबक वैद्य } वैद्य.
दादोबा जोशी }

भाऊशास्त्री—शास्त्रीबोवा.

दीना

भाऊकाका

श्रीनिवास—आचारी.

शामबाई

साळू—तिची मुलगी.

सोन्या—चाकर.

पार्वतीबाई—शेजारीण.

काकी

बाळा

अंतू—बाळाचा सोबती.

बाबाजी—तांबोळी.



## प्रवेश १

'यथा मृत्पिंडतः कर्ता कुरुते यद्यदिच्छति।
एवमात्मकृतं कर्म मानवः प्रतिपद्यते॥'

(एके दिवशीं सकाळचे प्रहरीं उठून रामराव तोंड धुतल्यावर आंगांत आंगरखा घालून बाहेर जाण्यास तयार होतो, इतक्यांत त्याची मुलगी वारू जवळ येऊन उभी राहाते. मग त्यांचें कांहीं भाषण होतें.)

**रामराव**—(चाकरास हाक मारून) बाळू, थोडा तंबाखू भरून आण.

**बाळू**—जी, मला कां हाक मारिली?

**राम०**—काय रे! तूं बहिरा आहेस? गुडगुडी आणायास सांगितलें, तें ऐकिलें नाहींस?

**बाळू**—जी, मी कामांत होतों. मला बराबर समजलें नाहीं.

**राम०**—बरें बरें, जा. फार बोलूं नको. लवकर गुडगुडी घेऊन ये.

(मग बाळू गुडगुडी घेऊन येतो. रामराव खुर्चीवर बसून गुडगुडी ओढतो. बाळूनें ती एका हातांत धरिली आहे, इतक्यांत वारूचा धक्का लागून चिलीम खालीं पडते., आणि रामरावाचा आंगरखा थोडासा नासतो. तें पाहून रामराव चाकरास गाळी देतो व मारायास उठतो. इतक्यांत वारू बापास बोलते,—'बाबा, चिलमास माझा धक्का लागून तें उपडी झालें, आणि तुह्मी त्या गरिबास कां बोलतां?')

**राम०**—होय, पण त्याणें प्रथम गुडगुडी भरून आणायास सांगितली होती, तेव्हां आणिली असती, तर एवढें झालें नसतें.

**वारू**—कां बाबा, मी तर पूर्वींपासून एथेंच बसलें आहे; आणि तेव्हां तर माझ्या हातांत काठी होती.

**राम०**—बरें, उगी राहा. तें कांहीं असो; परंतु तो द्वाड आहे.

**वारू**—बाबा, ही तुमची वर्त्तणूक पाहून मला इसपनीतींतील 'कोंकरू आणि लांडगा' ह्या गोष्टीची आठवण झाली. याचप्रमाणें त्या दिवशीं एक कुणब्याचा मुलगा हातांत लहानसें सीताफळ घेऊन आमच्या अंगण्यांत बसला होता. इतक्यांत घरांतून मोरू धांवत धांवत आला आणि त्याच्या थोबाडांत मारून त्याच्या हातांतून तें सीताफळ हिसकून घेऊन आंत पळाला. मग तो मुलगा ओटीवर येऊन रडत मोरूस शिव्या देत बसला. तेव्हां काकी घरांतून आली आणि आपल्या मुलानें

एवढा अपराध केला, त्याबद्दल त्याला शिक्षा करावी व धमकावावें, तें सोडून उलटी त्या कुणब्याच्या मुलास शिव्या देऊं लागली आणि मारायास उठली. इतक्यांत त्या पोराची आई येऊन काकीपाशीं भांडूं लागली. मग दारांत एकच गोंधळ होऊन गेला. शेवटीं काकानें मोरूकडून तें सीताफळ घेऊन त्या मुलास परत दिलं, आणि त्याच्या आईस समजावून वाटेस लाविली. तेव्हांपासून मोरू फारच हट्टी झाला आहे, आणि कोणाचेंच ऐकत नाहीं, व मनास वाटेल तसा वागतो. यावरून पंतोजीनें सांगितलेल्या गोष्टीची मला आठवण होते, कीं आईबाप मुलांचे फार लाड करूं लागले व त्यांचा पक्षपात धरून इनसाफ करूं लागले, ह्मणजे पुढें मुलें दुर्गुणी निघतात.

**राम०**—बरें, ती गोष्ट असो. पण त्या बाळूचा मला थोडासा राग आला होता, ह्मणून मी बोललों.

**वारू**—पण बाबा, सैंपाक्याच्या अपराधासाठीं माळयास दंड केला, तर कसें होईल? 'आकाशाची कुऱ्हाड कोल्ह्याच्या दांतावर' ह्मणतात, तसें.

**राम०**—बरें बरें, तें असूं दे आतां घरांत जा आणि कबाटांतून एक दुसरी आंगरख्याची घडी घेऊन ये.

( वारू आंगरख्याची घडी आणून बापास देते, आणि म्हणतेः-'बाबा, ही घ्या.' रामराव दुसरा आंगरखा घालून बाहेर जायास तयार होतो, इतक्यांत वारू त्यास फिरून विचारिते, :-'बाबा, तुह्मी आज एवढ्या सकाळीं कोठें जातां?' )

**राम०**—वारू, तुला बरें मी आजपर्यंत किती वेळ सांगितले कीं, कोणी बाहेर जातेवेळीं त्यास तूं कोठें जातोस, म्हणून विचारूं नये?

**वारू**—कां बाबा, विचारलें तर काय होतें?

**राम०**—तो अपशकुन होतो. आणि आपलें काम होत नाहीं, अथवा वाटेमध्यें कांही तरी नखलामी होते.

**वारू**—खरें बाबा, मला हें मोठें नवल वाटतें! मीं तुह्मांला कोठें जातां, ह्मणून विचारिलें असतां तुमचें काम होणार नाहीं, अशी गोष्ट कशी बरें होईल? तुमच्या कामाशीं आणि माझ्या विचारण्याशीं काय संबंध? अशा अपशकुनानें जर कामांत प्रतिबंध होईल, तर मग उद्योग काय कामाचा? आणि दुसरें, देवाची सत्ता सर्वांवर नाहींसारिखी होते.

**राम०**—असें नाहीं; परंतु वाईट शकुन झाले असतां पुढें कांहीं वाईट होईल, असें समजावें.

**वारू**—तर मग त्या दिवशीं तो साहेब गाडींत बसून आमचे घरीं आला होता आणि तुह्मी त्याच्या गाडींत बसून बाहेर गेलां होता, त्या वेळीं तुह्मी पायरी उतरतेवेळीं समोर तेली आला होता; असें असतांही तुह्मी अपशकुनाकडे न पाहातां गाडींत बसून गेलां आणि परत आलां, तेव्हां मोठ्या हौसेनें घरांत सर्वांस सांगितलें कीं, आज आपलें मोठें काम झालें. बरें, त्या वेळीं तो अपशकुन कोठें गेला ?

**राम०**—शकुनाचें कांहीं प्रमाण नाहीं. उगीच ती मनास भीति वाटते, लहानपणापासून शकुनाचें भय मुलांस घातलें, ह्मणजे तीं भित्रीं होतात खरीं. मलाही तें सगळें खोटें वाटतें, परंतु बाळपणामध्यें माझ्या मनांत जी भीति जडलेली आहे, ती जात नाहीं; ह्मणून मला याविषयीं संशय वाटतो. तूं आतां जा घरांत.

( असें बोलून रामराव घराच्या पायऱ्या उतरतो, इतक्यांत पानतंबाखू खात व रस्त्यांत थुंकत थुंकत शोभाचार्य पुढें येतात. )

**राम०**—या शास्त्रीबावा. आज सकाळींच कोठें स्वारी ? आज काय आहे, समजत नाहीं. जायास निघाल्यापासून तीन अपशकुन झाले. शकुनावर माझा कांहीं विश्वास नाहीं; पण मनांत संशय येतो इतकेंच. अशानें काय होतें ?

**शोभा०**—कां ? एकटा ब्राह्मण दृष्टीस पडला ह्मणून ? चिंता नाहीं. जरूरीचें काम असलें, तर आपण जावें. काम पार पडेल. माझ्या तोंडांत पानसुपारी आहे.

**राम०**—कां शास्त्रीबावा, आज सकाळींच काय धनुर्मास केला ?

**शोभा०**—शिव ! शिव ! असें हो काय ह्मणतां ? अजून स्नानदेखील झालें नाहीं. काय, एकून आपला धर्म बुडायाचाच समय आला आहे. आपल्यासारख्या यजमानाला धनुःसंक्रांत केव्हां येते व मकरसंक्रांत केव्हां येते व सिंहसंक्रांत तेव्हां येते, हें ठाऊक नाहीं, यास काय ह्मणावें ? फाल्गुन महिन्यांत तुह्मी धनुर्मास केला, ह्मणून विचारतां, तर आतां धर्म तो राहिला कशाचा ?

**राम०**—शास्त्रीबावा, धनुःसंक्रांत कोणत्या महिन्यांत येते, हें मला ठाऊक आहे, आणि कदाचित् तें समजलें नाहीं; म्हणून केवळ धर्म बुडतो असें नाहीं. धर्म बुडण्याचीं कारणें दुसरींच आहेत. तुह्मीं एवढे सकाळीं पानतंबाखू खाऊन आलां, म्हणून मी सहज विनोदाने विचारलें. तुम्ही उगीच रागें कां भरतां ?

**शोभा०**—पानसुपारी हें मांगल्य आहे. ती केव्हांही खाल्ली ह्मणून दोष नाहीं.

**राम०**—पण शास्त्रीबावा, आपल्यासारिख्या आचार्यांनी सकाळचे प्रहरीं स्नानसंध्या व भोजन केल्याशिवाय पानसुपारी खावी, हें शास्त्रोक्त नाहीं, असें मला

वाटतें. याशिवाय सर्व दिवसभर पानसुपारी चावत राहणें हें हलकट काम. याप्रमाणें पानसुपारी खाल्ल्यानें पुष्कळ नासाडी होते.

**शोभा०**—मी तरी कोठें सर्व दिवस पानसुपारी खातों? आतां सहज येत असतां ह्या मोठ्या रस्त्यावर एके बाईनें तें मोठें तीन मजली घर बांधिलें आहे, ती दरवाज्यासमोर खुर्चीवर बसून तोंड धूत होती, तिणें मला हात केला, ह्मणून मी तेथें गेलों. त्या बिचाऱ्या बाईनें मला पानतंबाखू दिला. तो तोंडांत टाकून मी हाच येथें आलों. ती बाई चांगली धर्मशील आहे हो!

**राम०**—वाहवा! शास्त्रीबावा, ठीक आहे! 'चोर उठून कोतवालास दंडवितो.' अशा ठिकाणीं जाऊन तुह्मीं सकाळचे प्रहरीं स्नान केल्याशिवाय पानसुपारी खाऊन थुंकत थुंकत येतां आणि आम्हाला मात्र धनुःसंक्रांत केव्हां येते, हें माहित नसल्यामुळें धर्म बुडाला व वर्णसंकर व्हावयाची वेळ आली म्हणून ठपका देतां! ठीक! हा चांगला रोजगार! 'आपल्या डोळ्यांतलें मुसळ टाकून दुसऱ्याच्या डोळ्यांतलें कुसळ शोधीत राहावें.'

**शोभा०**—छी! छी! नाहीं हो! माझें तिकडे नेहमी कोठें जाणें आहे? सालगुदस्तां त्या घराचा वास्तु झाला, त्या वेळीं मी आमच्या गुरुजींबरोबर तेथें रात्रीस गाणें ऐकायास गेलों होतों. तेथें मोठे मोठे शेटसावकार व महाराजांसारिखेदेखील ग्रहस्थ आले होते. आजकाल तिची पुण्याई आहे. इतकेंच कीं, ती नीच कुलांत उत्पन्न झाली आहे. तिचे घरीं लक्ष्मी वास करिते. गाणें संपल्यावर तिणें आह्मांस दूध प्यावयास दिल्हें आणि शास्त्रीमंडळीस दोनदोन रुपये दक्षणा दिली. एवढीच तिची माझी काय ती ओळख. परंतु तें कांहीं असो. तिची धर्मावर बरीच निष्ठा आहे.

**राम०**—ठीक! शास्त्रीबावा, तुह्मी आमचे गुरु, आह्माला चांगला उपदेश करणारे, तेच जर अशा ठिकाणीं जाऊन रात्रीचें दूध प्यावयास आणि सकाळचे प्रहरीं पानसुपारी खावयास लागलेत, तर मग पुढें काय राहिलें! 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ.' त्या दिवशीं आमच्या वारूनें हात धुवायास पाणी आणिलें असतां, तुह्मी आमचें घरचें पाणी ह्मणून त्या पाण्यानें हात धुतले नाहींत, आणि अशा जन्मसुवासिनींच्या घरीं जाऊन आपल्याला पाहिजे तशी वहिवाट ठेवितां, यांत तरी धर्माचें रक्षण होतें ना? बरें शास्त्रीबावा, खायाच्या पानास चुना लावायास कोण ब्राह्मण होता? चुन्यांत कांहीं पाणी नसेल! ती बाई सकाळचे प्रहरीं सोवळें नेसून बसलेली असावी!

**शोभा०**—काय हो भलतेंच? तुह्मी आमची केवळ बचेरीच मांडली? पानसुपारी हें सौभाग्य आहे. तिला कांहीं दोष नाहीं. दूध तर अमृतच आहे. याशिवाय तें ब्राह्मणानें तयार केलेलें. पानसुपारी कोणत्याही वेळीं कोठेंही खाल्ली तरी चिंता नाहीं.

चुन्यास दोष नाहीं. 'तांबूलं श्रीकरं भद्रं ब्रह्मविष्णुशिवप्रियम्' असें वाक्य आहे. आपलें शास्त्र पाहिल्याशिवाय उगाच वितंडवाद घालूं नये. शोध करा, ह्मणजे सर्व समजेल.

**राम०**—भले शास्त्रीबावा! भलत्याच श्लोकाचा भलत्याच ठिकाणीं उपयोग करून आमची डोळेझांक करायास पाहातां! अशानें काय समजूत होते? उगीच चुकवाचुकव मात्र करावी. 'मारून कुटून मुसलमान' ह्मणतात तसें. ह्या श्लोकावर मला पुष्कळ विचार करायाचा आहे. तो दुसरे दिवशीं करूं, आतां मला अवकाश नाहीं. परंतु तुमचें हें आचरण पाहून मला एका फकीराची गोष्ट आठवते. हा फकीर नित्य आमच्या दारावरून भिक्षा मागायास जात असे. तो एका मुसलमान कसबिणीच्या दारांत उभा राहून तिला याप्रमाणें आशीर्वाद देत असे:—'अल्लाके प्यारी, खुदा तेरे कमाईमें बरकत देवे!' हे शब्द ऐकतांच तिणें त्याला एक दिडकी टाकावी. मग तो फिरून तिला असा आशीर्वाद देई:—'बेनोकी जोडी सलामत रेवे, और तेरा धरम रोशन होवे. अल्ला ताला तेरा भला करे!' ज्या वेळीं तिणें त्याला दिडकी आणून दिली, त्या वेळीं ती एखाद्या झिंगलेल्या सेलरास ओटीवरून लोटून खालीं टाकित असेल व त्याचे गजवे चांचपित असेल! हें तिचें आचरण. शास्त्रीबावा, रागें भरूं नका हो! पण मला वाटतें, आमच्या बहुतेक भटांचीही वर्तणूक या फकीरासारखीच असते.

**शोभा०**—काय रावसाहेब, गरीब ब्राह्मणांस तुह्मीं कां छळतां? बरें, तुमचे दिवस आहेत! आज आमची पेशवाई असती, तर आमची आणि मुसलमानांची बरोबरी करायास तुह्मांस धैर्य कोठें झालें असतें? अस्तु. पण त्या दिवशीं दूध प्यावयास मी मी ह्मणणरी गृहस्थ मंडळी मांडीवर मांडी घालून लोडास टेंकून स्वस्थ बसली होती बरें! आह्मी तर भिक्षुकच आहों. आह्माला काय, दाही दिशा मोकळ्या. गरिबास मात्र तुह्मी लावून बोलतां. परंतु हें वाक्य लक्षांत ठेवा. 'स्वर्णं सर्वत्र पूजयेत.' आजकाल तिचे घरीं लक्ष्मी वावरते. तेव्हां अर्थात्च तिजवर ईश्वराची कृपा आहे. तुह्माला ठाऊक आहे? 'गरिबाचें पोर, गांवचें ढोर.'

**राम०**—शास्त्रीबावा, चांगलें काम. मनास वाटेल तें करून द्रव्यसंपादन केलें, ह्मणजे झालें. मग त्याला ईश्वराची कृपा संपादन करायास कठिण नाहीं. मग तो चोरी करो, खून करो, अथवा कोणाच्या घरावर दरोडा घालो. सुवर्ण असलें ह्मणजे तो पुण्यवान् झाला, असेंच ना तुमचें शास्त्र? तुमची आणि मुसलमान फकिराची मी बरोबरी केली असें नाहीं, परंतु अशा गोष्टींत तुमचें आणि त्याचें आचरण सारखें दिसतें. पाहा, ज्यावेळीं तुह्मी त्या बाईचे घरीं वास्तुशांतीस गेलां होतां, तेव्हां तुह्मी तिला 'धनं धान्यं पशुं बहुपुत्रलाभम्, यजमानस्य इष्टकामनासिद्धिरस्तु, दीर्घमायुः'

असा आशीर्वाद दिला ना ? या तुमच्या वर्तणुकीवरून इतकेंच सिद्ध होतें कीं, मनुष्याला कर्तव्यकर्मांची कांहीं गरज नाहीं. त्याणें पापाची कांहीं भीति बाळगूं नये, कोठून तरी द्रव्य गोळा करावें, ह्मणजे तुह्मी त्याला अलग वैकुंठास नेऊन बसवाल. असेंच ना ?

शोभा०—हर ! हर ! कां उगीच त्रास देतां ? अशा ठिकाणीं काय आह्मी वेदोक्त आशीर्वाद देतों ? तुह्मी सांगतां हें सर्व खरें आहे, परंतु तुह्मांला ठाऊक आहे ? 'आदीं पोटोबा आणि मग विठोबा.' हें सर्व आह्मांला समजतें; पण सध्या कलियुगाचा महिमा चालला आहे. 'दाम करी काम.' त्यामुळें आमचा नाईलाज. रावसाहेब, आह्मांला यांत काय सुख वाटतें ह्मणतां ? पोट जळेना, ह्मणून अशा ठिकाणीं जावें लागतें, इतकेंच. प्रपंच आहे हा मोठा गहन आहे, बरें ! तुह्मी घरीं बसून मोठा पगार खातां, तुह्मांला आमची दुःखें कशीं समजतील ? सारांश, 'परदुःखेन दुःखिता विरलाः'

राम०—शास्त्रीबावा, आतां मला अवकाश नाहीं, आणि या प्रकरणीं वाद-विवाद करावा, अशी माझी इच्छाही नाहीं. परंतु पुराणोक्त आशीर्वाद देतेवेळीं 'तूं अधम आहेस, तुझें अकल्याण होवो,' असा आशीर्वाद देतां काय ? माझ्या मनांत पानतंबाखू-विषयीं फार दिवसांपासून बोलायाचें आहे. दिवसभर पानसुपारी खाणें आणि जिकडे तिकडे पिचकाऱ्या मारणें आणि याबद्दल व्यर्थ पैका खर्च करणें, व यापासून हानि करून घेणें, हें किती वाईट आहे हें लोकांस दाखवायाचें आहे. आणि 'तांबूलं श्रीकरं भद्रम्' या श्लोकाचाही कांहीं विचार केला पाहिजे. आतां मी बाहेर जातों. उद्यां जरूर या हो ! मी बोललों म्हणून कांहीं राग धरूं नका. सहज या गोष्टीचा खुलासा करावा, ह्मणून तुम्हासीं बोललों. तुम्हीं कांहीं त्याविषयीं मनांत आणूं नका. परंतु शास्त्रीबावा, 'आदीं पोटोबा आणि मग विठोबा' या वाक्यावर विश्वास ठेवून वर्तूं नका हो ! पोट भरलें म्हणून जन्माचें सार्थक होत नाहीं. जनावरेंदेखील पोट भरतात. परमार्थाकडे थोडें तरी ध्यान ठेविलें पाहिजे.
'धर्मार्थकाममोक्षाणां यस्य कोऽपि न विद्यते। अजागलस्तनस्येव तस्य जन्म निरर्थकम् ॥'
ह्या श्लोकाकडे कांहीं तरी लक्ष द्या.

शोभा०—रावसाहेब, मी जरूर उद्यां येईन, बरें ? तुम्हावर राग करूं, तर आम्हास जायास ठिकाण तरी कोठें आहे ? तुम्ही ओटीवरून आम्हाला लोटून घातलें, तरी आम्ही तुमचे घरीं हजार वेळ येऊं. तुम्हावांचून आमचें पालन करणारा कोण आहे ? तुमचें बोलणें आम्ही फुलांच्या गजऱ्यासारिखें मानतों. बरें, तुमचा उगाच खोळंबा होतो. मी येतों.

(असें म्हणून शास्त्रीबावा निघून गेले आणि रामरावही आपल्या कामास गेले.)

---

## प्रवेश २

( संध्याकाळीं चार वाजतां रामराव रोजगारावरून घरीं आले आणि हातपाय धुऊन खुर्चीवर तंबाखू ओढित बसले आहेत, आणि वारू जवळ बांकेवर बसून कवड्या खेळत आहे. )

**वारू**—( बापाकडे तोंड फिरवून ) बाबा, तुम्ही बरे आहां ! ' काढा काढा तुमचा देव्हारा, पुजूं द्या आमचा लांडा बैल ' या म्हणीप्रमाणें तुम्ही चालतां, असें दिसतें.

**राम०**—कां ग वारू, काय झालें ?

**वारू**—बाबा, सकाळीं शास्त्रीबावा आले होते, त्यांच्या तोंडांत पानसुपारी होती, म्हणून तुम्ही त्यांस किती लावून बोललेत ? आणि पानसुपारी खाणें वाईट आहे, हें त्यास सांगितलेंत ? आणि आतां बरें तुम्हीच सांगा, पानसुपारी खाणें बरें, कीं तपकीर आणि तंबाखू ओढणें बरें ? तुम्ही तर दिवसास दाहावीस खेपा तंबाखू ओढतां आणि तपकीर कितीवेळ ओढतां, हें तर माझ्यानें सांगवतच नाहीं. असें असून तुम्ही दुसऱ्यास कां बरें दोष देतां ? तुम्हाला तर रोजच्या तंबाखूस आणि तपकिरीस तीन दिडक्या लागतात. मला तर असें वाटतें कीं, तंबाखू आणि तपकीर ओढणें, पानसुपारीपेक्षां हजारपट वाईट आहे. अगई ! तंबाखू ओढणें किती वाईट आहे ! त्या दिवशीं बाळू गुडगुडींतील पाणी बाहेर ओतित होता, त्याच्या घाणीनें तर मला उलटी झाली. हूस् ! गुडगुडी आणि विडी ओढणाऱ्यांच्या तोंडास वास तरी किती वाईट येतो ! आणि गुडगुडीची खटपट तरी किती आहे ! घरांत हेंदर किती होतें ! बाळू तर जिकडे तिकडे मशेरीच्या चिलम्या ओतितच आहे, आणि गुडगुडी ओढिली म्हणजे तुम्ही जिकडे तिकडे थुंकत जातां, याचें तुमच्या मनांत कांहींच येत नाहीं ? तपकीर ओढणारे लोक तर म्हातारपणीं अगदींच बुरसे होतात. बरें, शास्त्रीबावांनीं त्या दिवशीं तंबाखू न ओढण्याविषयीं एका ऋषीनें राजास उपदेश केला होता, तो श्लोक तुम्हाला म्हणून दाखविला होता, तो कसा तो मला म्हणून दाखवा !

**भागीरथीबाई**—( दारापाशीं राहून ) उगी राहा ग पोरी, कशास बोलतेस ? तुला ठाऊक नाहीं ? ' खायाचे दांत निराळे आणि दाखवायचे दांत निराळे. ' या सगळ्या गोष्टी लोकांस सांगायास केल्या आहेत, करायास नाहींत. ' दिव्याखालीं नेहमी अंधार असतो. ' तुला समजत नाहीं कसें ?

**राम०**—( थोडासा रागें भरून ) बरें, बरें, फार शहाणी होऊं नको. आपल्या कामास जा. ( वारूकडे तोंड फिरवून ) वारू, मी कबूल करितों कीं, पानसुपारीपेक्षां तंबाखू व तपकीर ओढणें कांहींसें वाईट आहे. परंतु मी तंबाखू औषधासाठीं ओढतों. मला कांहीं उपद्रवासाठीं वैद्यानें तो ओढायास सांगितला आहे.

वारू—पण बाबा, औषध काय कोण नेहमी घेत असतात? आणि एवढे हजारों लोक तंबाखू ओढतात, त्यांस सगळ्यांस काय रोग झालेले असतात? मला वाटतें, रोगाचें हें उगेंच थोतांड. त्या दिवशीं माझ्या पोटांत दुखत होतें म्हणून तुम्हीं मला पेपरमीट दिलें, तेव्हां माझें पोटदुखणें राहिलें, म्हणून काय मी रोज पेपरमीट घेतलें, तर चालेल? बरें, गतवर्षी तुम्हाला ताप येत होता, तेव्हां त्रिंबकवैद्याने काढा दिला, तो तुम्ही सात दिवसपर्यंत घेतलात आणि ताप गेल्यावर लागलाच सोडून दिलात, तर तो तंबाखूसारखा तुह्मी नेहमी कां घेत नाहीं? बरें बाबा, त्या दिवशीं दादोबा जोश्यांनीं संस्कृत श्लोक म्हणून औषध घेण्याविषयीं तुह्माला काय सांगितलें होतें, तें मला सांगा? मीं तें थोडें थोडें ऐकिलें होतें. पण त्याची मला बराबर आठवण नाहीं.

राम०—दादोबा जोश्यांनीं संस्कृत श्लोक ह्मटला होता, त्यांत असा अर्थ होता;— 'कोणतेंहि औषध पुष्कळ घेऊं नये, त्याचें परिमित असेल तेवढेंच घ्यावे; व तें नेहमी घेऊं नये, जर औषध पुष्कळ आणि नेहमी घेतलें, तर त्यापासून कांहीं गुण येत नाहीं. पण तें घेणाराचा आहारच होऊन अन्नासारिखें त्याच्या अंगांत पचून जातें.' ऋषीनें राजास तंबाखू न ओढण्यासाठीं उपदेश केला होता, तो असा होता,—'तमाखुपत्रं राजेंद्र भज माज्ञानदायकम्.'

वारू—जर असें आहे, तर दररोज दहावीस वेळ गुडगुडी ओढण्यापासून तुह्मांला काय नफा होणार आहे? तंबाखू ओढण्यापासून मला कांहीं फायदा दिसत नाहीं. उलटें नुकसानच होतें. कधीं कधीं सकाळचे प्रहरीं गुडगुडी ओढली, ह्मणजे ती लागून तुह्मी घटिका अर्धघटिका बेशुद्ध होऊन पडतां, तेव्हां आह्मी किती घाबरून जातों? मला असें वाटतें कीं, तंबाखू हें गांजा, गोळी, अफू, चंडोल, यांमधीलच एक हलकें, प्रतिष्ठित जातीचें कैफ असावें. तेव्हांच लोक त्याला एवढे ह्मटतात. कुळंब्यां-माळंब्यांमध्यें तर दोनतीन वर्षांचीं मुलें झालीं, ह्मणजे विडी ओढायास लागतात. यावरून मला असें वाटतें कीं, लोक हें व्यसन उगीच लावून घेतात. यापासून कांहींच फायदा नाहीं. आतां जे शेतकरी सगळा दिवस भर थंडींत, वाऱ्यांत व चिखलांत खपतात, त्यांस अंगांत गरमी आणायास व गमतीसाठीं कदाचित् दिवसांतून दोनतीन खेपा तंबाखू ओढण्याची गरज लागत असेल. मी नाहीं ह्मणत नाहीं. खरेंच बाबा, त्या दिवशीं एक मुसलमानीन आपल्या सुमारें दीड वर्षांच्या मुलाच्या तोंडांत विडी घालित होती, तें पाहून मला मोठें नवल वाटलें.

राम०—फायदा नाहीं, असें कां ह्मणतेस? तंबाखू ही औषधी आहे. मला तो ओढला ह्मणजे जिवास स्वस्थता वाटते. परंतु हें व्यसन वाईट खरें. एकदां त्याचा नाद लागला ह्मणजे तो सुटत नाहीं. यामध्यें थोडा कैफ आहे खरा. मी हा तंबाखू आणि

तपकीर सोडायास पुष्कळ प्रयत्न करितों; परंतु तो सुटत नाहीं. ल्हानपणीं एखादी खोड लावून घेणें हें मोठें वाईट आहे. त्याविषयीं मनुष्यानें फार सावध असलें पाहिजे. शेतकरी लोकांस त्यापासून थोडी विश्रांति मिळते व तंबाखू तोंडांत टाकिला व ओढला ह्मणजे काम करावयास हुशारी येते, असें मला वाटतें.

भागी०—सुटत नाहीं कां? मनांत सोडायाचें असलें तर सगळें सुटतें. माझा भाऊ शामरावतात्या पंधरा वर्षे गुडगुडी ओढीत होता. आणि त्याला तंबाखूची एवढी चट होती कीं, एका घटकेंत तो पांचसहा खेपा गुडगुडी ओढी. परंतु एक दिवस त्याला भाऊशास्त्र्यांनीं गुडगुडी ओढणें वाईट आहे, त्याविषयीं कांहीं भाषण करून ऐकविलें, तेव्हांपासून त्याणें गुडगुडी ओढणें अगदीं सोडून दिलें. आणि आतां तो पहिल्यापेक्षां बळकट आणि हुशार झाला.

वारू—आई, त्याणें ती एकदम कशी सोडली, ती मला सांग बरें?

भागी०—तो प्रथम, दिवसांतून दोनतीन वेळां गुडगुडी ओढायास लागला, मग कांहीं दिवसपर्यंत दोनच वेळ ओढून पाहिली; व मग महिना पंधरा दिवस त्याणें एकएकच खेप ओढली. शेवटीं अगदींच सोडून दिली. तेव्हांपासून त्याचा खोकला बंद होऊन त्याला कफ पडत नाहींसा झाला, तंबाखू सोडल्यापासून उलटा त्याला एवढा लाभ झाला. मग त्याणें इंग्रजी बुकांतून एका इंग्रजी डाक्तरानें तंबाखू ओढण्यापासून किती हानि होते, याविषयीं आपले विचार लिहिले होते, त्यांतील तात्पर्य आम्हांस असें सांगितलें. 'तंबाखू ओढण्यापासून पित्त होतें, व अंगीं अशक्ताई येते. उत्तरोत्तर जठराग्नी मंद होतो, आणि वृद्धपणीं खोकला होऊन मस्तक फिरायास लागतें.'

राम०—होय होय, ठाऊक आहे. आपल्या भावाची बढाई सांगावयास तूं सरसावून पुढें आली असशील. आह्मीं त्याला ओळखतों. तूं आपल्या सैंपाकाच्या कामास जा. वारू तूं तिचें काय ऐकतेस? तंबाखू ओढणें हें बरें नाहीं, हें मला ठाऊक आहे, परंतु काय करावें? एकदां अंगीं व्यसन जडलें, तें एकाएकीं सुटत नाहीं. मी तें लवकरच सोडायाचा प्रयत्न करितों; ह्मणजे तूं खुशी होशील ना?

वारू—बरें, तें असो. पण बाबा, कांहीं उपद्रवासाठीं तंबाखू ओढायास लागलां म्हणून तुम्ही सांगितलें, तर तपकीर कोणत्या रोगासाठीं ओढायास लागलां बरें? मला वाटतें कीं, लोक तपकीर सांपडली, ह्मणजे उगीच डौलासाठी ओढतात. मग हळूहळू तें व्यसन अंगीं जडतें. 'चूड लावून वाघ घरांत आणावा.'

भागी०—(थोडीसी पुढें येऊन) वारू, उगीच बडबड करून तूं तोंड कां दुखवून घेतेस? 'काजव्याचे मागें उजेड असतो, पण त्याचा उपयोग काजव्यास

होत नाहीं.' त्यांला काय विचारतेस ? घे, मीच सांगतें. ते सांगतील कीं, मस्तक भारी जड होतें, हपिसांत गेलें म्हणजे आळस येतो व डोकें दुखायास लागतें, ह्मणून तपकीर ओढतों. पण हें सगळें ढोंग आहे, हो! बहुतेक लोक तपकीर केवळ मिजासीसाठीं ओढतात. चांगल्या डब्या लोकांस दाखविल्या पाहिजेत व उंच्या गुलाबी वासाच्या व विलायती तपकिरी ओढल्या पाहिजेत, म्हणून हें व्यसन जुलमें लावून घेतात. मी अलिकडे लहान लहान पोरांपाशीं तपकिरीच्या डब्या पाहातें. पंतोजीच्या शाळेंत जाणारीं मुलें-देखील अर्धीदुगाणीची तपकीर जवळ ठेवितात. त्याला कसचा रोग झालेला असतो ? 'हांसत कर्म करावें, भोगावें रडत तेंचि परिणामीं' ह्याप्रमाणें हें तपकिरीचें व्यसन आहे.

**राम०**—होय होय! तूं आतां दिवसानुदिवस फार शहाणी होत चालली आहेस. आपलें काम करायाचें सोडून ज्यांत त्यांत बोलायास कां येतेस ? घरांत जा पाहूं. वारू, तपकीर ओढली असतां अंगांत हुशारी येते व मस्तक हलकें राहातें, ह्मणून तपकीर ओढतात. परंतु लहान मुलांनीं तपकीर ओढणें फार वाईट आहे. ती पानतंबाखू खाण्याइतकी व गुडगुडी ओढण्याइतकी वाईट नाहीं.

**वारू**—भले बाबा, तुह्मांला तपकीर आवडते, ह्मणून ती वाईट नाहीं असें सांगतां, परंतु मला तर असें वाटतें कीं, पानसुपारी आणि तंबाखूपेक्षांही तपकीर ओढणें वाईट आहे. तें लहानपणीं समजत नाहीं; पण ह्मातारपणीं त्याचा बुरसेपणा दिसून येतो. नाक तपकिरीनें भरलेलें असतें; हातास, बोटांस तपकीर लागते, व नखांत भरते; आंगास तपकिरीची घाण येते; शब्द घोगरा होतो, आणि कोणी कोणी सांगतात कीं, तपकीर ओढल्यानें मस्तकांतील मेंदुदेखील बिघडून जातो. बाबा बाबा, बरी आठवण झाली. त्या दिवशीं पंतोजींनीं 'दिग्दर्शन' आह्मांला वाचून दाखविलें. त्यांत बाळ गंगाधरशास्त्र्यांनीं तपकीर ओढण्यापासून किती हानि होते, ती याप्रमाणें लिहिली होती :– 'तपकीर ओढणारा तपकिरीची डबी काढून प्रथम पुसतो, त्यामध्यें चारपांच पळें जातात. मग तिजवर थोपटण्यास कांहीं वेळ जातो. मग ती उघडून चिमटी घेतो आणि नाक साफ करतो, यांत कांहीं वेळ जातो. मग तपकीर ओढतो. याप्रमाणें दिवसांतून दहावीस खेपा तपकीर ओढणाराचें एक अष्टमांश कीं कितकें आयुष्य तपकीर ओढण्याखालीं जातें. तपकीर ओढणाऱ्याचीं वस्त्रें खराब होतात, नाकपुड्या मोठ्या होतात. आणि त्याचा शब्द घोगरा होतो.' असे त्याणें तपकिरीचे पुष्कळ दोष त्यांत लिहिले होते. 'दिग्दर्शन' माझ्याजवळ असतें, तर तें मी तुह्मांला आतांच वाचून दाखविलें असतें; मग तरी तुमची खातरी झाली असती ?

**राम०**—होय ग पोरी, तूं उगीच बैस! शाळेंत जायास लागल्यापासून तूं फारच वाचाळ झाली आहेस. ज्यांत त्यांत बोलायास येतेस.

**भागी०**—लोक तपकिरीचें व्यसन उगेंच लावून घेतात, यांत कांहीं संशय नाहीं. आमचा दीना लहानपणीं दोनतीन वर्षांचा असतांना त्यास तपकिरीची एवढी चट लागली होती कीं, तपकिरीची डबी जवळ घेतल्याशिवाय तो जेवित नसे.

**वारू**—आई, एवढ्या लहान मुलास इतकी तपकिरीची चट कशी लागली? आतां तर तो तिचा वास आला असतां तीन कोस दूर पळून जातो.

**भागी०**—त्याला लहानपणीं आजीचा फार लळा होता, आणि तिला तपकिरीची भारीच चट होती. ती आपण तपकिरीची चिमूट ओढी आणि दिनाच्या नाकास हात लावी. मग शेवटीं त्याला तिची एवढी संवय लागली कीं, तो दिवसांतून तीनचार खेपा आजीजवळून चिमटी घेऊन ओढी, आणि ती न मिळाल्यास रडायास बसे. आणि जेवते-वेळीं तर एवढा हट्ट घेऊन बसे कीं, तपकिरीची डबी हातांत घेतल्याशिवाय घांस गिळीतच नसे.

**वारू**—आई! आई! त्याला एवढी चट लागली? मग ती त्याची कशी सुटली?

**भागी०**—त्याला तपकिरीचा नाद लागलेला पाहून घरच्या मनुष्यांस तें वाईट वाटलें, आणि त्यांणीं आजीस सांगितलें कीं, तो कितीही रडला आणि त्याणें कितीही हट्ट केला, तरी त्याला तपकिरीची चिमटी देऊं नको. मग तो किंचित् रडायास लागला, ह्मणजे त्याचा काका त्याला लागलाच घेऊन जाई. तेणेंकरून त्याची तपकीरही सुटली आणि हट्टही मोडला. कोणतेंही व्यसन सोडण्याचा प्रयत्न केला, तर सुटल्याशिवाय राहणार नाहीं. मनावर मात्र घेतलें पाहिजे. कुणबी लोकांत असी म्हण आहे, ‘माझा बाब्या मनावर घेईल तर वाघास मारून घरीं येईल.’

**वारू**—आई, पंतोजींनीं त्या दिवशीं दुसरी एक गोष्ट सांगितली होती कीं, जे तपकीर ओढतात, त्यांचें घ्राणेंद्रिय बिघडतें. ह्मणजे तपकीर ओढतां ओढतां त्यांस दुसऱ्या कोणत्याच सुगंधी पदार्थांचा वास येत नाहींसा होतो.

**भागी०**—हें तर काय? पण भाऊकाकांनीं त्या दिवशीं एका इंग्रजी गोलंदाजाची गोष्ट सांगितली, ती तर मोठीच नवल मानण्याजोगती आहे. ती त्यांला एका साहेबानें सांगितली, असें ते सांगत होते.

**वारू**—आई ती कोणती गोष्ट, ती मला सांग तर खरी!

**भागी०**—एक इंग्रज गोलंदाज होता. लहानपणापासून तपकीर ओढित असे. तो प्रथम दिवसास तोळा अर्धा तोळा तपकीर ओढी. शेवटीं त्याचें नाक एवढें बोंथट झालें कीं, त्याला कितीही तिखट तपकीर ओढली, तरी लागत नाहींशी झाली. मग तो दिवसास दहावीस तोळे तपकीर ओढी; आणि ती तिखट व्हावी, म्हणून तींत

बारीक मिरचीची बुकी घाली. ही तपकीर तो साधारण लोकांसारखी चिमटीनें ओढीत नसे, परंतु त्याणें एक चमचा केला होता. त्याणें तो ती नाकपुडींत ओती आणि रुमाल नाकाशीं धरून जोरानें ओढून घेई. याप्रमाणें तपकीर ओढतां ओढतां मनुष्यांचीं नाकें बोथट होऊन जातात.

**वारू**—बाबा, पाहिलें ना! तंबाखू आणि तपकिरीच्या व्यसनापासून मनुष्याचे, किती हाल होतात ते! आमचे घरीं गोंव्याहून एक पाहुणा आला होता. त्याणें असें सांगितलें कीं, एक गृहस्थ अंघोळीस जाण्याचे पूर्वी नेहमीं गुडगुडी ओढित असे. त्याणें एके दिवशीं नेमाप्रमाणें अंघोळीस जाण्याच्या पूर्वी तलल तंबाखू भरून मोठ्यानें झुरका मारला, त्या वेळीं तो तेथचे तेथेंच पडून मेला.

**राम०**—मरणें जिणें काय कोणाच्या स्वाधीन आहे? सुपारी लागून किती मरतात? आमच्या घरीं श्रीनिवास म्हणून एक आचारी होता, तो पानसुपारी लागून दोन घटकांत मेला. कोणतेंहि व्यसन वाईट, हें मी कबूल करितों. तंबाखू आणि तपकीर हीं दोन्ही व्यसनें मी सोडून देतों. आतां तरी तूं खुशी झालीस ना? बरें जा, आणि 'ज्ञानप्रसारक' वाचीत बैस.

**वारू**—पण बाबा, आमच्या घरीं एक चाकर होता, तो असें म्हणेः—'इस इस करतां पाऊस जातो आणि नाय होय करतां वखत जातो.' असें करूं नका हो!

> 'षड् दोषाः पुरुषेणेह हातव्या भूतिमिच्छता।
> निद्रा तंद्रा भयं क्रोधं आलस्यं दीर्घसूत्रता॥'

## प्रवेश ३

(दुसरे दिवशीं सकाळचे प्रहरीं तोंड धुऊन रामराव बुक वाचित बसले आहेत, इतक्यांत बाळू येऊन त्यांस 'खालीं कोणी शास्त्रीबावा आले आहेत', म्हणून सांगतो. ते 'त्यांस वर पाठवून दे', ह्मणून सांगतात. शास्त्रीबावा माडीवर जातात.)

**राम०**—या शास्त्रीबावा, कोठून आलां!

**शोभा०**—घराहूनच आपल्या भेटीसाठीं आलों होतों. मनुष्यानें वचनास साचें असलें पाहिजे. तुह्मी आमच्या पानतंबाखूवर एवढे हात धुऊन कां पाठीस लागलां हें पाहावें ह्मणून आलों आहे. मुंबईंत हें तुह्माला कांहीं दिसत नाहीं. असे कर्नाटक, म्हैसूर व देशावर फिरून या, ह्मणजे पानतंबाखूचा काय मान आहे, तो तुह्माला समजेल.

कर्नाटकाकडे तर लोक तोंडदेखील धुतल्याशिवाय बिछान्यावर असतानांच प्रथम पानतंबाखू खातात, आणि मग दुसरा उद्योग करितात. आणि देशावरही कोठें कोठें असाच प्रघात आहे. परंतु हें खरें आहे कीं, दिवसभर पानसुपारी खाणें, प्रशस्त दिसत नाहीं. तेणेंकरून दांत मळीण होतात व घरांत जिकडे तिकडे थुंकून घाण होते, ही गोष्ट मी कबूल करितों. पण पानसुपारीस कांहीं दोष नाहीं. पेशवाईत तर एकाद्या साधारण सरदाराच्या घरीं दिवसास हजारपांचशें पक्कीं कळीचीं पानें सहज खपत असत. पेशवाई बुडाल्यामुळें तुह्माला आतां हवें तसें बोलायास तोंडें झालीं. असो. सांप्रतचा काळच तसा आहे, त्याचा बोल तुह्माकडे नाहीं. काळाचा महिमा !

**राम०**—शास्त्रीबाबा, पानसुपारी अगदींच खाऊं नये, अथवा ती खाल्ली असतां दोष लागतो, असें माझें ह्मणणें नाहीं. हवी असली तर कोणी दिवसांतून एकादे वेळीं भोजन झाल्यावर ती खावी. अथवा जेवणसमारंभ झाला असतां एकादा विडा खाल्ला ह्मणून चिंता नाहीं. परंतु दिवसभर जीभ आणि ओठ तांबडे रंगवून फिरणें हें प्रशस्त नव्हे. आणि मला वाटतें कीं हें शास्त्रोक्तही नाहीं. आतां तुमच्या 'तांबूलं श्रीकरं भद्रं ब्रह्माविष्णुशिवप्रियम्' ह्या श्लोकाचा तरी अर्थ माझ्या ह्मणण्यास अनुसरूनच आहे. हा श्लोक कोणी धर्माभिमानी पुरुषानें किंवा वैद्यशास्त्र्यानें केला असावा. आमच्या लोकांत सोवळें, ओंवळें आणि खरकटें यांविषयीं फार नेम आहेत. त्यांचें रक्षण करण्यासाठीं जेवल्यानंतर मुखशुद्धि व्हावी, ह्मणून पानसुपारी खाण्यासाठीं असा श्लोक केला असावा. दुसरें, आह्मांमध्यें शाकभाजी, दूधपाक, पोळ्या, लाडू, अशीं मिष्टान्नें जेवण-समारंभांत करतात, आणि अशा समारंभास येणारे कित्येक लोक विचार न पाहातां मिष्टान्नें खातात; त्यांचीं तीं पचन होण्यासाठीं व तोंडाचा वास जाण्यासाठीं कोणी वैद्यशास्त्र्यानें पान, सुपारी, चुना, वेलची, लवंग, जायपत्री, कापूर, जायफळ, असे पदार्थ घालून विडा अवश्य खावा, असें लिहून ठेविलें. आणि ती खाण्यास कोणी हयगई करील, ह्मणून 'ब्रह्माविष्णुशिवप्रियम्' असें शेवटचें वाक्य करून लोकांस ती खाण्याची आवश्यकता दाखविली. परंतु (थोडासा हंसत) तुह्मासारख्या विलासी लोकांनीं या पानसुपारीचें एवढें खूळ माजविलें कीं, ती नेहमी खाल्लीच पाहिजे.

**शोभा०**—काय रावसाहेब, तुह्मी एकूण आमची थट्टाच मांडली आहे ! मला कांहीं एवढी पानसुपारीची चटक नाहीं. तुह्मासारिख्यांनीं कोणी दिली, तर आपली खातों. परंतु तुह्माला ठाऊक आहे, मराठी दरबारांत या पानसुपारीस किती मान होता तें ? सवाई माधवरावांचा जन्म झाला त्या वेळीं लोकांस वांटायास फक्त पानसुपारीच सवा लाखाची लागली होती, असें सांगतात. आतां काय आहे ? तुमच्या गाड्या, घोडे आणि बुकें मात्र पहावीं, म्हणजे झालें. जाऊं द्या रावसाहेब, श्रीमंतीची लक्षणें निराळींच आहेत.

राम०—आमच्या घरामागें एक ह्यातारा गवळी राहातो. त्यानेंही मला ह्या सवा लाख रुपयांच्या पानसुपारीची गोष्ट सांगितली होती. खरें सांगितलें शास्त्रीबावा. मराठी राज्यांची आणि पेशवाईची श्रीमंती गाजायास लागल्यापासूनच एवढी नासाडी झाली. नाच, तमाशे, गाणीं, देवालयांत रंभांची स्थापना, मुरळ्यांचा उगम व लहान मुलांचीं पाळण्यांतदेखील लग्नें करणें, सगळा दिवसभर पानसुपारी चावित बसणें, तीनचार बायका करणें, असे श्रीमंतीचे डौल करून त्यांणीं लोकांची नासाडी मात्र करून टाकिली, दुसरें कांहीं नाहीं. पाळण्यांत मुलांचें लग्न लावणें, हा तर तुमच्या श्रीमंतीचा ध्वजच आहे. असल्या गोष्टी तीनशेंचारशें वर्षांमागें होत्या, असें कोठें सांपडत नाहीं.

शोभा०—ठीक 'बैल सांडलेल्याच्या कानाजवळ घांटा वाजतात.' येऊन जाऊन तुम्हाला आमच्या शास्त्रावर आणि मराठी राजांवर कुऱ्हाड घालायाची. दुसरें कांहीं नाहीं. आपला धर्म कोणासच नकोसा झाला आहे. तुमचा काय अपराध ? मला एवढें ठाऊक आहे, 'आयत्यावर कोयता.'

राम०—वाहवा शास्त्रीबावा ! यामध्यें मीं शास्त्रविरुद्ध तें काय बोललों ? आणि तुमच्या श्रीमंतांची निंदा ती काय केली ? मी ह्यांत तुमच्या शास्त्रास कांहीं तरी दोष लावला आहे, बरें ? पानतंबाखूच्या व्यसनावर मात्र मी बोललों, इतकेंच. हें व्यसन तुह्माला बरें वाटतें ना ? बरें, मराठी राज्यांत तुमचे बाजीराव पेशवे व दुसरे बडे लोक शास्त्राप्रमाणें वागत होते ना ? आह्मी कांहीं युक्तीच्या गोष्टी बोललों असतां तुह्मी उगीच चिडतां कां बरें ? मला कांहीं कोणाचा द्वेष नाहीं. लोकांच्या कल्याणासाठीं मात्र मी बोलतों. बरें दिसल्यास कोणी घ्यावें; नाहीं तर सोडून द्यावें. यांत माझा कांहीं आग्रह नाहीं. खरेंच सांगतों शास्त्रीबावा, लोकांची ही दुःखित स्थिति पाहून मला फारच वाईट वाटतें. बरें तुह्मी बरी याद केली. आमच्या शास्त्रांत पानसुपारी केव्हां खावी, कोणी खावी, कोणी न खावी, याविषयीं कांहीं लेख आहे काय ?

शोभा०—आहे ह्मणजे काय ? रावसाहेब, आमच्या शास्त्रकर्त्यांनीं विचार करायास कांहींच जागा ठेविली नाहीं बरें ! पानाच्या शिरा कशा काढाव्या, त्यांचा शेवटचा तुकडा किती काढावा, चुना कसा लावावा, त्यामध्यें कापूर, वेलची किती असावी, हें सर्व त्यांत लिहिलें आहे. आह्मी पाहातों कोठें ? शोधिलें तर सगळें सांपडतें.

राम०—शास्त्रीबावा, हें काय कामाचें ? हे उगीच शुष्क विचार. यामध्यें आहे काय ? मी विचारतों, तें तुह्मी एकेच ठिकाणीं ठेविलें आणि भलतेंच सांगतां. 'आपलें तें बापडें आणि दुसऱ्याचें तें कातडें.' माझा प्रश्न असा आहे, पानसुपारी खाण्यास शास्त्रांत कांहीं प्रतिबंध आहे काय ?

**शोभा०**—हं! हं! तेंही आहे. त्याविषयीं असा नेम आहे. संन्यासी, ब्रह्मचारी, विधवा स्त्री, विद्यार्थी, व्रतउपोषण करणारे, यांणीं पानसुपारी मुळींच खाऊं नये. आणखी मुलांनीं आपल्या आईबापासमोर व गुरूसमोर व प्रतिष्ठित गृहस्थासमोर खाऊं नये, असीही वहिवाट आहे. ( थोडासा संकोच पावून ) ब्राह्मणांनीं संध्याकाळीं व रस्त्यांत चालत असतां खाऊं नये, असेंही कोठें कोठें आहे खरें. परंतु ती मुळींच खाऊं नये, असें कोठें नाहीं. विधवा स्त्रीनें खातांना ब्राह्मणानें पाहिलें, तर तिचा त्यानें शिरच्छेद करावा, असें स्पष्ट सांगितलें आहे.

**राम०**—शास्त्रीबावा, ज्या अर्थीं पानसुपारी खाण्यास एवढा प्रतिबंध आहे, त्या अर्थीं तीमध्यें कांहीं तरी दोष असावा. आणि तें व्यसन मनुष्यास लागूं नये, म्हणूनच शास्त्रांत तिचा एवढा प्रतिबंध केला आहे. माध्वाचार्यांचें तर असें मत आहे कीं, पानसुपारी खाणें असल्यास गृहस्थाश्रम्यानें ती भोजनानंतरच खावी. भलत्याच वेळीं खाऊं नये. सकाळचे प्रहरीं अथवा भलत्याच वेळीं खाल्ली असतां मोठा दोष सांगितला आहे. आणि लोकांनीं ती नेमानें खावी, ह्मणूनच पूजा झाल्यानंतर नैवेद्य दाखवून देवास तांबूल ठेवावें आणि मग आपण खावें असें सांगितलें आहे. बरी आठवण झाली. पानसुपारीविषयीं पूजेंत असा एक श्लोक आहे :—‘पूगीफलं महद्दिव्यं नागवल्या दलैर्युतम्। कर्पूरैलासमायुक्तं तांबूलं प्रतिगृह्यताम् ॥’ या श्लोकाचा भाव इतकाच कीं, नैवेद्य झाल्यावर देवास विडा अर्पण करून भोजनाअंतीं आपण खावा. आणखी दुसरें कांहीं नाहीं. तें कांहीं असो; परंतु पानसुपारी खाऊन ओंठ आणि जीभ रंगविणें, हें केवळ नटासारखें दिसतें.

**शोभा०**—तुह्मी सांगतां हें सर्व खरें आहे. पण तुमचें ऐकून घेऊन त्याप्रमाणें आज चालतो कोण ? चालतें तें ठीक, ह्मणून उगीच रहावें, यांतच शोभा आहे.

**राम०**—बरें सांगतां शास्त्रीबावा, हें तुमचें ह्मणणें भोजनबंधूसारिखें आहे. चालतें तें ठीक, ह्मणून आपलें उगीच बसावें. ‘ सासू मरो कीं सासरा मरो, भटाची दक्षिणा मिळाली, ह्मणजे झालें.’ असेंच तुमचें ह्मणणें ना ? आमचें सांगितलेलें ऐकून चालणारे कोठें विरळा, हें मला ठाऊक आहे. परंतु आपला धर्म आपण करावा, जें वाईट आहे, तें लोकांच्या नजरेस आणून द्यावें. हें मला पक्कें ठाऊक आहे कीं, आमच्यासारिख्यांनीं एकादी कल्याणाची गोष्ट सांगितली आणि त्यापासून जरी मोठा लाभ होत असला, तरी बहुतेक आमचे बडे लोक तें कबूल करणारच नाहींत. त्यांचा असा समज आहे कीं, गाडीघोडा असल्याशिवाय त्यांच्या अंगीं विद्वत्ता आणि शहाणपण येणारच नाहीं ! ज्ञान ह्मणून जें कांहीं आहे, तें गाडीघोडेवाल्यांमध्येंच असतें ! अस्तु. आपले विचार तुह्मासारिख्याकडे प्रगट करून दाखवावे ह्मणून बोलतों. आमची कथा काय ?

'कीटस्य कोटायते.' दुसरा कांहीं लाभ झाला नाहीं, तर नसो, परंतु आमच्या मुंबई शहरांतील विद्वान लोकांस तरी या गोष्टी समजल्या, म्हणजे पुरे. आकाशाचें भोंक ठिगळ्या मारून कितीसें नीट होणार, हें समजलेलेंच आहे. आणि तुमची दुसरी एक असी म्हण आहे ना ? 'नगाऱ्याची घाय, तेथें टिमकीचें काय ?'

**शोभा०**—रावसाहेब, यांत आपण नवल तें काय सांगितलें ? 'सर्वे गुणाः कांचनमाश्रयंति,' असें वचनच आहे आणि प्राकृतही अशी म्हण आहे, 'समर्था घरींचें श्वान, त्यास देती सर्वही मान.'

**राम०**—शास्त्रीबावा, या तुमच्या असल्या वाक्यांनीच एवढा घात केला, कोणाजवळ चार पैसे झाले म्हणजे त्याला तुम्ही लागलाच हरभऱ्याच्या झाडावर चढवितां. मग तो करील तो कारभार आणि सांगेल ती पूर्व दिशा. यावरूनच कुणबी लोकांमध्यें एक म्हण पडून गेली आहे कीं, 'राजा करील ती राटावळ, आणि भोम परभ करील ती दिवाळी.' यांत असें सिद्ध झालें कीं, द्रव्यवान् तो विद्वान्, रूपवती ती गुणवती; आणि 'बळी तो कान पिळी,' असेंच ना ? कांहीं वर्षांमागें तुमच्यापैकीं एका श्रीमंताचा मुलगा पुण्याहून एथें आला होता. त्याचें नांव आतां मला बरोबर आठवत नाहीं. पण त्याणें आपल्या शहाणपणाचा मासला बराच दाखविला. त्याची स्वारी वाड्यांतून किल्ल्यांत जायास निघे, त्या वेळीं तो खिजमतगारापाशीं शेंपन्नास खायाच्या पानांच्या पट्ट्या देऊन बाहेर पडे, व एका चाकराच्या हातांत पिकदाणी देई. मग तात्यासाहेब दाहा दाहा पावलांच्या अंतरावर तोंडांतील पानसुपारी पिकदाणींत थुंकून टाकून नवी पट्टी तोंडांत टाकित, आणि क्षणोक्षणीं 'आण रे पट्टी,' 'आण रे पट्टी' हे त्याचे शब्द मात्र लोकांच्या कानीं पडत. मग काय विचारतां ? मुंबईचीं पोरें ! तो रस्त्यांतून जाऊं लागला म्हणजे 'आण रे पट्टी' 'आण रे पट्टी' अशी मोठ्यानें आरोळी ठोकून पळून जात. 'सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ति', या वाक्याचे असेच परिणाम ना ?

**शोभा०**—ठीकच आहे. 'ज्याची खावी पोळी, त्याची वाजवावी टाळी.' 'यथा राजा, तथा प्रजा.' सगळें एकमय करून टाका म्हणजे झालें. तुमचे यजमानच पानसुपारी खात नाहींत; मग ती तुम्हाला कशी आवडेल ?

**राम०**—हा कोणत्या प्रकारचा वाद, शास्त्रीबावा ? 'सब घोडे और बारा टक्के' ह्यासारखें तुमचें भाषण आहे. ह्या तुमच्या म्हणण्यावरून तुम्ही आपल्या शास्त्रासच आपल्या हातानें हरताळ लावतां असें झालें. बरें, तुम्हीच ईश्वरास भिऊन मला सांगा, दिवसभर पानसुपारी खाऊन जिकडे तिकडे पिचकाऱ्या मारणें व पोरांबाळांनीं निर्भीडपणें पानसुपारी खाऊन व्यसनांत पडणें, हें शास्त्रोक्त असून तुम्हाला

आवडतें ना ? शास्त्री, पंडित, पुराणीक यांणीं हातीं पानसुपारीची चंची घेऊन फिरावें आणि मिळेल तिकडे बसून पानसुपारी खाऊन थुंकावें, हें प्रशस्त आहे ना ?

**शोभा०**—रावसाहेब, ज्या अर्थी तुह्मी माझ्या काळजासच हात घातला, त्या अर्थी माझा बेइलाज. जें आहे तें तुह्माला वास्तविक सांगतों. तुह्मी सांगतां हें सर्व शब्दशः खरें आहे. परंतु उगीच आपण दांत खावून अवलक्षण कां व्हावें ? असें माझें ह्मणणें आहे. आपलें बोलणें कोण ऐकतो, ह्मणून उगीच राहातों. बोलल्याअंतीं कोणास बरें वाटतें; कोणास वाईट वाटतें.

**राम०**—बरें शास्त्रीबावा, उशीर झाला; आतां मी अंघोळीस जातों. आपण यावें. अवकाश सांपडल्यास चारआठ दिवशीं कधीं भेट घ्यां.

**शोभा०**—येऊं ह्मणजे काय ? आपण तर कल्पतरूच आहां. आपल्या पायांवांचून आह्मांस गत्यंतर नाहीं. 'आशया बद्धयते लोकः'

'यस्मिन्देशे न संमानो न वृत्तिर्न च बांधवाः ।
न च विद्यागमोऽप्यास्ते वासं तत्र न कारयेत् ॥'

(असें ह्मणून शास्त्रीबावा निघून जातात.)

## प्रवेश ४

(शामबाईस हळदकुंकवास चंदनवाडींत जायाचें ह्मणून ती आपल्या मुलीस सुमारें दोन वाजतां केश उगवून तयार व्हावयास सांगून आपण केश उगवायास बसते. ती सुमारें साडेचार वाजतां केश उगवून व तोंड धुऊन खोलींतून बाहेर येते, आणि चाकरास हाक मारून ह्मणते. 'सोन्या, असा ये.')

**सोन्या**—जी, काय सांगतां ?

**शाम०**—जा रे, त्या तांबोळ्याच्या दुकानावरून दोन दिडक्यांची पानसुपारी आणि अर्धीचा खायाचा बारीक तंबाखू आण.

**सोन्या**—दिडक्या कोठें आहेत ?

**शाम०**—जा, उदार घेऊन ये. मग त्याच्या दिडक्या देतां येतील.

**सोन्या**—तो उदार द्यावयाचा नाहीं. त्याचे मागचे साडतीन आणे आहेत, त्यांसाठींच तो सकाळीं कुरकूर करीत होता. काय तुमची चाल ही ? वाण्याकडून तुम्हीं

उदार आणतां आणि वेळचे वेळीं त्याचे पैसे देत नाहीं. तो मला लोकांदेखत फडाफड बोलतो.

**शाम०**—नको आणूं त्याचें उदार. तुजजवळ दोन दिडक्या असल्या, तर घेऊन जा, तुला संध्याकाळीं ते आले, म्हणजे देईन.

**सोन्या**—होय, माझ्यापाशीं दिडक्या कोठच्या ? पण तुमची बहिण आली होती, त्या दिवशीं तुम्ही माझ्या दोन दिडक्या उसन्या घेतल्या होत्या, त्या मला अजून दिल्या नाहींत. ही काय तुमची खोड ? आमच्या गरिबाची दुगाणी तेव्हांच देऊन टाकावी.

**शाम०**—हो रे मेल्या, उगीच बयाती लावूं नको. मेल्या, दिडक्या देतां येतील. तूं काय पळून जातोस ? बरें जा, आणि पानसुपारी आण.

**सोन्या**—पण ती मी दिडक्यांशिवाय कशी आणूं ?

**शाम०**—( थोडीसी रागें भरून ) जेव्हां तेव्हां मेल्या तुझी असीच कटकट. ( मुलीस हांक मारून ) साळू, येथें ये.

**साळू**—कां बये, मला कां हाक मारिली ?

**शाम०**—जा, पार्वतीबाईजवळ मी दोन दिडक्या मागतें, ह्मणून सांग.

( साळू जाऊन पार्वतीबाईपाशीं दोन दिडक्या उसन्या मागते. ती 'आपणापाशीं नाहीं' म्हणून सांगते, आणखी निरोप पाठविते कीं, 'त्या दिवशीं तुह्मीं माळयास देण्याकरितां पावली घेतली होती, ती कृपा करून पाठवून द्या. माझी खर्चाची ओढ आहे.' तो निरोप घेऊन साळू शामबाईस सांगते :—' बये, पार्वतीबाईजवळ दिडक्या नाहींत. ती उलटे तूं देणें आहेस, ते चार आणे मागते.')

**शाम०**—ह्या मेल्या सोन्याचा अपशकुन जाईल तिकडे नडतो. मेल्याची वाचाच वाईट. बरें, तूं आतां जा आणि कोणापाशीं तरी दोन दिडक्या मागून आण.

( साळू जाऊन काकीपाशीं दोन दिडक्या मागते. ती चुरमुरत चुरमुरत दोन दिडक्या काढून देते, आणि ह्मणते :—' तुह्माला काय ? आपलीं कामें झालीं, ह्मणजे झालें. मी आपल्या कामांत, त्यांत तुह्मांला दिडक्यांची घाई. नाहीं ह्मटलें असतां राग येईल.')

**साळू**—( त्या दिडक्या घेऊन व धांवत धांवत आईपाशीं जाऊन ) बये, ह्या घे दिडक्या.

( त्या दिडक्या घेऊन सोन्या पानसुपारी आणतो. )

**सोन्या**—बाई, ही घ्या पानसुपारी. पण जिकडे तिकडे थुंकून घाण करूं नका हो. काय तुम्ही लोक हिडुस ! झाडूस हात घालावा, तर ती पिकेने भरलेली. दिवाणखाण्यांत झाडायास जावें, तर माझा हात बचाबच थुंकीनें भरतो. भिंती सगळ्या लाल होऊन गेल्या आहेत. असे काय तुम्ही मोठे लोक ! कुणब्यांचीं घरें तरी बरीं. आमच्या कुणब्यांच्या बायका अशा जिकडे तिकडे थुंकायाच्या नाहींत व सगळे दिवस पानसुपारी चावित बसायाच्या नाहींत. तुम्ही श्रीमंत असून ही तुमची वाईट चाल. 'रेड्यांचें जोत आणि बायकांचें गोत.' कुळवाड्यांची अशी म्हण आहे.

**शाम०**—( रागें भरून ) मेल्या, बडबड लावूं नको. दोन रुपयांचा चाकुरडा तूं. तुला रे आमच्या मोठ्या लोकांची गोष्ट कशाला पाहिजे ? तुमच्या बायका भिकारी. त्यांला पानसुपारी कोठून खायास मिळेल ? आमच्या घरांत आम्ही पाहिजे तें करूं; तुला त्याचें काय ? मी आतां एथेंच थुंकेन. ( असें म्हणून मध्येंच भिंतीवर पिकेची पिचकारी मारते. )

**सोन्या**—आणखी शिव्या द्या आणि थुंका ना बापडीं ? कावळ्याच्या शापानें कोठें ढोर मरतें ? उलटें तुमचेंच घर बिघडेल. मला हजार घरें. मी मागें एका शेटच्ये घरीं चाकरीस होतों, त्याचे घरीं एके दिवशीं जेवणावळ होती. आणि मग काय विचारतां ? बायकांनीं जिकडे तिकडे थुंकून घाण केली व खुरच्यांस, टेबलांस, सत्रंजीस, कोचींस, चुना लावून नासून टाकिल्या; मग त्या गेल्यावर शेट फारच रागावले. त्यासाठीं मी तुह्मास बोललों. गरिबावर उगीच कां रागें भरतां ? मी बापड्यानें तुमचें काय केलें ? 'कुळवाडीभाई, वांकडा तिकडा जाई.'

( शामबाई त्यांतील पानसुपारी आपण खाते व मुलीस देते आणि शाल घेऊन बाहेर निघून ओटीवर येते, तों तोंडांतील पानसुपारी सरते. इतक्यांत ती आपल्या मुलीस ह्मणते :—'जा ग, माझा पानपुडा घेऊन ये.' साळू तो आणून देते. त्यांतील विडा घेऊन तोंडांत टाकते, इतक्यांत सोन्या ह्मणतो, 'बाई, आतां रस्ताही थुंकून भरायाचा काय ? आमचे एक हात भरतात ते भरतात. रस्त्यांतील लोकांचे पाय कां भरितां ? )

**शाम०**—सोन्या, आतांशी तुझी जीभ फारच लांब झाली आहे. तूं फारसें करशील तर, ते आले, ह्मणजे तुला आमच्या आज रजा देववीन.

**सोन्या**—आतांच द्या ना बापडी ? पण रस्त्यांतून तुह्मी थुंकत थुंकत जातां, तेव्हां तें पाहून रस्त्यांतील लोक तुह्माला कायसेंच बोलतात. तें माझ्यानें ऐकवत नाहीं. तुह्मां मोठ्या लोकांला रस्त्यांतील लोकांनीं हंसावें काय ?

**शाम०**—बरें, बरें, तूं आपलें तोंड संभाळ. मला लोक हंसले तर हंसूं दे. (असें ह्मणून शामबाई हळदकुंकवास जाते. तेथें बायकांची रेंटारेंटी आणि एकच गोंगाट होऊन गेला होता, त्यांत घुसून मोठ्या जुलुमानें दोन नारळ घेऊन चुरमुरत चुरमुरत बाहेर निघते, आणि पायरी उतरतेवेळीं असे शब्द बोलते :—‘ कशाला हे लोक फाटक्या फिशाऱ्या करितात. आपल्याला सामर्थ्य नसलें तर नारळ वाटूं नये. बायकांस कां उगीच मेहनत देतात ? घरच्यांचे नारळ द्यायाचे, ते दिले नाहींत आणि हीं दोन बोंडकीं काढून माझ्या हातांत दिलीं. आज आमचे पंचवीस नारळ द्यावयाचे, ते दिले नाहींत. जळल्या मेल्यांच्या फिशाऱ्या. त्यांच्या बुकांला आणि व्याख्यानांला काय हळद लावावी ? ’ मग सोन्याकडे तोंड फिरवून ह्मणते, ‘ तुला ठाऊक आहे ना रे ? आमच्या सुनेचा सोहाळा झाला, त्या वेळीं किती नारळ आणि बतासे लागले होते ते ? आह्माला दोन हजार नारळ आणि दाहा मण बतासे लागले होते. हे भिकारी लोक, कराटीचे तुकडे मेले, यांच्या दारीं येतो तरी कोण फिरून ? आमचें बा असें नाहीं. ‘ जेवीन तर तुपाशीं, नाहीं तर उपाशी ’, असें ह्मणून तोंड मुरडीत मुरडीत चालते. )

**सोन्या**—होय, मला ठाऊक आहे. तेव्हां तर घरांत लयच गर्दी, तंटे आणि गोंगाट झाला होता. आणि तमासा बगायास तर रस्त्यावर किती लोक जमले होते ! ते काय बतासे ! एक एक पायलीच्या तळाएवढाले होते. आणि तेव्हां चौघडा तर एकसारखा पंधरा दिवस दारासीं वाजत होता. त्याला आज एक वर्ष झालें, नाहीं ? पण बाई, तुह्मी मोठे लोक नारळासाठीं जातां कीं, आपल्या जातीस व सोयऱ्यांस मान देण्यास ? तर मग ‘ सोसील तोटा, तो होईल मोठा ’, ही ह्मण काय उपयोगाची ? बरी याद झाली. शेटनीं त्या नारळवाल्याचे आणि मारवाड्याचे पैसे अजून चुकविले नाहींत. परवांचे दिवशीं सकाळीं तर तो वाणी येऊन शिव्यागाळी करित होता, आणि बतासेवाल्यानें तर तीन विसा रुपयांचें शेटला सामान दिलें आहे, असें घरांत धाकटे शेट म्हणत होते. असली ही श्रीमंती काय कामाची ? ही तुमची चाल मोठी वाईट. असी मारामारी करून नारळ घ्यावयास तुम्हा मोठ्या लोकांला शरम तरी कसी वाटत नाहीं ?

**शाम०**—( मनांत थोडीशी दचकून ) त्या गोष्टी तुला कशाला रे पाहिजेत ? ज्यांत त्यांत तूं कशाला तोंड घालतोस ? ती त्यांच्या आफिसामधल्या कांहीं जामिनगिरीच्या पैशांची गोष्ट असेल.

**सोन्या**--नाहीं, नारळाचेच. नारळवाला त्या दिवशीं फडाफड शेटला शिव्या देत होता, तें मीं ऐकिलें.

( हें त्याचें भाषण ऐकून मनांत खिन्न होऊन चडफडत चडफडत शामबाई घरीं आली, आणि हळदकुंकूं करणाऱ्या बाईस शिव्या देत बसली. )

' वाऱ्यावर ज्याचें पान, त्याचा होईल सदा अपमान. '

---

## प्रवेश ५

( बाळास रोज घरांतून दोन खेपा सकाळची आणि संध्याकाळची आईकडून पानसुपारी खायास मिळे, परंतु तेवढ्यांत तृप्ति न होतां तो रोजचे दोन दिडक्यांचे विडे बाबाजीच्या दुकानावरून घेत असे. सकाळचे प्रहरीं दहा वाजतां चाकरीवर जातेवेळीं दिडकीची पानसुपारी घेऊन, त्याणें आणि अंतूनें खावी; आणि दोन विडे तयार करवून आफिसांत खाण्यासाठीं न्यावे. याप्रमाणें त्याणें सतत दोनतीन महिने पानसुपारीचा उदार कारखाना चालविला. शेवटीं बाबाजी त्याला तगादा लावितो. तो त्याला मोस्तराची मुदत करितो. मग त्यांची रस्त्यांत मारामारी होते. आक्टोबर महिन्याच्या तारिखेस बाबाजी त्याच्याजवळ पैशाविषयीं बोलणें लावितो. )

**बाबाजी**—शेट, तेवढे ते तीन रुपये आज द्या हो. आज मोस्तर आहे. उद्यां मला तंबाखू आणायाचा आहे. पाहा, आज दोन मोस्तरें तुह्मी मला ठकविलें. आज संध्याकाळीं जरूर देऊन जा हो.

**बाळा**—हो अलबत्ता. आज मोस्तर आहे. तुह्माला पाहिजे असल्यास पांच रुपये जास्ती देईन. मग मी ते सावकाश पानसुपारींतून फेडून घेईन.

**बाबा०**—मग काय विचारतां ? दुधांत साखर. आंधळा काय दोन डोळे मागतो ?

( असें ह्मणून बाळा आणि अंतू पानसुपारी खात मिरवत कोटांत गेले. मग बाळास सुमारें तीन वाजतां पंधरा रुपये पगार आला. इतक्यांत त्याचा एक कर्जदारी मारवाडी ते रुपये त्याजकडून सगळे घेतो. मग अंतू मोठी रदबदली करून मारवाड्याकडून तीन रुपये परत घेऊन बाळास देतो. तेवढे खिशांत घालून बाळा मोठा विचारांत बसला आहे; त्यास अंतू ह्मणतो :—' बाळा, आज बाबाजीचा वायदा आहे. त्याचें कसें काय करशील ?

**बाळा**—आज पगार झाला नाहीं, असें सांगूं. पुढचें पुढें पाहातच आहें.

( मग बोलत बोलत ते दोघेजण धोबीतळ्यापर्यंत आले. नंतर बाळानें आपल्या खिशांतील तीन रुपये काढून अंतूजवळ ठेवायास दिले. इकडे बाबाजी दुकानावर यांची

वाट पाहात बसला होता, त्याणें तें पाहिलें, मग ते दोघेजण बाबाजीच्या दुकानावर येतात. आणि बाबाजी त्यांजवळ पैसे मागतो. )

**बाबा०**—काय शेट, आज आमची बाकी चुकवता ना? उशीर कां लावितां? देऊन टाका परती.

**बाळा**—( थोडेसें तोंड वाकडें करीत ) काय करावें? आमचा शिनोर आज महाबळेश्वरास गेला. त्यामुळें आठपंधरा दिवस पगाराचा खोळंबा झाला. पगार झाला, ह्मणजे तुम्हाला पहिल्यानें देईन. भिऊं नका. हिंमत धरा.

**बाबा**—( थोडा रागानें ) काय? काय? जळली तुमची हिंमत. मोठा सावकाराचा लेंक आला आहे पानसुपारी खाण्यास! आज तीन महिने पानसुपारी खाऊन अजून मला पैसे देत नाहीं आणि भलत्याच बयाती सांगतो! तुह्मी आतां तुमच्या सोबत्याजवळ पैसे नाहीं दिले, अशी शपथ खाल? तुमचा आज तीन वाजतां पगार झाला. मला केव्हांच समजलें. भला माणूस कोणी असा दुकानावर येऊन उदार पानसुपारी खात नाहीं.

( असें ह्मणून त्याच्या खिशास हात घालतो. इतक्यांत त्या दोघांची लटापटी होते. आणि बाळाचें प्याजी चक्री पागोटें गटारांत पडतें. मग दुकानावर एकच घोळ होऊन जातो. तेव्हां रस्त्यांतील दोघेचौघे सभ्य गृहस्थ मिळून त्या दोघांची समजूत करितात; आणि बाळास घरीं लावून देतात. मग दुसरे दिवशीं बाळाचा बाप येऊन तांबोळ्याचे पैसे चुकवून देतो. आणि मुलाच्या दुर्गुणाविषयीं खंती होऊन हा पुढील श्लोक ह्मणतो :—‘कोऽर्थः पुत्रेण जातेन यो न विद्वान्न धार्मिकः। काणेन चक्षुषा किं वा चक्षुःपीडैव केवलम्॥’



## प्रवेश ६

( आदित्यवारीं सुमारें दोन प्रहरचे अडीच वाजतां शास्त्रीबावा येतात. मग त्यांचें आणि रामरावाचें भाषण होतें. )

**राम०**—या शास्त्रीबावा. पुष्कळ दिवसांनीं कोठून आलां? अलीकडे तुमची भेटच दुर्लभ झाली.

**शोभा०**—पुष्कळ दिवस ते कसचे? आज सुमारें दोन वार झाले, आपलें आणि माझें पानसुपारी प्रकरणीं भाषण झालें होतें. इतकाच काळ काय तो मध्यें गेला. आतां

काय, आमचें प्रस्थान उठावयाचें. परवांकडे गांवीं जावयाचा बेत आहे. आपला निरोप घेण्यासाठीं आलों होतों. बरें रावसाहेब, अलीकडे या लोकांची काय स्थिति झाली आहे ? आज सकाळपासून दोन तासपर्यंत स्नेहीमंडळीस भेटत भेटत हा आलों. परंतु अद्याप पांडव ( पांच रुपये ) देखील जमले नाहींत; ह्मणजे पाहा. एवढी स्नेही मंडळी असून कांहीं फळ नाहीं. काय हो सांगावें ? जिकडे जावें तिकडे आपलें रडगाणें आहेच. कोणी महागाईविषयीं बोलतो. कोणी पगार कमी झाला, ह्मणून हाका मारितो. कोणी मुलाच्या लग्नाच्या काळजींत गर्क आहे. कोणी कर्जाच्या धास्तीमध्यें चिंताग्रस्त होऊन बसला आहे. याप्रमाणें जिकडे जावें तिकडे जो तो आपआपलें दुःख सांगतो. परंतु धर्माची वासना कोणास नाहीं. सारांश काय, एकून कठिण काळ आला आहे खरा. होय, रावसाहेब, बरी आठवण झाली. अलीकडे या अर्ज्यांची काय धामधूम चालली आहे ? कोणी सांगतात कीं, धंदा रोजगार व उदमी लोकांच्या उत्पन्नावर सरकार कर बसविणार आहे, हें कसें काय ? आज एवढे दिवस मी आपल्या घरीं येतों, पण आपण याविषयीं कधीं चकार शब्द बोललां नाहीं, हें पाहून मला नवल वाटतें. पण मुंबईचे बडे लोक मोठे परोपकारी आहेत खरे. त्यांच्या अंगीं भूतदया खरी हो ! रयतेच्या कल्याणासाठीं ते किती झटतात ? किती हो हा उदारपणा ! आपला धंदारोजगार ख्यालीखुशाली सोडून लोकांचें दुःख निवारायास ते इतके परिश्रम घेतात ! आजपर्यंत आम्हीं कोंकणांत असें ह्मणत आलों कीं, 'परदुःखेन दुःखिता विरलाः' परंतु या मुंबईकर गृहस्थांनीं हें वाक्य निखालास खोटें केलें. बाहेरगांवीं असे उदार गृहस्थ सांपडणें कठीण. यावरूनच एक कवि असें ह्मणतो :—' श्रुतिवाग्दृष्टिहरणं कुरुते लक्ष्मीः ' मुंबई ही पुण्यभूमिका खरी. परंतु आमचें प्रारब्ध कोठें उघडत नाहीं. कोठेंही गेलें तरी पळसाचीं तीन पानें चुकत नाहींत. ' एकश्चंद्रस्तमो हंति न च तारा सहस्रशः '

राम०—शास्त्रीबावा, ' परदुःख शीतल ' हेंच खरें आहे. हां ! दुसऱ्यांच्या दुःखाचा कळवळा बाळगणारे विरळा हें खरें आहे. आणि तुमचा दुसरा संस्कृत श्लोक आहे ना ? ' शैले शैले न माणिक्यं मौक्तिकं न गजे गजे । साधवो नहि सर्वत्र चंदनं न वने वने ॥ ' यांतच तुह्मी समजा, ह्मणजे झालें. व्यापारी आणि उदमी लोकांच्या उत्पन्नावर कर बसणार, ही गोष्ट खरी आहे. परंतु यांत मोठ्या लोकांचा फारसा तोटा नाहीं, असें ह्मणतात. जे गृहस्थ आपली मालमत्ता व स्थावर जिनगी यांवर उत्पन्न करून राहाणार, त्यांस या नव्या कायद्यापासून कांहीं भय नाहीं असें सांगतात. हा कायदा केवळ उद्योगी व गरीब लोकांसच लागू आहे. परंतु तें कांहीं असो. याविषयीं सध्यां मी बोलायास इच्छित नाहीं. होईल तें दृष्टीस पडेल. दहा जणांची वाट ती आमची वाट आह्मी बोललों ह्मणून काय व्हावयाचें आहे ? ह्मातारीनें कोंबडें झाकून ठेविलें ह्मणून उजाडायाचें राहातें काय ? परंतु एक गोष्ट मला वाईट वाटते. ह्या

अर्ज्यांबद्दल कित्येक गृहस्थांचें वैमनस्य पडलें आहे, असें सांगतात. तर माझ्या बुद्धीस असें वाटतें कीं, त्या भावी करापेक्षां ही गोष्ट अधिक दुःखाची आहे. गृहकलहच उत्पन्न झाला, मग तेथें सुख कोठून असणार ? अंतीं करायास गेलें एक आणि झालें वेक, असें झालें नाहीं ह्मणजे पुरे. लोकांवर कर बसायाचा तो बसेलच, पण शेवटीं 'भटो भटो आपल्या वाटो,' 'भिक नको पण कुत्रा आवर', असें होईल. आमच्या लोकांत मुळींच एकी नाहीं, आणि असें झालें ह्मणजे पुरे हाल. रडके राऊत घोड्यावर बसले मग सुकाळास काय कमी ? 'तिर्कीच्या तीन पायल्या पराक्रम.' एकी हेंच बळ; तेंच नाहींसें झालें ह्मणजे काय विचारतां ? 'मनःपूतं समाचरेत्.' मोठे लोकच जर एकमेकांस पाहून पाठ फिरवूं लागले, तर मग सहजच लोकांमध्यें दुफळ्या होतील आणि कोणी कोणाच्या कल्याणाकडे झटणार नाहींत. नंतर लोकांच्या सुखावर आंवळ्याएवढें शून्य असें समजावें. हिंदु लोकांची शेवटीं यादवांसारिखी अवस्था झाली नाहीं, म्हणजे पुरे. एवढीच मी ईश्वरापाशीं प्रार्थना करितों. बरें, तें असो. शास्त्रीबावा, परंतु तुम्हास मी एक कल्याणाची गोष्ट सांगतों. त्यावर तुम्ही अवश्य लक्ष दिलें पाहिजे. तुम्ही चार अक्षरें पढलेत आहां आणि विद्वानांत खपतां, तर तुम्ही लोकांच्या घरोघर जाऊन जायाच्या वेळीं देशावर करावा, यांत तुह्मांला फार हलकेपणा आहे. जो तो आपआपल्या संसारांत चूर आहे. त्यास जाऊन उपद्रव देणें हें ठीक नाहीं. मी सांगतों म्हणून वाईट धरूं नका. पाहा ! उद्योगाअंतीं जे तुम्हाला चार रुपये मिळाले, ते घेऊन गांवीं जाणें, हें प्रशस्त आहे. परंतु पांचदाहा रुपयांसाठीं ज्याच्या त्याच्या दारांत याचना करीत फिरावें, यामध्यें तुमच्या विद्येस बट्टा लागतो. आणि ही भिक्षुकवृत्ति फार हलकी आहे. ही सोडाल, तेव्हांच तुह्मी लोक सुखी व्हाल, तुम्हीच विचार करून पाहा; हरदास, शास्त्री वैदिक, पुराणिक ह्मटले म्हणजे प्रतिष्ठित; त्यांणीं उद्योगाअंतीं जें निष्पन्न होईल, त्यांत संतुष्ट असून आपल्या मानाचें रक्षण करावें, हेंच प्रशस्त व सुखदायक. व्यवहार-शास्त्रांत असें आहे कीं, ज्या देशांत भिक्षुक पुष्कळ तो देश दरिद्री होतो. याचा विचार करण्याचा हा समय आहे. ह्मणून अर्थातच आतां मागचे दिवस नाहींत. याकरितां तुह्मी सावध असावें. 'देहीति वचनं कष्टं', हें तुह्मांला ठाऊक असेलच. याशिवाय मुंबईत लोकांस चार पैसे मिळतात खरे, परंतु जिकडचे तिकडे; कोठून तरी दिवस साजरा करावा इतकेंच. 'खाड्याची माती खाड्यास,' 'घोडा खाई भाडें.' लोकांच्या मिजासी मात्र पाहाव्या. बहुतकरून उत्पन्नभक्षी लोक पुष्कळ. असा सध्या मुंबईतील रोजगाऱ्यांचा प्रकार आहे. 'उभा तों शोभा.' दुसरें कांहीं नाहीं. मला जें तुह्मांस द्यावयाचें, त्याविषयीं मी बोलत नाहीं. मजसाठीं तुह्मी कांहीं उद्योग केला आहे, त्याबद्दल जें तुम्हाला देणें देतों; परंतु तुह्मी आमचे परम मित्र असून तुम्हाला कोणी वाईट बोललेलें माझ्यानें ऐकवत नाहीं. इतक्यासाठींच तुम्हापाशीं

ही गोष्ट काढिली. आणि दुसरें, त्या दिवशीं मी संस्कृत पुस्तक वाचीत होतों, त्यांत मला हा श्लोक आढळला. त्याचा अर्थ मला आपण स्पष्ट करून सांगावा. 'तृणादपि लघुस्तूलस्तूलादपि च याचकः। वायुना नैव नीतोऽसौ मामपि प्रार्थयेदिति ॥'

**शोभा०**—ठीकच आहे. याचा अर्थ विशेष काय सांगावयाचा? तृणापेक्षांही कापूस हलका आणि त्याहून ही हलका याचक, एवढाच अर्थ. दुसऱ्यापाशीं मागणें ह्मणजे आमच्या तरी कंठीं प्राण येतो बरें! आणि मी तरी कोठें सर्व काळ देशावर करीत फिरतों. तुह्मासारिखे इष्ट आहेत, तशा ठिकाणीं मात्र जातों. कारण असें सांगितलें आहे कीं, 'इष्टं धर्मं च कारयेत्.' परंतु याचा तरी विचार करणारे कोठें आहेत? काय सांगा याचें रावसाहेब, लोक आपआपल्या त्रासांत आहेत, असें तुह्मी ह्मणतां खरें, परंतु त्यांतही कांहीं विचार करावा. कांहीं तरी धर्माकडे लक्ष असलें पाहिजे. त्या दिवशीं मी एका मित्राकडे गेलो होतों आणि पाहातों तों, तो मोठ्याच लग-बगींत होता. ती लगबग कसची ह्मणाल, तर मुलीस फोडे काढले होते, त्याचा नवस फेडण्यास शेंदोनशें रुपये खर्चायाची, व गाड्या घोडे व पालख्या जमवायास बडे लोकांची खुशामत करायास फिरायाची. तसाच दुसऱ्या एका मित्राला मुलगा झाला, त्याणें पुत्रोत्साहाबद्दल नाचतमाशे, गाणेंबजावणें, यांत सुमारें चारशेंपांचशें रुपये खर्च केले, आणि मी दृष्टीस पडतांच भिवयांस आंठ्या घालून संसारखटल्याचें रडगाणें काढिलें. आणि शेवटीं त्याच्यानें चार आणेदेखील उचलून देववत नाहींसे झाले. हे गृहस्थ दरमहा पन्नाससाठ रुपये कमावणारे आहेत, हें मी कबूल करितों. परंतु भलत्याच ठिकाणीं असा उधळेपणा कां करावा? हा दुर्गुण नव्हे, असें कोण म्हणेल बरें? यावरून मला या पुढील आर्येचें स्मरण होतेंः—याचक दृष्टी पडतां आला कीं काय काळसा वाटे। वेश्याजनासि देतां केलें धर्मोक्त कार्यसें वाटे। '. आणि बहुतेक लोकांचें सध्यां आचरण असेंच आहे, बरें!

**राम०**—बरें शास्त्रीबावा, ती गोष्ट असों द्या आतां. परंतु धर्म करणें तो केवळ दरिद्री अनाथ यांसच करावा ,असें आहे. जर तुह्मी 'इष्टं धर्मं च कारयेत्', असें ह्मणतां, तर मग ह्या पुढील श्लोकाचा अर्थ कसा करावा? 'दरिद्रान्भर कौन्तेय मा प्रयच्छेश्वरे धनम्। व्याधितस्यौषधं पथ्यं नीरुजस्य किमौषधम् ॥' इष्टमित्र, सुहृत्संबंधी यांस आपलें सामर्थ्य असलें तर द्यावें. त्याविषयीं माझें ह्मणणें नाहीं. परंतु तो धर्म नव्हे. आणखी गरिबास कांहीं दिलें, ह्मणून आपण कृतकृत्य झालों, असें कोणी समजूं नये. मनुष्यानें सर्वांस उपयोगी पडावें, हा त्याचा धर्मच आहे. जें आपण द्रव्य कमावितों, तें सार्थकास लावावें. 'उपार्जितानां वित्तानां त्याग एव हि रक्षणम्। तडागोदरसंस्थानां परिवाह इवांभसाम् ॥' असें आहे ना? बरें, पण आपण पानसुपारीविषयीं कांहीं शोध

केला होता काय ? त्याविषयीं फार बोलण्यास मला अवकाश नाहीं. मला सभेस जायाचें आहे. थोडक्यांत कांहीं बोलणें असल्यास बोलावें. 'अहृद्यां तहत्पर्यां.'

शोभा०—होय रावसाहेब, मी त्याचा शोध बराच केला. वैद्यकांत असें आहे कीं, भोजनानंतर शतपदी केल्यावर त्रयोदशगुणी तांबूल भक्षण करावें. आणि दुसरें असें आहे कीं, पानसुपारी ही अन्नपचन होण्यासाठीं खावी, व त्या विड्याचा जो रस येईल तो बाहेर टाकूं नये. विडा खाण्याचा मुख्य उद्देश हा आहे कीं, अन्न पाचन होण्यास जी लाळ आवश्यक आहे, तिची वृद्धि व्हावी. यास्तव पानसुपारी खाणारानें हवी असल्यास दिवसांतून ती एकादे वेळीं खावी; परंतु पीक बाहेर टाकूं नये. ह्याशिवाय दुसरें असें आहे. पानसुपारी फार खाल्ली असतां त्यापासून तोंडाचा स्वाद जातो, क्षुधा मंद होते, आणि शरीर निस्तेज होऊन दांत लवकर पडतात, असे अनेक उपद्रव होतात. 'अति खाणें आणि मसणांत जाणें.' ह्मणून पानसुपारीचें व्यसन कोणी लावून घेऊं नये. जसें तपकिरीपासून घ्राणेंद्रिय मंद होते, व तंबाखूपासून कफाधिक्य होतें, तसेंच पानसुपारी दिवसभर खाल्ल्यानें रसनेंद्रिय बिघडतें आपण पानसुपारीविषयीं भाषण केलें, तेव्हांपासून मी याचा विचार करूं लागलों. आणि आतां तिचा मला फार कंटाळा येऊं लागला. 'वादे वादे जायते तत्त्वबोधः' असें ह्मटलें आहे, तें काय उगीच ? खरेंच, आमच्या बिऱ्हाडीं कांहीं गृहस्थ आहेत, ते सकाळचे प्रहरीं उठतांच सकृद्दर्शनीं अंथरुणावर चंची सोडून बसतात, आणि पानतंबाखू तोंडांत टाकून मोठ्या महालांत ( शौचकूपांत ) जातात, व तेथें थुंकून घाण करितात आणि मग येऊन तोंड धुतात. किती हो हा मळीणपणा ! पानतंबाखू तोडांत असतांना बोलावें लागलें, तर किती हो अडचण पडते ! कित्येक तोंडांतून पीक वस्त्रांवर पडेल, ह्मणून नेहमी ओंठ सांवरण्याच्या उद्योगांत असतात व बोलण्याच्या वेळीं त्यांस फारच श्रम पडतात. असो. आपणास आतां वेळ नाहीं, म्हणून मी कांहीं बोलत नाहीं. सारांश, कोणतेंही व्यसन म्हटलें, म्हणजे फारच वाईट आहे आणि पानसुपारीची ही म्हटली असतां लोक उगीच चटक लावून घेतात, दुसरें कांहीं नाहीं. व्यसनी, आळशी व द्रव्यवान यांस धर्म करूं नये, ह्याविषयीं माझेंही मत तसेंच आहे. पण आम्हाला लाचारीनें आंधळे केले आहेत, त्यामुळें बेइलाज.

राम०—बरें शास्त्रीबावा, पानसुपारीचें व्यसन वाईट आहे व आळशी, निरुद्योगी, वाऱ्यावर गहूं दळून खायास इच्छिणारे असे आहेत. त्यांस धर्म करणें हें व्यर्थ, असें तुमच्या मनांत बिंबलें, हें पाहून मला फार संतोष झाला. याचप्रमाणें दुसऱ्या लोकांची समजूत पडली ह्मणजे पुरे. इतकेंच ईश्वरापाशीं मागतों. तंबाखू, तपकीर, पानसुपारी या औषधी आहेत. आणि त्यांचा औषधासारिखाच लोकांनीं उपयोग करावा, एवढेंच माझें ह्मणणें आहे. मनुष्यानें विनाकारण दुर्व्यसनें लावून घेऊन आपणास लांच्छन

आणूं नये, हाच माझ्या ह्मणण्याचा आशय. मनुष्यास विद्या व ईश्वरसेवा यांवाचून दुसरें व्यसन नसावें, अशी एक आर्या होती. ती मला आतां सगळी आठवत नाहीं, त्यांत एक असें होतें :—' विद्याभ्यसनं व्यसनं किंवा भगवत्पदांबुजस्मरणम्. '

( असें ह्मणून रामरावानें पांच रुपये आणून शास्त्रीबावांस दिले. मग शास्त्रीबावांनीं निरोप घेऊन उठून जातांना असें म्हटलें:–' वर्तमानेन कालेन प्रवर्तंते विचक्षणाः)'

' अर्थाः पादरजोपमा गिरिनदीवेगोपमं यौवनम्
आयुष्यं जललोलबिंदुचपलं फेनोपमं जीवितम् ।
धर्मं यो न करोति निश्चितमतिः स्वर्गार्गलोद्घाटनम्
पश्चात्तापयुतो जरापरिगतः शोकाग्निना दह्यते ॥ '

गृह्यसूत्र

समाप्त.



# CALIGRAPHY

# सुलेखनविद्या

हा ग्रंथ

गोविंद नारायण

ह्यानीं रचिला



मुंबईमध्यें

टामस ग्रेहाम यांच्या छापखान्यांत छापिला.

सन १८६०

# अनुक्रमणिका

## प्रकरण १

साधारण विचार.

## प्रकरण २

विचार प्रगट करण्याचीं साधनें—वाणी आणि लिपि-लेखक कसा असावा—अनेक भाषा व लिपिज्ञान, मुलाचें मुख्य साधन.

## प्रकरण ३

लिपीचा उद्देश—अक्षर वळविण्याची आवश्यकता—प्रत्येक लिपीचें वळण निरनिराळें—अक्षर वळविण्याविषयीं आळस—आमच्या मोठ्या लोकांचें शिकण्याकडे दुर्लक्ष—व ह्याचीं उदाहरणें.

## प्रकरण ४

हिंदू लोकांस बाळबोध आणि मोडी लिपि शिकण्याची आवश्यकता—मोडी लिपीची रचना—हेमाडपंताची एक गोष्ट—मारवाडी व मुलतानी लोकांचा अक्षर वळविण्याविषयीं आळस—वाईट अक्षरापासून परिणाम.

## प्रकरण ५

निरनिराळ्या लिपीचें वळण—अक्षर काढण्याची रीति—इंग्रजी अक्षर वळविण्याचीं साधनें—आमच्या लोकांची लिहिण्याचीं आयुधें ठेवण्याची उपेक्षा—अक्षर चांगलें असल्यापासून लाभ—अक्षर चांगलें काढण्याविषयीं बोध-लिहावयास बसण्याची जागा.



# प्रकरण १

मनुष्य हा विचारी प्राणी आहे, ह्मणून त्याच्या सर्व कृत्यांत त्याला विचार करूनच चाललें पाहिजे. आतां कित्येकांस हा विचार कमी व कित्येकांस अधिक असतो, त्या त्या मानाप्रमाणें त्यांच्या सुखदुःखाचा अधिक किंवा कमी हिस्सा त्यास सांपडतो. मनुष्य कितीही मूढ असला, तरी तो विचारी प्राणीच; इतकाच भेद कीं, त्यामध्यें विचाराचा अंश अगदींच थोडा असतो. ज्यास कोणी कोणी ज्ञानशून्य असें ह्मणतात, त्यांतदेखील अल्पस्वल्प विचाराचा अंश असतो. परंतु त्याला त्याचा यथार्थ उपयोग करितां येत नाहीं, इतकेंच अंतर.

प्राणिमात्राचा कल आपल्या सुखाकडे असतो खरा; परंतु मनुष्याच्या आणि इतर प्राण्यांच्या, सुखाचा अनुभव घेण्याच्या रीतींत जमीन अस्मानाचा भेद आहे. मनुष्याचें सुख ज्ञानमूलक व इतर प्राण्यांचें अज्ञानमूलक आहे. मनुष्य हा आपल्या विचाराच्या योगानें सुखाचा अनुभव घेऊन पारलौकिक सुख भोगण्यास समर्थ आहे. इतर प्राण्यांस पारलौकिक सुखाचा हक्क नाहीं; कारण त्यांला मुळींच विचार नाहीं.

मनुष्य अनेक प्रकारचे उद्योग करून आपणामध्यें व स्वजातीय प्राण्यांमध्यें उपयुक्त गुण आणण्यास प्रयत्न करितो. याचें मूळ कारण सुख आहे. मनुष्य सहचारी प्राणी आहे, ह्मणून परस्परसंबंधाशिवाय त्यास सुख प्राप्त व्हावयाचेंच नाहीं. आणि ईश्वरी संकल्पही असाच आहे कीं, त्यानें परस्परांच्या आधारानें राहावें, तरच त्याला सुखानुभव होईल. आईबापानीं आपल्या मुलांस शिकवावें, भावाबंधूंनीं परस्परांस शिकवावें, व प्रत्येक मनुष्यानें एकमेकांमध्यें ज्ञानाचा प्रसार करावा, हा मनुष्याचा साहजिक धर्म होय. असें केल्यानें त्यानें लोकांवर फार उपकार केले, असें नाहीं. कारण त्यामध्यें त्याणें आपल्या सुखाचें साधन केलें. मनुष्य एकमेकाच्या कल्याणाकडेस झटतो, यांत मुख्य आशय आपलें सुख आहे. दुसऱ्यावर उपकार करण्यांतही मनुष्यास साहजिक सुख होतें. जोंपर्यंत आईबापाला वाटतें कीं, मूल गुणवान् होऊन पुढें आपणास सुख देईल, तोंपर्यंत ते त्याजवर मोठी प्रीति करितात. परंतु जेव्हां एकादें मूल पुढें चांगलें निपजणार नाहीं, असें त्यांस वाटतें, तेव्हां त्यांची प्रीति उत्तरोत्तर कमी होते. एकादें मूर्ख मूल असलें, म्हणजे त्यास पाहून आईबापांस उलटें दुःख होतें. याजवर एक शहाणा मनुष्य असें म्हणतो, " सद्गुणी मुलगा बापास आनंदवितो, परतु मूढ मुलगा आईस दुःखाच्या ओझ्याखालीं दडपून टाकितो. " मुलगा शरीरानें धष्टपुष्ट

असून गोरा गोमटा असला आणि शहाणा व वाचणारा लिहिणारा नसला, तर तो केवळ पाषाणाच्या पुतळ्यासारिखा आहे, असें समजावें.

विद्याहीन पाषाण ॥ शत मूर्ख जाण ॥
तयाचें न पाहावें वदन ॥ जननी व्यर्थ प्रसवली ॥ १ ॥

संस्कृतांत असा एक सुभाषित–श्लोक आहे.

रूपयौवनसंपन्ना विशालकुलसंभवाः ॥
विद्याहीना न शोभंते निर्गंधा इव किंशुकाः ॥ १ ॥

## प्रकरण २

मनुष्यास आपले विचार प्रगट करण्याकरितां दोन मुख्य साधनें आहेत. वाणी आणि लिपि, या दोन साधनें करूनच बहुतकरून तो अमूल्य झाला आहे. वाचेनें तो परस्परांशीं भाषण करितो, आपलें सुख दुःख कळवितो व आपलें सर्व मनोगत उघड करून सांगतो. आपले विचार दुसऱ्यास सांगून त्यापासून त्याचें हित करितो. अथवा त्याजकडून आपलें हित करून घेतो, परंतु हें सर्व संपादन करून घेण्यास परस्परांच्या संन्निध असलें पाहिजे व सर्व इंद्रियें सुरळीत चाललीं पाहिजेत, ह्मणजे वाणिद्वारा एकमेकांचें समाधान होतें. बहिऱ्यास वाणीपासून लाभ होणार नाहींत. दूरदेशस्थ सुहृद्संबंधी असले आणि त्यांस आपलें सुखदुःख कळवायाचें असलें, तर एकाकडून दुसऱ्यास वाणिद्वारा निरोप पाठवावा, तेव्हां एकमेकांची तृप्ति होती. परंतु असा निरोप सर्व ठिकाणीं पोहंचवितां येत नाहीं, व तो चिरकाळ शुद्ध रहात नाहीं. मग त्याला भागडकथा अथवा दंतकथा असें ह्मणतात. केवळ वाणिद्वारा प्रगट केलेल्या विचारांस तादृश प्रौढपणा येत नाहीं, व ते चांगलेपणीं मनांत गोठविण्यास स्थळ व अवकाश सांपडत नाहीं, यास्तव केवळ मनांत गोठविलेले विचार सर्वांस सारिखे प्रगट करायास येत नाहींत. ह्मणून ते वाढविण्यास व शुद्ध रीतीनें प्रगट करण्यास लेखनविद्या हें मोठें साधन आहे. उर्दु भाषेंत असी एक ह्मण आहे, "एक लखा और सो बका" सर्व मनुष्यांनीं, स्त्री असो; किंवा पुरुष असो, वाचायास व लिहायास अवश्य शिकलें पाहिजे. त्याशिवाय त्यांचें ज्ञान, त्यांचा शहाणपणा, व त्यांचे विचार वाढणार नाहींत आणि त्यांमध्यें पोक्तपणा येणार नाहीं. लिहून तयार केलेल्या विचारांत केवळ प्रौढपणा येतो, इतकेंच नाहीं, परंतु ते हजारो कोश दूर देशांतरास त्यांत फेरफार झाल्यावांचून पाठवितां येतात. आणखी ते लक्षावधि वर्षें टिकतात. लिहिण्याच्या साधनेंकरून कांहीं अंशीं वाणीपेक्षां अधिक लाभ निष्पन्न होतात. आणि या एक विद्येपासून कोट्यावधि मनुष्यें ज्ञानीं व सद्गुणी होऊन त्यांनीं मोठे पुरुषार्थ केले व लौकिक मिळविला, व मिळवीत आहेत.

प्राकृत भाषेंत मेस्तक नामक लेखनविद्येवर एक ग्रंथ आहे; त्यांत लेखकाचीं लक्षणें अशीं लिहिलीं आहेत :—

लेखक कैसा असावा ॥ कुळशील आचार बरवा ॥
बुद्धि प्रकृति नित्य नवा ॥ तरणी जैसा ॥ १ ॥

नसावा आळशी कामातुर ॥ षष्ट नष्ट कापट्यकार ॥
जनविरोधी पापसंचार ॥ दाटुनि करी ॥

प्रतरणा कोण्हासीं ॥ न करी वितंड वाग्जल्पासी ॥
नैष्टुर्य मानसीं ॥ वसूं नेणे ॥ ३ ॥

शुद्ध सत्वें सात्विक ॥ प्रजांसी वाटे निज जनक ॥
कीं सकळार्थ प्रकाशक ॥ आकाशमणी ॥ ४ ॥

अतीत अनागत सुचे ॥ हितचि करणें सर्वांचें ॥
मूळ विरुद्ध अधर्माचें ॥ छेदूनी टाकिलें ॥ ५ ॥

अंतःकरणीं निर्भयता ॥ बोलों नावडे क्रूर वार्त्ता ॥
यथा लाभें संतुष्टता ॥ मनःपूर्वक ॥ ६ ॥

या पृथ्वीवर अनेक भाषा आहेत, तशाच अनेक लिपि आहेत. महाराष्ट्र कानडी, तुळवी, उर्दु, फारशी, गुजराथी, अरबी, हिब्री, युनानी, इंग्लिश, इत्यादि लिपि आहेत. या निरनिराळया लिपि कोणी कोणत्या काळीं कल्पिल्या, याचा अजून कोणासच निर्णय झाला नाहीं. आपल्या लोकांमध्यें असी कथा सांपडत्ये कीं, ह्या लिपि स्वर्गाहून देवांनीं पाठविल्या, यावरूनच हिंदु लोक बाळबोध लिपीस देवनागरी लिपि असें ह्मणतात. परंतु ही गोष्ट खरी आहे कीं, पृथ्वीवर या अनेक लिपींची योजना करण्यास ईश्वरानें निरनिराळया देशांत कोणीतरी महान् पुरुषांची योजना केली असावी. त्याशिवाय असें महत्कृत्य सिद्धीस जाणें कठीण. अस्तु, परंतु ज्या पुरुषांकडून हें लीपीचें साधन निघालें, त्यांनीं मनुष्यावर मोठेंच उपकार केले आहेत, यांत संशय नाहीं. जसें शरीर रक्षणार्थ अन्नवस्त्र पाहिजे, तसेंच ज्ञान व बुद्धी यांचें रक्षण व वृद्धि होण्यास व सुखाची वृद्धि करण्यास वाचतां लिहितां अवश्य आलें पाहिजे एक काफ्री वाचावयास होता; तो आपल्या देशबांधवांस वाचणें ह्मणजे काय हें समजावें, ह्मणून असें सांगे कीं, वाचणें ही कानाबद्दल डोळयांनीं ऐकण्याची विद्या आहे.

कोणी ह्मणेल कीं, पुष्कळ द्रव्य असलें ह्मणजे झालें; तेंच मुख्य सुखाचें साधन आहे, तर द्रव्य संपादन करायास व जें द्रव्य आपणापाशीं असेल त्याचा

यथायोग्य व्यय व रक्षण करण्यास ज्ञान असून लिहितां वाचतां आलें पाहिजे. नाहीं तर त्या द्रव्यापासून सुख होण्याबद्दल उलटें दुःखच प्राप्त होईल. मूढ लोकांच्या हातीं एकाएकीं पुष्कळ द्रव्य आल्यानें ते किती दुःखी झाले आहेत. याविषयींचीं या देशांत पुष्कळ उदाहरणें सांपडतात. यास्तव मनुष्यास सुख देण्याचें काम द्रव्याच्या स्वाधीन नाहीं, हें अर्थांतच सिद्ध होतें. मनुष्यास ज्ञान असलें, तर तो कोणत्याही स्थितींत आपलें समाधान करून घेतो. म्हणूनच " ज्ञानेनैव परं पदम् " असें सूज्ञ लोकांचें म्हणणें आहे. आणि हें ज्ञान संपादन करण्यास लक्षपूर्वक अवलोकन करणें, दुसऱ्याचा उपदेश ऐकून घेणें, अनेक वस्तूंचा शोध करणें, दुसऱ्यास शिकविणें, असे अनेक मार्ग आहेत. परंतु या सर्वांचा मूळ पाया वाचायास लिहायास शिकणें हाच आहे.



## प्रकरण ३

लिपींचा मुख्य उद्देश हाच कीं, मनुष्यानें आपले विचार व मनोगतें लिहून दुसऱ्यास कळवावीं, यास्तव ज्या लीपींत ते लिहावे, तिचें वळण बराबर समजलें पाहिजे. जसें एखाद्या इमारतीचा नकाशा कुशळ कारागिरानें काढून दाखविला असतां त्या इमारतीचें पूर्ण ज्ञान होतें. तसेंच जें आपण लिहितों तें नीट, सुरेख आणि वळणदार अक्षरांनी लिहिलेलें असलें, म्हणजे आपण लिहिलेले विचार दुसऱ्याच्या लक्षांत लागलेच येतात. कोणत्याही लिहिण्यांत दोन गोष्टी मुख्य लक्षांत ठेवाव्या. एक वाचायाजोगतें स्पष्ट अक्षर आणि दुसरें वाक्याची अर्थज्ञान होण्याजोगी बराबर जुळणी. या दोन गोष्टी अवश्य लक्षांत ठेविल्या पाहिजेत. चांगलें अक्षर लिहितां येणें हें मनुष्यास भूषणदायक असून त्याच्या प्रपंचाच्या सुखाचें आणि ज्ञानप्राप्ति करून घेण्याचें एक साधन आहे. एक विद्वान इंग्रज असें म्हणतो, सुरेख, वळणदार आणि स्पष्ट समजाया-जोगतें ढळढळीत अक्षर लिहितां येणें, हा एक मोठा चांगला गुण असून, तो त्या मनु-ष्याच्या सुखाचा उगम दाखविणारा आहे. चांगलें अक्षर हें मनुष्यास स्वतः तयार केलेलें मानपत्र आहे. आणि अशा पुरुषास कोठेंही उद्योग मिळण्यास अडचण पडणार नाहीं. सरकारी कामांत त्याचा खप आहे. व्यापारी लोकांस तर असा लेखक फारच उपयोगी आहे. दुसरें, अक्षर चांगलें लिहितां आल्यानें मनुष्याची बुद्धि व कल्पना वाढतात. स्पष्ट आणि जलद लिहिणारा असला, म्हणजे त्याला लिहिण्याची हंस असते. म्हणून तो नेहमी कांहीं ना कांहीं तरी लिहीत असतो. मग लिहितां लिहितां त्याची बुद्धि वाढते.

एकादा दुसऱ्या गोष्टींत चांगला सुशिक्षित असला, परंतु त्याला चांगलें अक्षर काढतां न आलें, तर त्याच्या ज्ञानांत व विद्यावृद्धि करण्यांत थोडा कमीपणा येतो.

त्याला एकाद्या चांगल्या विषयावर लिहायाचें असलें, तर दुसरा लेखक शोधावा लागतो. त्यामुळें तें काम स्वतः लिहून जितकें चांगलें झालें असतें, तितकें चांगलें होत नाहीं. इष्ट-मित्रांस व कोणी मोठ्या गृहस्थास पत्र लिहायाचें असलें आणि आपलें अक्षर चांगलें नसलें, तर अक्षराच्या वाईटपणामुळें त्याला लिहिण्यास अगदींच संकोच वाटतो. मग त्याची पत्र लिहिण्याची बुद्धि आकुंचित होऊन दुसऱ्यापासीं बहुतकरून तो फारसा पत्र-व्यवहार ठेवीत नाहीं. असीं शेंकडो उदाहरणें अढळण्यांत येतात.

चांगलें अक्षर लिहितां येणें हा बहुतकरून किती एकांचा अंगस्वभाव आहे; परंतु त्याला सुशिक्षा ही पाहिजे. अंगस्वभाव हा सर्वांस सारखा नसतो. ह्मणून ही विद्या सर्वांस श्रम घेऊन शिकविली पाहिजे. लिहिण्याच्या कामांत चांगला कुशळ आणि प्रवीण गुरु असल्याशिवाय चांगलें वळणदार आणि सुरेख अक्षर लिहिणारे विरळा सांपडतील. जसा एकादा चेहेरा नीट अवयवशुद्ध काढला पाहिजे, तसेंच प्रत्येक अक्षर वळणदार व अवयवशुद्ध काढलें पाहिजे. प्रत्येक लिपीचें वळण निरनिराळें असतें ह्मणून जी लिपि आपणास लिहावयाची तिचें वळण पहिल्यानें लक्षांत आणिलें पाहिजे. पाहा ! मराठी लिपीचें वळण इंग्रजी लिपीपासून किती भिन्न आहे. तसेंच गुजराथी लिपीच्या व फारसी लिपीच्या वळणांत किती फरक आहे. प्रारंभापासून वळणदार अक्षर काढायास मुलांस शिकविलें पाहिजे. भलताच फांटा भलतेकडेस देणें व भलताच काना भलत्याच ठिकाणीं काढणें असें करूं नये. चांगला कित्ता घेऊन अक्षर वळवावें. हातवळा बसण्यास अक्षर पुष्कळ दिवस वळविलें पाहिजे, ह्मणजे हात बसतो. मग उतावळीनें अक्षर काढिलें असतां चिंता नाहीं. परंतु हातवळा बसे तोंपर्यंत मुलांनीं प्रत्येक अक्षर लक्ष लावून सावकाश काढावें. याजवर असी एक ह्मण आहे,—

गातां गळा शिपतां मळा
आणि लिहितां हातवळा

कित्येकांस असे वाटतें कीं, अक्षर वळविणें हें क्षुल्लक काम आहे व चांगलें अक्षर असणें हा एक साधारण गुण आहे. परंतु या दोन्ही समजुती खोट्या आहेत बाळपणापासून मेहनत घेऊन अक्षर वळविलें पाहिजे, तेव्हांच चांगलें होतें. आणि अक्षर चांगलें घटींव असणें हा एक मनुष्यामध्यें भूषणकारक गुण आहे, असें समजावें.

चांगलें अक्षर काढणें हें हस्तकौशल्याचें काम आहे, म्हणून त्याचा अभ्यास बाळपणांतच केला पाहिजे. बाळपणांत शरीर कोमल असल्यामुळें बोटें व स्नायु नाजूक असून पाहिजे तशा लववितां येतात. अक्षर चांगलें काढण्यास कुशळता पाहिजे आणि तें साध्य होण्यास शरीराचे कांहीं भाग नेमाप्रमाणें लववावे पडतात, तें सर्व बाळपणीं अभ्यास केल्यानें साध्य होतें. अक्षर नीट जपून काढण्यास लक्ष लावावें पडतें, म्हणून

लहानपणापासून लक्ष लावून जपून अक्षर काढण्याची सवय लावली असतां त्याला पुढें दुसऱ्या गहन विषयावर लक्ष लावण्याची सवय पडते आणि तेणेंकरून विद्या संपादन करण्यास मुलांस कांहीं अंशीं उत्तेजन येतें. मोठेपणीं शरीरामध्यें रांठपणा येतो व बोटें कठीण होतात आणि अक्षरांत सुरेखपणा आणण्यास जितकीं तीं लववावीं पाहिजेत तितकीं लवत नाहींत. मग तीं फिरतील त्याप्रमाणें वेडेंवांकडें अक्षर काढावें पडतें. असें झालें ह्मणजे अक्षर वळिवणें आपल्या स्वाधीन राहात नाहीं. अक्षराचे स्वाधीन आपण होतों. चांगलें सुरेख अक्षर काढण्यास कांहीं विचार करावा पडतो, आणि बाळपणापासून मुलांस लहानसान कामांत विचार करायाची सवय लावली ह्मणजे मोठेपणीं त्यांस प्रौढ विचार करण्याची शक्ति सहज प्राप्त होती. मडकें ओलें असतांना त्याचे कांठ लववून त्यास पाहिजे तसा घांट आणण्यास कुंभारास सोपें पडतें; परंतु तेंच भट्टींत भाजून काढलें ह्मणजे त्याचा इलाज चालत नाहींसा होतो; तसाच प्रकार अक्षराचाही आहे.

इंग्लंड देशांत लहानपणापासून चांगलें अक्षर लिहिण्याची पद्धत लागावी ह्मणून आईबाप व पंतोजी फार परिश्रम घेतात, ह्मणूनच त्यांमध्यें पुष्कळ फरडे लिहिणारे व मोठे धुरंधर विद्वान् सांपडतात.

विद्वानेव विजानाति विद्वज्जनपरिश्रमम् ॥
न हि वंध्या विजानाति गुर्वीं प्रसववेदनाम् ॥

आह्मां लोकांमध्यें कित्येकांची असी समजूत आहे कीं, चांगलें अक्षर काढायास शिकणें हें गोरगरिबाचें व अविद्वानाचें काम आहे. ज्यास कांहीं उद्योग नसेल व ज्याच्या आईबापांनीं संचय करून द्रव्य ठेविलें नसेल, त्याणें मात्र मेहनत घेऊन अक्षर वळवावें. आणि कारकुनाचें वगैरे काम करावें. परंतु जे श्रीमंत व शास्त्री-पंडित आहेत, त्यांस अक्षराची कांहीं गरज नाहीं. एका मित्रानें एका सधन गृहस्थाच्या मुलाची एक गोष्ट सांगितली, ती एथें उदाहरणार्थ सांगतों. हा मुलगा सुमारें अठरा वर्षांचा होता. या वयांत त्याला बाळबोध, मोडी किंवा इंग्रजी अक्षर नीट काढतां येत नसे. सरासरी अक्षराची ओळख मात्र होती. आणि मराठी थोडें थोडें वाचतां येत होतें. त्या वेळीं त्याच्या एका नातलगास एक गृहस्थ ह्मणाला, "काय हो, त्या मुलास कोणी तरी शिकवायास ठेवा. किंवा त्याला शाळेंत पाठवा; नाहीं तर शेवटीं बसल्या बसल्या त्याला अक्षर तरी वळवूं द्या." तेव्हां त्याणें असें उत्तर केलें, "कां त्याला शिकून आणि अक्षर वळवून आह्मा-तुह्मासारिखें चाकरी करायास जावयाचें आहे? तो आज लाख दीड लाखाचा धनी आहे. घरीं बसल्या बसल्या त्यास दरमाहा चारपाचशें रुपये येतात. तो कशास अक्षर वळवील? त्यास शिकण्याची काय करूर?" असे कित्येक लोकांचे विलक्षण तर्क आहेत.

एक शहाणा विद्वान गृहस्थ असें म्हणतोः–जो मनुष्य स्पष्ट वाचायाजोगतें अक्षर लिहून आपल्या मित्रास व दुसऱ्या कोणासही पत्र लिहून पाठवीत नाहीं, तो लिहिण्यांत कच्चा असें समजावें. वाईट अक्षर लिहून पाठविलेलें पत्र वाचण्यांत जेवढा निरर्थक वेळ जातो, त्याचा दोष पत्र पाठविणाऱ्याकडे लागतो. आणि कित्येक इतके वाईट लिहिणारे आहेत कीं, त्यांचें लाहानसान पत्र असलें, तरी तें वाचण्यास दोनचार तास मोडतात.

एका मराठी राजाविषयीं एकानें एक चमत्कारिक गोष्ट सांगितली, ती अशी आहे. चंपू संस्थानांतील धाकटे महाराजांस इंग्रजी शिकण्याची इंग्रज सरकारनें तजवीज करून दीडशें रुपये दरमहाची नेमणूक करून एक शिक्षागुरु पाठविला. आणि महाराजांनीं प्रतिदिवशीं त्यापाशीं तास दोन तास अभ्यास करावा असें ठरविलें. परंतु महाराजांच्या दिवसाचें मान दुसऱ्या साधारण लोकांच्या मानाप्रमाणें नव्हे. महाराजांचा एक दिवस तो चार महिने आणि दाहावीस मिनिटें तीं दोनतीन तास, या मानाप्रमाणें महाराज महिन्या दोन महिन्यांनीं, मर्जीस येई तेव्हां, गुरुजींस आपली भेट घेण्यास बोलावणें पाठवीत. मग पांचचार मंडळी हुजुरे जवळ घेऊन बूक उघडून वाचावयास प्रारंभ करितात. हुजुऱ्यांमध्यें कोणी भोजनबंधु, कोणी छानछोके, कोणी खुशामती, कोणी अलंटपु, कोणी खुशालचेंडू असे असतात. मग बूक उघडून (जी डबल ओडी गुड) हे शब्द अडखळत अडखळत महाराज वाचितात; इतक्यांत खुशामत्या उठून "जीते रहो महाराज, जीते रहो," असें म्हणून दोन्ही हातांनीं मुजरा करितो. दुसरा "वाहावा! वाहवा! महाराजांनीं तर मोठी बाहार उडविली. महाराजांला इंग्रजी चांगलें समजतें, भले गाजी." असें ह्मणून दोन हातांनीं मुजरा करून खालीं बसतो. मग तिसरा उठून महाराजाच्या इंग्रेजी अक्षराची स्तुति करितो. चवथा ह्मणतो, "महाराजांची इंग्रजी लिहिण्याची खुबी उत्कृष्ट आहे. महाराजांसारिखा इंग्रजी अक्षर काढणारा आमच्या दरबारांत सांपडणार नाहीं." पांचवा ह्मणतो, "महाराजांचें मोडी अक्षर तर मोत्याचा दाणा. आमचे मुख्य कारभारी महाराजांचें अक्षर पाहून मान डोलवितात." "जीते रहो महाराज" असें ह्मणून दुसरा एक, मोठा मुजरा करून करून खालीं बसतो. ही स्तुति ऐकून महाराज तल्लीन होऊन वाचणें लिहिणें सोडून त्यांकडे पाहात बसतात. मग एक उठून ह्मणतो, "महाराजांस फार श्रम झाले. महाराज, आतां पुरे करावें." असें ह्मणून जमिनीस कपाळ टेंकून दोन्ही हातांनीं मुजरा करितो. इतक्यांत महाराज उठून अंतःपुरांत चालते होतात. आमच्या कित्येक बडे लोकांची विद्याभ्यास करण्याची बहुधा अशीच वहिवाट आहे.

कांहीं वर्षांमागें एका गुजराथी वर्त्तमानपत्रांत सुरत एथील एका सावकाराच्या

मुलाविषयीं कांहीं वृत्तांत लिहिला होता, त्यांतील सारांश असा आहे :—हा सावकार मोठा नामांकित असून त्याला एकुलता एक मुलगा होता, तो सुमारें आठ वर्षांच्या वयांत आला, तेव्हां बापानें चांगला दिवस पाहून त्याला शाळेंत पाठविला. ज्या दिवशीं त्यास शाळेंत पाठवायाचा त्या दिवशीं शहरांतील बडे लोकांस आमंत्रण फिरविलें होतें. आणि त्या मुलास हत्तीच्या अंबारींत बसवून शाळेंत नेऊन गणपतिपूजन करून त्यास पाटीवर अक्षरें काढायास लाविलीं. मग त्या मेताजीस व जे मोठमोठाले गृहस्थ त्या समारंभास आले होते, त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुसार कोणास शालजोड्या, कोणास शेले, पागोटीं, कोणास धोतरजोडे, असे देऊन ब्राह्मणास वगैरे हजारो रुपये दानधर्म केला. या प्रसंगीं त्या मुलाच्या बापानें सुमारें पंधरावीस हजार रुपये खर्च केले. परंतु फिरून त्या मुलास शाळेमध्यें पाठविला नाहीं, व मेताजीची त्याची भेटही होऊं दिली नाहीं. याप्रमाणें तो मुलगा स्वच्छंदांत पंधरावीस वर्षांच्या वयांत येई तोंपर्यंत तसाच राहिला. पुढें कांहीं वर्षांनीं बापास देवाज्ञा झाली आणि सुमारें दाहावीस लक्षांची मिळकत त्याच्या हातीं आली. मग काय विचारता ? दिवसास दिवाळी. याप्रमाणें त्यानें एकदोन वर्षांत सगळ्या दौलतीचा फडशा उडवून तो लवकरच कवडीस महाग झाला. मग जेव्हां त्यास सुरतेंत अन्न मिळेनासें झालें, तेव्हां तो उठून मुंबईस आला, आणि त्यानें कित्येक सावकारांपाशीं अर्जी केली कीं, आपणास कांहीं उद्योगास लावावें. कोणी कोणी त्यास मेत्याचें काम देण्याचें कबूल केलें; परंतु अक्षर लिहितां येत नव्हतें, सबब त्यास हें काम न पतकरणें भाग पडलें. नंतर कित्येक भल्या गृहस्थांनीं वर्गणी करून हजारपांचशें रुपये गोळा केले, आणि ते त्यास देऊन परत सुरतेस लावून दिला. या प्रकारचीं हल्लींही शेंकडो उदाहरणें या शहरांत सांपडतील.

कित्येक मोठे लोक सरासरी थोडेंबहुत वाचायास शिकतात; परंतु अक्षर वळविण्यांत कांहींच मन घालीत नाहींत; सरासरी सही करितां आली तर मोठाच भाग्योदय झाला, असें समजतात. कित्येकांस असें वाटतें कीं, दुसऱ्यास वाचतां न यावी अशी सही करण्यांत मोठें चातुर्य आहे. अशा समजुतीनें ते अगदीं वेड्यावांकड्या सह्या करितात. परंतु अशा सह्या करणें हें अज्ञानी पुरुषांचें काम. सही असी करावी कीं, ती लहान मुलांसदेखील पाहतांक्षणीं वाचतां यावी. ती वाचण्याबद्दल दुसऱ्याचा वेळ मोडूं नये, यांतच शहाणपण आहे. कांहीं दिवसांवर मला एकदोन गृहस्थांचीं पत्रें आलीं, त्यांत ज्या सह्या केल्या होत्या, त्या एवढ्या गिचबिड आणि बिकट होत्या कीं, मी त्या वाचण्याकरितां दोनतीन तास खर्चिले, तथापि माझ्यानें त्या वाचवल्या नाहींत. अशा सह्या करणारे पुष्कळ लोक आढळतात. परंतु हें वाईट आहे. कांहीं दिवसांवर डाक्तर डयलसन यार्णी यावर अशी गोष्ट सांगितली कीं, दाहा वीस वर्षांमागें एका इंग्रजी सरकारी कामगारानें कांहीं नाजूक कामाकरितां एक पत्र लिहून वरिष्ठ सरकारास इंग्लंड देशांत पाठविलें. आणि खालीं आपली सही केली. तो लखोटा इंग्लंडास पोंहचतांच तेथील मुख्य

कामगारानें तो फोडून वाचला. परंतु सही कोणा गृहस्थाची आहे, याचा कांहीं आदिअंत त्यास सांपडेनासा झाला. ती समजण्याप्रीत्यर्थ त्यानें आठपंधरा दिवस स्वतः मेहनत केली, व दुसऱ्या कित्येक गृहस्थांसही तें पत्र दाखविलें. परंतु कोणासच त्या सहीचा आगमाग लागेनासा झाला. शेवटीं बेइलाज होऊन त्याणीं असें ठरविलें कीं, त्या गृहस्थास एक पत्र लिहून मुंबईस पाठवावें. त्यास त्याणीं अशी युक्ति काढिली कीं, जो मजकूर लिहावयाचा तो आंत लिहिला आणि लखोटा करून जेथें त्याचें नांव लिहायाचें तेथें ती त्याणें आपल्या पत्रावर सही केली होती, ती कातरीनें कापून त्या लखोट्यावर चिकटविली, आणि तो लखोटा मुंबई एथील पोष्ट हपिसांत पाठविला. मग पोष्ट हापिसांतील लोकांस या गृहस्थाची सही व नांव माहीत असल्यामुळें त्याणीं तो लखोटा त्या गृहस्थास पोहंचता केला. बिकट सही केल्यानें याप्रमाणें लोक घोंटाळ्यांत पडतात, हें सर्वांनीं सही करिते वेळेस लक्षांत ठेविलें पाहिजे.

अलिव्हर गोल्डस्मिथ् एका ठिकाणीं असें ह्मणतो: मुलगा जात्या हुशार असून अक्षर चांगलें लिहिणारा असला, तर तो कोणताही स्वतंत्र धंदा शिकायास योग्य होईल.

## प्रकरण ४

ज्याची जी भाषा आहे, त्याणें तिची लिपि अवश्य शिकली पाहिजे. ज्यांची भाषा मराठी त्याणीं प्रथम बाळबोध आणि मोडी ह्या दोन्ही लिपि साध्य करून घेतल्याच पाहिजेत. बाळबोध लिपि ही केवळ पुस्तकें लिहिण्याची व छापण्याच्या उपयोगी आणि मोडी लिपि पत्रव्यवहार ठेवण्याची, व व्यापार उदम्याची व सरकारी दप्तर लिहिण्याची. ह्मणून मुलांस अगत्यानें मोडीचें अक्षर वळवायास शिकविलें पाहिजे. मोडीचें अक्षर चांगलें लिहितां आल्याशिवाय मराठी दप्तरी काम करितां येणार नाहीं. ज्याला मोडी लिहितां येत नाहीं त्याला अर्धें मराठी येतें, असें समजावें. मोडीचें अक्षर तरी मेहेनत घेऊन चांगलें वळविलें पाहिजे; व वळणदार स्पष्ट लिहिण्याचा अभ्यास ठेविला पाहिजे. कित्येक मोडी लिहिणारे असे अडाणी असतात कीं, त्याणीं लिहिलेला मजकूर वाचायास फार अवघड पडतें. ते अक्षर गिजबिड लिहितात इतकेंच नाहीं; परंतु कानामात्रा याकडे लक्ष देत नाहींत. असें लिहिल्यामुळें त्याणीं लिहिलेलें पत्र व जमाखर्च दुसऱ्यास समजणें कठीण पडतें. आणि यावरूनच वैदिक व शास्त्री लोक या अक्षरास राक्षस व पिशाच लिपि असें ह्मणतात असें वाटतें. जें आपण लिहितों, तें आपणास व दुसऱ्यास स्पष्ट वाचतां यावें, हाच मुख्य गुण अक्षरांत असला पाहिजे. आणि मोडीचें मूळ अक्षर तसेंच आहे; परंतु अलिकडे लोकांच्या दुर्लक्षामुळें बहुधा तें वाचायास अवघड पडतें.

मोडी लिपि हेमाडपंतानीं लंकेहून आणिली, असें सांगतात. हेमाडपंत हा कोणी उद्योगी आणि बुद्धिमान पुरुष होता असें वाटतें. त्याणें मोडी लिपि

देवनागरी लिपिवरून सुलभ रीतीनें लिहितां यावें ह्मणून कल्पिली असावी; अथवा ह्या पश्चिम भरतखंडाच्या भागांत, दुसऱ्या देशांतून ती आणिली असावी. परंतु यामध्यें एक मोठीच अडचण येती कीं, चीन देशापासून लंकेपर्यंत मोडी लिपि भरतखंडाच्या ह्या भागाशिवाय दुसरी कोठेंच अढळत नाहीं. यावरून एवढेंच मात्र ह्मणवतें कीं, ज्या अर्थी जिकडे तिकडे मोडी लिपीविषयीं हेमाडपंताचें नांव गाजतें, त्या अर्थी ही लिपि प्रसिद्धींत आणण्यास तो कारणभूत होता. हेमाडपंताचें नांव हेमाद्री असावें असें वाटतें. हें नांव ग्रंथांतरीं सांपडतें.

हेमाडपंताविषयीं ज्या अनेक गोष्टी सांगतात, त्यांवरून तो कोणी कल्पित पुरुष असावा असा भास होतो. त्याचा एक वृत्तांत असा सांपडतो. हेमाडपंत रामेश्वराचे मोठे भक्त होते. एके दिवशीं ते रामेश्वराची पूजा करीत असतां सुमारें दोन प्रहरीं त्या देवालयांत रावणाचा बंधु बिभीषण रामेश्वराची पूजा करायास नेमाप्रमाणें आला. तेव्हां त्याचें दिव्य स्वरूप पाहून हेमाडपंत घाबरून गेले. त्या समयीं त्याणीं सूक्ष्मरूप धारण केलें, आणि देवालयाच्या कोनांत निर्माल्य पडलें होतें, त्यांत जाऊन लपून राहिले. बिभीषण पूजा आटोपून वहिवाटीप्रमाणें त्या कोनांतून निर्माल्य काढून शेंडींत घालून लंकेस चालता झाला. त्या निर्माल्यांत बिभीषणाच्या शेंडींत चिकटून हेमाडपंत लंकेस गेला. मग बिभीषणाचें भोजन झाल्यावर जेव्हां त्याणें शेंडी झाडिली, तेव्हां तो जमिनीवर पडला. त्या वेळीं आपलें रूप प्रगट करणें, हेमाडपंतास प्राप्त झालें. बिभीषणानें त्याला पाहातांच लंकेस येण्याचें कारण विचारिलें असतां त्याणें झालेला वृत्तांत त्यांस सांगितला. मग बिभीषणानें त्यास परत स्वदेशास जाण्याची सोई करून दिली. हेमाडपंतानीं तेथून येते वेळीं मोडी अक्षर, गुंजा, बाजरी आणि बावन्न कसी सोनें हे पदार्थ या देशांत आणिले. असे विलक्षण वृत्तांत सांपडतात. तो जन्मला केव्हां व कोणत्या शकांत लंकेस गेला, याचा कांहींच अंत लागत नाहीं. आह्मामध्यें काळमानाचा उपयोग ठाऊक नाहीं, ह्या एका गोष्टीवरूनच आमच्या लोकांचे सर्व लेख कल्पित कादंबऱ्या होऊन गेले आहेत. सुमारें आठशें नवशें वर्षांपासून मोडी लिपि वहिवाटींत आली, असें जुन्या लेखांवरून अनुमान होतें. याच्या पूर्वींचे मोडीचे लेख सांपडत नाहींत.

मोडी अक्षराचीं मुख्य दोन वळणें आहेत. चिवलकरी व जनोबाभट्टी. हे दोघे लेखक एका अक्षरावरूनच मोठे प्रख्यात होऊन गेले आहेत. त्यांचे कित्यावरून बहुतेक विद्यार्थी अक्षरें वळवितात. तीं साधलीं असतां अक्षर चांगलें होतें.

मारवाडी व मुलतानी लोकांत अक्षर वळविण्याकडे फार लक्ष देत नाहींत; मुलांस केवळ बाराखड्या काढतां आल्या, ह्मणजे बहुधा दुकानावर काम चालवायास बसवितात. मग ते वेडींवांकडीं अक्षरें काढून घरीं पत्रें पाठवितात, व हिशोबखिशोब ठेवितात;

परंतु पुढें त्याणींच लिहिलेला मजकूर त्यांस वाचायास कठीण पडतो. आणखी जेव्हां त्याला एकादें पत्र मारवाड देशांतून येतें, तेव्हां वीत दीड वीत लांब चिटोरा असला, तरी तो वाचावयास कधीं कधीं दाहावीस मनुष्यांची मदत घ्यावी लागते, व त्यांतील मजकूर समजून घेण्याबद्दल चारपांच तास मोडावे लागतात. त्यांचा पत्र वाचण्याचा प्रकार असा असतो. ज्यास पत्र आलेलें असेल, तो तें पत्र हातीं घेऊन दुकानावर अक्षरें निरखीत बसतो. मग त्याच्या सभोंवतालीं एकामागें एक असे दाहावीस जण त्या पत्रांतील एकेक अक्षर ओळखून काढायाचा प्रयत्न करितात. एक ह्मणतो, "आ तो कक्को छे." दुसरा ह्मणतो "ना रे भाई मनें तो ते फफो लागे छे." तिसरा ह्मणतो, "सूं तमो बोलो छे ? आ तो मुकरर ठठ्ठो छे." चवथा ह्मणतो, "आ तो वात खरी; पण टट्टामां अनें ठठ्ठामां केटलो फरक होय छे ?" याप्रमाणें एकेक अक्षराचा निर्णय करून पुढें सगळ्या पत्राचा मजकूर समजून घ्यावा लागतो.

एका मारवाड्यास भावाकडून पत्र आलें होतें, त्यांत त्याचे घरचा सर्व समाचार असून दुसरा असा मजकूर होताः "मोती भाईनें खबर पडे के काकाजी आजमर गया" हें वाक्य, जे तें पत्र वाचायास दाहावीस असामी जमले होते, त्यांतील एकानें असें वाचलें. "काकाजी, आज, मरगया" (काकाजी आज मेले) असे कानीं शब्द पडतांच त्या मुलानें प्रथम काकाजी रे, ह्मणून मोठ्यानें आरोळी ठोकून, तो दुकान आटोपण्याच्या लागांत होता. इतक्यांत दुसरे जवळ होते, त्याणीं त्यास धीर देऊन बसविलें, आणि सांगितलें कीं, सबूर कर, पत्र सगळें नीट वाचून पाहूं, ह्मणजे काय तें समजेल, अजून पत्र बराबर लागलें नाहीं. मग तो मुलगा उगीच राहिला. याप्रमाणें तें पत्र; वाचायास त्याचा मोठाच घोटाळा होऊन गेला. मग तेथें एक त्यांतील हुशार वाचणारा आला. त्यानें घटिका दोन घटिका आपली मति खर्चून व डोळे तांबडे करून त्यांतून खरा अर्थ असा काढिलाः काकाजी आजमर गया, (काकाजी आजमिरास गेला.) मग जिकडे तिकडे स्वस्थ होऊन ते आपआपल्या दुकानीं गेले.

अक्षर नीट न काढिल्यामुळें याप्रमाणें अर्थाचा अनर्थ होतो. यास्तव मुख्यत्वें करून लिहितेवेळीं अक्षर स्पष्ट, अवयव शुद्ध काढून शब्द सुटे लिहिले पाहिजेत.

लंडन शहरांत न्यायखात्यामध्यें एक वकील असे, तो तीन प्रकारचें अक्षर काढी. एक तो लिही तें त्याच्या लेखकांस मात्र वाचतां येई, परंतु त्याला वाचतां येत नसे; दुसरें जें तो लिही, तें त्यालाच वाचतां येई, परंतु लेखकांस व दुसऱ्या कोणासच वाचतां येत नसे; तिसरें जें तो लिही, तें त्याला किंवा दुसऱ्यासही वाचतां येत नसे. आपण लिहिलेलें आपणास वाचतां न येणें ही फारच दुःखाची गोष्ट आहे. संस्कृतांत याजवर असें वाक्य आहेः "स्वयमपि लिखितं स्वयं न वाचयति, एतत् मूर्खलक्षणं."

वाईट अक्षर असल्यामुळें वाचणारासच त्रास होतो, इतकें नाहीं, परंतु लेखक मूर्ख

ठरून त्यास दूषण लावितात. कांहीं वर्षांमागें इंग्लंड देशांत असें झालें कीं, कोणी एका धार्मिक मनुष्यानें पांच हजार रुपये विद्याखात्यांत पाठविले आणि असा जाहिरनामा लाविला कीं, जो कोणी एका विषयावर चांगला निबंध लिहून पाठवील त्यास ते पांच हजार रुपये मिळतील. त्या वेळीं पुष्कळ विद्वान लोकांनीं शेंदोनशें निबंध लिहून पाठविले, मग ते तपासायास पंच नेमिले होते त्यांजकडे पाठविले. ते त्याणीं सर्व तपासून पाहिले. त्यांत एक उत्तम प्रकारानें रचिलेला होता, परंतु तें अक्षर फारच वाईट होतें, ह्मणून तो निबंध अगदींच टाकून द्यावा, असें कित्येकांचें ह्मणणें होतें, तथापि एका दयाळू गृहस्थाच्या आग्रहामुळें तो त्यांणीं वाचायास घेतला. आणि जेव्हां तो मोठ्या श्रमानें वाचला, तेव्हां त्याची रचना पाहून ते फार खुशी झाले आणि त्यास इनाम द्यावें, असें त्यांनीं ठरविलें. मग त्याबकडून त्याबरोबर जो लखोटा आला होता, तो काढून त्याचें नांव काय आहे, व असा निबंध लिहिणारा गृहस्थ कोण आहे, हें पाहण्याकरितां तो लखोटा फोडिला. परंतु त्यांला त्याचें अक्षर व सही कांहींच समजेना. तेव्हां त्यानीं ठराव केला कीं, तें बक्षीस त्यास देऊं नये. परंतु त्याच्या खालोखाल जो निबंध आला होता, त्यास द्यावें. त्या तपासणाऱ्या पंचांत एक गृहस्थ फारच दयाळू आणि चतुर होता, त्यास तें आवडलें नाहीं. त्याणें त्याच्या दुसऱ्या सोबत्यांस असें सांगितलें कीं, हा निबंध फारच उत्कृष्ट रचिला आहे. परंतु त्यास दोष हाच कीं, त्याचें अक्षर नीट नाहीं, आणि तो कोणी लिहिला, त्याचें नाव समजत नाहीं. तर यावर मला एक युक्ति सुचती, तेवढी करून पाहूं या. मग असेंही केल्यानें त्या निबंधाचा कर्त्ता सांपडला नाहीं, तर तें बक्षीस दुसऱ्यास देऊं. हें त्याचें बोलणें सर्वांनीं मान्य करून ह्या निबंधाविषयीं वर्त्तमानपत्रांत असी जाहिरात लाविली कीं, जा कोणी अमुक विषयावर निबंध लिहिला आहे, त्यानें येऊन अमुक दिवसांत निबंध तपासणाऱ्या मंडळीस भेटावें, नाहीं तर तो फुकट जाईल. ती जाहिरात वाचतांच त्या निबंधाचा कर्त्ता येऊन हजर झाला आणि त्यानें आपलें नांव त्यांस सांगितलें. त्या वेळीं त्या पंचानीं त्यास त्याचा निबंध व सही वाचण्यास त्यांस जे श्रम पडले, ते सांगून त्यास असें अक्षर लिहूं नये, ह्मणून सांगून ते पांच हजार रुपये त्यासच बक्षीस दिले. मग तो निबंध छापून प्रसिद्ध केला. तो इतका चांगला लिहिला होता कीं, तो छापतांच त्याच्या प्रती हातोहातीं खपून गेल्या.

मराठ्यांच्या कारकीर्दींत एक तुर्कटी जुगारी होता, त्याविषयीं अशी एक गोष्ट सांगतात. तो एके दिवशीं जुगाऱ्यांच्या टोळींत बसून जुगार खेळत असतां शिपायांनीं चतुर्भुज करून त्यास मामलतदाराकडे आणिलें. त्या वेळीं चौकशीअंतीं त्याजवर दोष ठरवून त्याकडून कांहीं दंड घेतला, आणि पुढें असी वर्त्तणूक ठेवणार नाहीं, असें लिहून दे आणि जा, असें सांगितलें असतां त्यानें याप्रमाणें, वेड्यावांकड्या मोडी अक्षरानें लिहून दिलेंः "आजपासून मी जुगार खेळणार नाहीं. खेळलों असतां सरकारचा गुन्हेगार," असें लिहून देऊन तो सुटून गेला. परंतु आपलें मूळच कर्म त्यानें सोडिलें

नाहीं. लागलाच दुसऱ्या दिवसापासून पूर्ववत् जुगार खेळूं लागला, तेव्हां शिपायांनीं त्याला सरकारांत नेला. त्या वेळीं तो ह्मणाला, "मला कां धरून एथें आणिलें? मी माझ्या लेखाप्रमाणें चालतों. मी सरकारचा हुकूम मोडिला नाहीं." हें त्याचें भाषण ऐकतांच मामलतदारानें त्यानें लिहून दिलेला खर्डा आणून त्याचेपुढें ठेविला. मग त्यानें तो याप्रमाणें वाचला. "आजपासून मी जुगार खेळणार, नाहीं खेळलों असतां सरकारचा गुन्हेगार." याप्रमाणें अक्षर नीट न लिहिलें व शब्द सुटे व स्पष्ट न काढले, तर वाक्याचा अर्थ भलत्याचा भलताच होतो. यास्तव मनुष्यानें सर्व गोष्टींत चौकस असलें पाहिजे. ह्या अट्टल जुगाऱ्यास तर्कटी लिहिण्याबद्दल व जुगार खेळण्याचा अपराधाबद्दल सरकारांतून मोठें शासन झालें. दुष्ट लोक कितीही धूर्त असले, तरी त्यांचा परिणाम वाईटच होतो.

कोणी कोणी लोकांस असें वाटतें कीं, दुसऱ्यास वाचतां न यावें, असें बिकट अक्षर काढणें व मोठे कठीण शब्द वाक्यांत उपयोगास आणणें, यांत मोठी चातुर्याची गोष्ट आहे. अशा समजुतीखाल ते भलत्याच रीतीनें अक्षर लिहून विद्वान लोकांत आपला उपहास करून घेतात. एक मुसलमान मुनशी आमच्या शाळेंत होता, त्यानें एक दिवस उर्दु भाषेंत कांहीं लिहून आणिलें होतें. त्यास मी सहज बोललों कीं, उर्दु पढणाऱ्या मुलांकरवीं तें वाचवा. तेव्हां त्यानें मोठ्या अकडीनें आणि विद्वत्तेच्या डौलानें असें उत्तर केलें, "ओहरफ तो कोय वल्य ओ पड सके, लेकीन, जो मैं अच्छातरेसे लिखूंगा, तो मगदूर क्या है के कोय शख्स ओहरफ पड सके." याप्रमाणें कित्येकांस असें वाटतें कीं, आपण लिहिलेलें दुसऱ्यास वाचतां न आलें, ह्मणजे आपण विद्वान झालों. स्पष्ट अक्षर असून सोप्या समजायाजोग्या शब्दांत मजकूर लिहिणें, यांत अधिक प्रौढी आहे. शब्द साधे असून वाक्यरचनेंत गंभीरपणा असावा, तीच खरी विद्वत्ता.

मोडी लिपीचे पुरातन लेख काढून पाहिले असतां तें अक्षर सुटें व आबालवृद्धांस सहज वाचतां येई, असें लिहीत, असें लक्षांत येतें. परंतु अलिकडे कित्येक जलद लिहिण्यासाठीं अगदीं बेताळ अक्षर लिहितात. कोणी असें सांगितलें कीं, इंग्रजी झाल्यापासून मोडी लिपि बेताळ होऊन गेली.

## प्रकरण ५

निरनिराळ्या लिपींचें वळण वेगवेगळालें असतें, ह्मणून त्या त्या प्रमाणें लेखणी केली पाहिजे, आणि धरली पाहिजे. मोडीचें अक्षर लिहायास बरूची जाड लेखणी पाहिजे. बाळबोध लिहायास भेरले माडाची किंवा छऱ्यांच्या काड्यांची लेखणी पाहिजे. इंग्रजी लिपीस पेनच पाहिजे, त्याशिवाय चांगलें अक्षर काढतां येणार नाहीं. लेखणी

नीट करितां आणि धरितां आली, ह्मणजे अक्षराचें वळण अर्धें साधलें, असें समजावें. बाळबोध अक्षर कोणते प्रकारचें असावें, याविषयीं असा श्लोक आहे :—

“ अक्षराणि सशीर्षाणि वर्तुलानि घनानि च ॥
परस्परमलग्नानि कदलीफलसंघवत् ॥ ”

इंग्रजी अक्षर काढण्याचे व पेन करण्याचे, धरण्याचे आणि लिहावयास बसण्याचे त्या भाषेंत चांगले नेम लिहिलेले आहेत. त्या नेमाप्रमाणें चाललें असतां अक्षर चांगलें वळेल, यांत संशय नाहीं. जे इंग्रजी शिकतात, त्यानीं हे नेम अवश्य वाचून पाहावे. इंग्रज विद्वानांनीं अक्षर काढण्याच्या पद्धति दोन घातल्या आहेत. एक तिर्कस आणि दुसरी गोल. त्यांत गोल अक्षर काढावें हें चांगलें आहे. गोल अक्षर जलद लिहिण्यास बरें पडतें, व त्यामध्यें सुरेखपणा आणायास फार मेहनत पडत नाहीं, असें एक प्रवीण लेखकाचें मत आहे. अनेक प्रकारच्या वळणाचे कित्ते आपल्यापासीं असावे. मग आपणास साधेल, त्या प्रतीचें अक्षर वळवावें.

इंग्रजी अक्षर सुरेख वळवायाचें असलें, तर तें काढण्याचीं जीं साधनें तीं आपणापासीं असलीं पाहिजेत. प्रथम एक चांगलें टेबल, आपणास लागेल तितक्याच उंचीचें, चांगली मजबूत खुर्ची, रेखाटणी, चांगलें कलमदान, चांगली शाई, चांगलीं कठीण पेनें, पेनशिली, व चांगले कागद, हीं असलीं पाहिजेत. मोठें अक्षर वळवायास किंचित् बळकट व जाडे कागद असावे, अणखी इष्टमित्रांस पत्र लिहिण्यासाठीं तऱ्हेदार कागद घेऊन ठेवावे. ते आपआपल्या योग्यतेनुसार असावे. मग त्यावर चांगल्या अक्षरांनीं सावकाश पत्रें लिहून आपल्या इष्टमित्रांस पाठवावीं. लिहिण्यांत कधीं उतावळ करूं नये.

हल्लीं आह्मामध्यें कित्येक इंग्रजी शिकलेले तरुण गृहस्थ आहेत, ते केवळ अक्षराची अनास्था करितात, व लिहिण्याच्या सरंजामाचीही दरकार बाळगीत नाहींत, परंतु श्रीमंताची आणि विद्वत्तेची मात्र आढ्यता घालितात. थोडक्या दिवसांवर एका गृहस्थाकडून मला पत्र आलें, तें पाहून तर मला आमच्या लोकांच्या दुर्भिक्षपणाविषयीं फारच वाईट वाटलें. हें पत्र एका पाठकोऱ्या कागदाच्या चिटोऱ्यावर लिहिलेलें असून त्याच्या तीन्ही बाजू अगदीं चितारून टाकिलेल्या होत्या. हें पत्र उघडून पाहातों, तर मला कोठेंच कांहीं सांपडेना. तेव्हां मी थोडा विचारांत पडलों. शेवटीं पुढें पाहातां त्याच्या चवथ्या पृष्ठावर थोडासा मजकूर दृष्टीस पडला. तो वाचल्यावरून ध्यानांत आणिलें कीं, मला जें पत्र लिहून पाठविलें आहे, तें हेंच असावें.

दुसरी एक गोष्ट माझ्या पाहाण्यांत आली ती असी : एके दिवसीं एका गृहस्थास मित्राकडून पत्र आलें, तें या गृहस्थानें वाचून पाहिलें. आतां त्यास उत्तर

लिहावयाचें, त्या वेळीं त्यास इतकी खटपट करावी लागली. त्याणें प्रथम धोंडू असी आपल्या चाकरास हाक मारून सांगितलें, "जा रे, शेजारीं जाऊन थोडी शाई मागून आण." मग तो दोनतीन ठिकाणीं शाई मागून एकाकडून आणून देतो. आतां पुढें कागदाची पंचाईत; तेव्हां खिशांतून एक अर्धी काढून मुलापाशीं देऊन मारवाड्याचे दुकानांतून तेलाचे व तुपाचे डाग पडलेला व हिंगाचा वास लागलेला, असा एक कागद आणविला. पुढें टेबूल पाहिजे, त्यास घरांतून एक चौरंग आणिला; मग पेन नाहीं; तेव्हां मुलाचें दप्तर सोडून पाहातां त्यांत एक लहानसें बुठें पेन सांपडलें, तें घेऊन दादासाहेब उत्तर लिहावयास बसले. प्रथम तो कागदाचा बंद हातीं घेऊन त्याचे चार तुकडे केले; मग त्यांतील एक चौरंगावर ठेवून लिहावयास प्रारंभ करितात, इतक्यांत शाईचा बोळा कागदावर पडला; तेव्हां तो अर्थातच रद्द झाला. याप्रमाणें दुसरे दोन थोडे थोडे लिहून फाडून टाकिले. शेवटीं राहिलेला तुकडा घेऊन त्याजवर दाहाबारा वेड्या-वांकड्या ओळी लिहून एकदां पत्र तयार केलें. आणि खालीं आपली विलक्षण अक्षरांनीं सही घातली. शेवटास असे शब्द लिहिले होते: (एक्सूक्यूझ हेस्ट) उतावळीनें लिहिलें आहे ह्मणून क्षमा करावी. या प्रकारचे पत्र लिहिणार या शहरांत बरेच सांपडतील. आतां या दाहा ओळीचें पत्र लिहिण्यासाठीं सुमारें चार तास मोडिले, तरी उतावळीनें लिहिलें ह्मणतात, तर ह्याची लगबग संपेल तरी कधीं?

जें द्रव्य आपण खाण्यापिण्यास व अन्नवस्त्रास खर्चितों, त्यांतील कांहीं कमी करावें आणि लिहिण्याचें सर्व साहित्य आपणापाशीं सर्व काळ तयार ठेवावें. नाहीं तर विद्वानाचा वृथा डौल घालून फळ काय? आपल्या अंगीं कांहीं तरी गुण असला पाहिजे. चांगलें अक्षर लिहितात, ते सर्व विद्वान्च असतात, असें नाहीं; परंतु चांगलें अक्षर असणें हें एक ज्ञान संपादन करण्यास साधन होतें.

चांगल्या अक्षरावरूनच कित्येकांस मोठाले रोजगार मिळाले आहेत. ज्या वेळीं जर्विस याणीं प्रथमच सरकारी शिलाछापाचा कारखाना काढिला होता, त्या वेळीं त्यांस चांगलें बाळबोध अक्षर लिहिणारे लेखक पाहिजे होते, ह्मणून त्यांनीं मुंबई परगण्यांत पुष्कळ शोध करून मोठ्या श्रमानें चार लिहिणारे तयार केले. त्यांतील एकास १०० रुपये दरमहा पगार होता व दुसऱ्यांस त्याच्या खालोखाल मिळत असे. परंतु चांगले लिहिणारे सांपडायास त्यांस फारच मेहनत पडली. मग त्यानें दुसरे एक दोन लेखक शिकवून तयार केले.

चांगलें अक्षर लिहितां आल्यानें किती लाभ आहेत, हें, जे लोक इंग्रजी शिकून हपिसांत चाकरी करितात, त्यांस पक्कें माहीत आहे. कितीही हुशार मुलगा हपिसांत चाकरी करितां गेला, तरी सक्रूतदर्शनीं प्रथम अक्षर पाहायास मागतात. आणि नंतर त्याची विद्वत्ता विचारितात. कित्येक केवळ चांगलें अक्षर लिहितां आल्यावरूनच

मोठाल्या जागा चालविण्यास समर्थ झाले आहेत. एक इंग्रज असें ह्मणतो कीं, जो चांगलें व जलद अक्षर लिहितो, त्यास उद्योग मिळायास कोणतीच अडचण पडणार नाहीं. अक्षर काढण्याविषयीं दासबोधांत असें सांगितलें आहे.

ब्राह्मणें बाळबद अक्षर ॥ घडसुनी करावें सुंदर ।
जें देखतांची चतुर ॥ समाधान पावती ॥ १ ॥

वाटोळें सरळ मोकळें ॥ वोतलें मसीचें काळें ॥
कुळकुळीत वोळी चालिल्या सुढाळें ॥ मुक्तामाळा जैशा ॥ २ ॥

अक्षर मात्र तितुकें नीट ॥ नेमस्त असावे काने नीट
आडव्या मात्रा त्याही नीट ॥ अर्कुलें वेलांटिया ॥ ३ ॥

पहिलें अक्षर जें काढिलें ॥ ग्रंथ संपे तंव पाहात गेलें ॥
एका टाकेंच लिहिलें ॥ ऐसें वाटे ॥ ४ ॥

अक्षराचें काळेपण ॥ टांकाचें ठोसरपण ॥
तैसेंचि वळण वांकण ॥ सारिखें असावें ॥ ५ ॥

वोळींत वोळ लागेना ॥ अर्कुल मात्रा भेदिना ॥
खालचे वोळीस स्पर्शेना ॥ उंच अथवा लंबाक्षर ॥ ६ ॥

पान शिशानें रेखाटावें ॥ त्यावरी नेमक लिहावें ॥
दूरी जवळी न व्हावें ॥ अंतर वळीचें ॥ ७ ॥

कोठें शोधासी आढळेना ॥ चुकी पाहातां सांपडेना ॥
गरज केली हें घडेना ॥ लेखका पासोनी ॥ ८ ॥

जाचें वय आहे नूतन ॥ तेणें लिहावें जपोन ॥
मनास पडे मोहन ॥ ऐसें करावें ॥ ९ ॥

बहु बारिक तरुणपणीं ॥ कामा नये ह्मातारपणीं ॥
नेमस्त लिहिण्याची करणी ॥ केली पाहिजे ॥ १० ॥

भोंवतें स्थळ सोडून द्यावें ॥ त्यांत चमचमित लिहावें ॥
कागद झडतांही झडावें ॥ नलगे अक्षर ॥ ११ ॥

ऐसा ग्रंथ जपोन लिहावा ॥ प्राणिमात्रांस उपजे हेवा ॥
ऐसा पुरुष तो पाहावा ॥ ह्मणती लोक ॥ १२ ॥

काया बहुत कष्टवावी ॥ उत्कृष्ट कीर्त्ति उरवावी ॥
चटक लावून सोडावी ॥ कांहीं एक ॥ १३ ॥

घट्ट कागद आणावे ॥ जपोन नेमस्त खळावे ॥
लिहिण्याचे सामे असावे ॥ नाना प्रकारीं ॥ १४ ॥

सुऱ्या कातऱ्या जागाईत ॥ खळीं घोंटाळे तागाईत ॥
नाना सुरंग मिश्रित ॥ जाणोन घ्यावे ॥ १५ ॥

नाना देशींचे बरू आणावे ॥ घट्ट बारीक सरळ पाहावे ॥
नाना रंगाचे असावे ॥ नाना जिनसी ॥ १६ ॥

नाना जिनसी टांकी तोडणी ॥ नाना प्रकारें रेखाठणी ॥
चित्र विचित्र करणी ॥ शिसें लोळ्या ॥ १७ ॥

हिंगुळ संग्रहीं असावें ॥ वाळले अळते पाहून घ्यावे ॥
सोपे भिजवून वाळवावे ॥ संग्रह मसीचे ॥ १८ ॥

एक सुज्ञ गृहस्थ असें सांगतो कीं, नेमाप्रमाणें लिहिण्याचें काम चालविलें असतां लेखकांचें काम करणारा मनुष्य निरोगी होतो; व त्याच्या डोळयांस उपद्रव होत नाहीं. दुसरें तो असें ह्मणतो कीं, मी पुष्कळ लेखकांची ठिकाणें तपासून पाहिलीं, त्यांत जे नेमाप्रमाणें चालत होते, ते सुदृढ व बळकट आणि निरोगी असत.

लिहायास बसायाची जागा हवाशीर असून तींत माफक उजेड असावा. फार उजेड असला, तर डोळ्यास उपद्रव होतो, व पुढें दृष्टि मंद होते. लिहायास सरळ रितीनें बसावें. छातीवर भार पडूं देऊं नये, व पाठीस पोंग पाडूं नये. वेड्यावांकड्या रितीनें लिहायास बसलें असतां शरीराच्या एकाद्या भागावर अधिक भार पडून शरीर कुरूप होतें. इतकेंच नाहीं, परंतु अंगीं अशक्तपणा जडून पुढें भलताच उपद्रव उभा राहातो.

अल्पानामपिवस्तूनां संहतिः कार्यसाधिका ॥
तृणैर्गुणत्वमापन्नैर्बध्यंते मत्तदंतिनः ॥

समाप्त

# परिशिष्ट क्र. १

## अपरिचित शब्दांचा कोश

[ सूचना :—शब्दांपुढील आंकडे पृष्ठांचे आहेत. ]

**अकडीने** २४८ डौलानें, ऐटीनें.

**अड घेणें** १८३ हट्ट घेणें.

**अंदेशा** ११७ [ फा० ] संशय, शंका.

**अनवाहणी** २२ [ सं०अन् + उपानह ] अनवाणी.

**अनुग्रह** १२२ अवलंब.

**अनुपपत्ति** ४५ निर्वाहाच्या साधनांचा अभाव, दारिद्र्य.

**अनुरोध** १४४ कल, रोंख, प्रवृत्ति.

**अपशब्द** ४१ बोल, दोष.

**अर्कुलें** २५१ रफार, रेफ.

**अर्धी** २२० एक पै.

**अलंटपु** २४२ अललटप्पू, बेजबाबदार.

**अलबत्ता** २२४ [ अर० अलबत्ताह् ] अलबत्, अवश्य, निश्चयपूर्वक.

**अलुग** २०९ [ सं० अ + लग् ] हलकेच, अलगद.

**इनसाफ** १३३ [ अर० इन्साफ् ] न्याय.

**उदार** २२० उधार.

**कबाट** ९ कपाट.

**कबुलातीनें** ५१ [ अर० कबुलायत् ] संमतिपत्रानें.

**कराटी** २२३ [ सं० करोटी ] करवंटी.

**कलंक** १०९ किल्मिष, काळेंबेरें.

**काप** १५९ [ का० कोप्पु ] स्त्रियांच्या कानांतला दागिना.

**कुमक** ६० [ तु० कुमक् ] मदत.

**कुली** १८५ [ का० कूली ] सोनाराची घडणावळ किंवा मजुरी.

**कुसुंबा** १६७ [ सं० कुसुम्भ ] अफूच्या बोंडांतील अर्क.

**कृतीची** ६२ कृत्रिम, बनावट.

**गजवा** २०८ [ फा० गशावा :—हत्तीच्या किंवा उंटाच्या पाठीवरील पिशवी ] खिसा.

**चटपट** १२३ चुटपूट.

**चंडोल** १६३ एक अमली पदार्थ.

**चिरडी** १८७ [ सं० चीर = वस्त्र ] लहान मुलीचें लुगडें.

**चुरमुरणें** २२१ कुरकुरणें, चडफडणें.

**छाकटा** १६४ [ सं० शठक ] धुंद, मस्त

**छांदस** २५ छांदिष्ट, लहरी.

**जाजती** १८५ [ अर० झाइद, झियाद ] जास्त, अधिक.

**जायांचीं** ८५ [ जाणें° ] परतबोलीनें आणलेलीं, उसनवट.

**जोडीं** १७९ जोडपीं.

**डांख लागणें** १०६ डांक लागणें, ( डांक लागल्यानें ) हिणकस होणें.

**तलख** २१५ [ फा० तल्ख ] कडक, जालीम.

**तसर** १२ [ सं० त्रसर ] कसर, एक क्षुद्र किडा.

**तांबोळी** २०१, २२० [ सं० ताम्बूलिक ] विड्याच्या पानांचा विक्रेता.

**दंगा** १३३ [ फा० दघा ] दगा, लबाडी, गोंधळ.

**दरकार** २४९ [ फा० ] काळजी.

**दिक्कत करणें** ९९ [ अर० दिक्कत् ] आशंका घेणें, संशय घेणें.

**दुगाणी** १६७, २२१ एक तांब्याचें नाणें, अर्धा आणा.

**देशावर करणें** २२७ गांवोगांवीं किंवा देशोदेशीं भिक्षा मागत फिरणें, भिक्षाटन करणें.

**धिरणें** १८७, १९४ दम धरणें, थांबणें.

**नखलामी** २०५ नुकसान.

**नाकारी** १० खराब, रोगट.

**परभ** २१९ प्रभु.

**परमाणगी** १९ [ फा० पर्वानगी ] अनुज्ञा, हुकूम.

**परवड** ८१ [ सं० परि + वृत्ति ] परवचा, उजळणी.

**पांडव (रुपये)** २२६ [ ल० ] पाच (रुपये).

**पिठें** १६६ [ सं० पैष्टी = दारू ] गुत्ता, दारूचें दुकान.

**पुत्रावण** ५२, ८५, ८६ [ सं० पुत्र + अवन ] पुत्र मुखावलोकनाचा विधि.—यांत नालच्छेदनापूर्वीं मुलास सोन्याच्या स्पर्शानें युक्त असें तूप व मध देतात.

**पोंग** २५२ पोंक.

**प्याजी** २२५ [ फा० पियाझ् = कांदा ] कांद्याच्या रंगाचें, फिकट गुलाबी रंगाचें.

**फरा** १८७ धान्याचें एक माप.—हें १२ किंवा १६ पायलींचें असतें.

**फरोक्त** ४५ [ फा० फरोख्त् ] विक्रीत, विकून टाकलेलें.

**फिशारी** २२३ पोकळ डौल, फुशारकी.

**फोडे** २२८ [ सं० स्फोट ] देवी.

**बचनाग** १६७ [ सं० वत्सनाग ] एक विषारी वनस्पति.

**बचेरी** ८६ [ प्रा० ] फजिती, थट्टा.

**बयाती** २२१ [ अर० बयाज = तपशील ] बयादी, सबबी.

**बरतर्फ** १३३ [ फा० ] पदच्युत.

**बरू** २४८ [ प्रा० बरुअ ] बोरू.

**बुट्ठे** २५० बोथट (?).

**बुरसे** २१० गलिच्छ, ओंगळ.

**बेताळ** २४८ [ फा० बी + सं० ताल ] अनियंत्रित, बेताल.

**भूयसी दक्षिणा** १८६ धार्मिक विधीच्या शेवटीं जमलेल्या सर्व ब्राह्मणांस द्याव-याची दक्षिणा.

**मर्फा** ८५ [ फा० ] टिमकी, लहान नगारा.

**मसी** २५१ [ सं० मषी ] काळी शाई.

**माहात** २७ [ सं० महामात्र ] माहुत, हत्तीला हांकणारा.

**मुकद्दमा** ४१, १३३ [ अर० ] खटला.

**मुशारा** १४८ [ अर० मुशाहरा ] वेतन, पगार.

**मेस्तक** २३८ जमाखर्चादि लेखनपद्धतीची माहिती देणारें पुस्तक (मेस्तको लेखपद्धति :—राज्यव्यवहारकोश ३१३).

**मोठा महाल** २२९ ( ल० ) शौचकूप.

**मोस्तर** २२४ [पो० Mostra ? महिन्याच्या ठराविक तारखेस सही करून पगार घेण्यावरून ] पगाराचा दिवस, ( ल० ) महिना.

**मोहा** १६५ [ सं० मधु ] एक वृक्षविशेष, मोहाचें झाड.

**यादवान** १७९ [ फा० ] जन्मलग्नपत्रिका, टिपण.

**रसीब** १७९ [ इं० रिसीट् ] पावती.

**राटावळ** २१९ मार्ग, पद्धति, रहाटी.

**लटापटी** २२५ झटापट, मारामार.

**ला घेणें** १९४ [ अर० ला = नकार ] नादारीचा हुकूम घेणें.

**लागांत** २४६ बेतांत.

**ल्हाय** १८७ अंगावर पोकळ गोल पांढरे ठिपके असलेलें, जरीचा कांठ आणि पदर असणारें, बैंगणी रंगाचें उंची रेशमी लुगडें.—हा शब्द पाठारेप्रभु शातींत रूढ होता.

**वरांडी** ४५ गडगा, हातणी, धक्का.

**वहमा** ५९, १४४ [ अर० वहम् ] शंका, गुन्ह्याचा संशय.

**वाखा** १६९ [ अर० वाकिआ ] महा पीडा, रोगाच्या विकोपाची अवस्था.

**वार्टे** १८२ [ सं० वर्तिका ] लहान वाटी.

**वार** २२५ दिवस.

**वाळी** १८५ बाळी, नाकांतील किंवा कानांतील सोन्याच्या तारेचा अलंकार

**विपचार** ४७ त्रास, विघाड.

**विशाकलित** १५६ [ सं० वि + शकलित ] विस्कळित.

**व्यंगोक्ति** १०० [ सं० व्यंग + उक्ति ] उणीव, न्यून.

**शतपदी** २२९ शतपाउली.

**शिकिल करणें** १५२ [ अर० सैकल ] जिल्हई देणें.

**शिमाच्या** १९४ [ सं० सीमा>शिमा ] शिवेच्या.

**शिनोर** १९६, २२५ [ इतालियन Signor ] साहेब, वरिष्ठ अधिकारी.

**शिरोणी** १९० [ फा० शीरीनी, सिर्नी ] नवस फेडण्यासाठीं वांटावयाची खिरापत.

**साळसूद** १८० [ सं० शाला + शुद्ध ] सभ्य.

**सोमल** १६७ [ अर० सुंबुल ] एक प्रकारचें क्षाररूप विष.

**हलवान** १९२ वस्त्रविशेष, एक प्रकारची शाल.

**हंस** २३९ [ अर० हवस् ] हौस.

**हिडुस** २२२ घाणेरडे.

**हिलालवाला** १९१ [ अर० हिलाल् + वाला ] मशालजी.

**हेंदर** २१० कचरा, घाण.



# शुद्धिपत्र

| पृष्ठ : ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| १४ : १६ | मुखें | सुखें |
| ४५ : ८ | चारून | चोरून |
| ४६ : २४ | सुल्हत्संबंधी | सुह्वत्संबंधी |
| ४७ : ५ | जामी नगिरिची | जामीनगिरीची |
| ६५ : २९ | ह्मनणू | ह्मणून |
| ८१ : १२ | धर्माच | धर्माचा |
| १४९ : २९ | यऊन | येऊन |
| १५६ : ३१ | वहरो | बाहेर |
| १५७ : १८ | नेणार | नेणारा |
| १६७ : १७ | मनुप्यांस | मनुष्यांस |
| १८३ : १२ | गतनुगतिको | गतानुगतिको |
| १८९ : १३ | ह्मा बायकांच्या | ह्या बायकांच्या |
| २०६ : २० | तेव्हां | केव्हां |
| २०८ : २० | ह्मणणरी | ह्मणणारी |
| २३८ : ७ | प्रतरणा | प्रतारणा |



# शुद्धिपत्र

| पृष्ठ : ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| १४ : १६ | मुखें | सुखें |
| ४५ : ८ | चारून | चोरून |
| ४६ : २४ | सुत्दत्संबंधी | सुहृत्संबंधी |
| ४७ : ५ | जामी नगिरिची | जामीनगिरीची |
| ६५ : २९ | ह्मनणू | ह्मणून |
| ८१ : १२ | धर्माच | धर्माचा |
| १४९ : २९ | यऊन | येऊन |
| १५६ : ३१ | बह्रो | बाहेर |
| १५७ : १८ | नेणार | नेणारा |
| १६७ : १७ | मनुप्यांस | मनुष्यांस |
| १८३ : १२ | गतनुगतिको | गतानुगतिको |
| १८९ : १३ | ह्या बायकांच्या | ह्या बायकांच्या |
| २०६ : २० | तेव्हां | केव्हां |
| २०८ : २० | ह्मणरी | ह्मणणारी |
| २३८ : ७ | प्रतरणा | प्रतारणा |



# मराठी संशोधन-मंडळाचें संशोधन व प्रकाशन

| | |
|---|---|
| मुक्तेश्वरकृत महाभारत—आदिपर्व ( खंड १ ते ४ ) प्रत्येकी | रु. ५- |
| महाराष्ट्र-भाषेचें व्याकरण (दादोबांच्याहि पूर्वीचें, १८२४) | रु. ४- |
| अमृतानंदविरचित योगराज-टिळक (दत्तसांप्रदायिक ग्रंथ) | रु. १- |
| मराठी दोलामुद्रितें (संपा.-प्रा. सु. आ. गावस्कर) | रु. ५- |
| सांतु आंतोनीची जीवित्वकथा (क्रिस्ती ओवीबद्ध भक्तविजय) | रु. २- |
| मुद्रित तुकाराम-वाङ्मय | रु. १- |
| ज्ञानेश्वरीचें शब्दभांडार (प्रा. रा. ना. वेलिंगकर) | रु.१५- |
| The Printing Press in India (भारतीय मुद्रणाचा इतिहास) | रु.२०- |
| प्रा. केरूनाना छत्रे यांची टिपणवही | रु. ०- |
| यदुमाणिककृत गणेशपुराण संजीवनी टीका | रु. १- |
| क्रिस्ताचें यातनागीत | रु. १- |
| मोरोपंतकृत स्फुट काव्यें-खंड १ ला व २ रा प्रत्येकी | रु. ५- |
| —खंड ३ रा | रु. ८- |
| क्रिस्तांची सास्राचा कार्तेशिश्मु (सं. सौ. मीना जोशी) | रु. २- |
| सांतु आंतोनिची अचर्या (गोमंतकी बोलींतील ग्रंथ) | रु. ६- |
| सतराव्या शतकांतील गोमंतकी बोली (डॉ. वि. बा. प्रभुदेसाई) | रु. ७- |
| फ्रेंच कवीनें लिहिलेलें मराठी पुराण (सं. प्रा. प्रियोळकर) | रु. १- |
| मुसलमानांची जुनी मराठी कविता ( ,, ) | रु. १- |
| महानुभाव : इतिहासप्रकर्ण (सं. प्रा. प्रियोळकर) | रु. १- |
| फा. स्टीफन्स आणि त्याचें क्रिस्तपुराण (डॉ. स. गं. मालशे) | रु. १- |
| गोविंद नारायण माडगांवकर (ले. प्रा. प्रियोळकर) | रु. १- |
| उषाहरन-कथा (सं. डॉ. वि. बा. प्रभुदेसाई) | रु. २- |
| मेस्तक : शाणोपणाची पद्धति (सं. डॉ. स. गं. मालशे) | रु. १- |
| मराठी संशोधन-खंड ३ (सं. डॉ. स. गं. मालशे) | रु. ५- |
| हेमचंद्रकृत अपभ्रंशव्याकरण (सं. डॉ. के. वा. आपटे) | रु. २- |
| देवनागरीची ध्वनिलिपी (अ. का. प्रियोळकर) | रु. १- |
| भारतीय ग्रंथसंरक्षण कायद्याची शताब्दी (प्रा. अ. का. प्रियोळकर) | रु. १- |
| केशवसुतांच्या कवितांचें हस्तलिखित (डॉ. स. गं. मालशे) | रु. १- |
| म्हैसूरचा तिसरा कृष्णराज व त्याचा मराठी ग्रथ : संख्यारत्नकोश (सं. प्रा. अ. का. प्रियोळकर) | रु. १- |
| म. फुलेकृत शेतकऱ्याचा असूड(सं. डॉ. स. गं. मालशे व श्री. धनंजय कीर) | रु. २- |
| माडगांवकरांचें संकलित वाङ्मय, खंड १ ला (सं. प्रा. प्रियोळकर व डॉ. मालशे) | रु. ५- |
| मराठी भाषेची उत्पत्ति (वैद्य-गुणे वाद) | रु. ३- |
| देवनागरी लिपीची घडण (कृ. रा. परांजपे) | रु. १- |
| कपिलगीतोक्त पंचमुद्रा ( सं. डॉ. श्री. रं. कुलकर्णी) | रु. ०- |
| बा. अ. भिडे यांच्या वाङ्मयाची सूची (संक. डॉ. सु. रा. चुनेकर) | रु. ०- |

एकमेव विक्रेते :

**साहित्य सहकार संघ लिमिटेड**

**१७२ नायगाव क्रॉस रोड, दादर, मुंबई १४**

